देवामाझेंमनकरुनीस्वाधीन ॥ निमालेंस्वामीपणभोगिसना ॥ १ ॥ फुकाचाकामारावोळंगोंनिरंतर ॥ नघालींतुजभारकल्पनेचा ॥ २ ॥ तुजनलगेदेणेंतुजनलगेमागणें ॥ असेनअनुसंधानेंचरणाचोनि ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवातूं सर्वजाणता ॥ समईंयेउचिताचुकोंनको ॥ ४ ॥ ३०० ॥

डोळुलेसिणलेपहातांवाटुली ॥ अवस्थादाटलीहृदयामाजीं ॥ १ ॥ तूंमाझीजननीसखीयेसांगातिणी ॥ विठ्ठलेधाउनिदेईक्षेम ॥२॥ तूंमाझीकुरंगिणीमीतुझेंपाडस ॥ गुंतलों भवपाशसोडवीमज ॥ ३ ॥ मीवोतुझेंवत्सतूंमाझीगाउली ॥ वोरसोनिघालीप्रेमपान्हा ॥ ४ ॥ नामाह्मणेमाझीपुरवावी आस ॥ पाजीतान्हुल्यासप्रेमपान्हा ॥ ५ ॥ ॥३०१॥

वाढवेळकांलाविला ॥ कोण्याभक्तेंरेंगोविला ॥ १ ॥ झडकरीयावेंविठ्ठला ॥ आळवितांकंठसुकला ॥ २ ॥ वाटपाहेदाहीदिशा ॥ जीवींधरुनीभरंवसा ॥ ३ ॥ नकळेकांधरिलेंउदास ॥ मजतोवाटतेनिरास ॥ ४ ॥ केव्हांयेईलमाझा हरी ॥ अलिंगीनचहूंकरीं ॥ ५ ॥ नामागहींवरेंदाटला ॥ देहधरणीयेलोटला ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥३०२॥

तोदेवस्मरारेअनंत ॥ जोकांवैकुंठींचानाथ ॥ दृढधरा रेहृदयांत ॥ जेणेंयमपंथचुकेल ॥ १ ॥ आकांतींद्रौपदियेस्मरिला ॥ तिचींवस्त्रेंआपणझाला ॥ भक्ताच्यावर्ततबोला॥ ह्मणियाराजालाअर्जुनाचा ॥ २ ॥ विमळार्जुनउन्मळिला॥ जरासंधतोहीमारिला ॥ कंसासुरनिर्दाळिला ॥ कान्हया झालागोकुळींचा ॥ ३ ॥ ध्रुवजेणेंअढळपदींबैसाविला ॥ नामेंयेकअजामेळउद्धारिला ॥ उत्तरेचागर्भहाराक्षिला ॥ तो

सोडविलापरीक्षिती ॥ ४ ॥ जातीकुळनपहासी ॥ नामें येकेंउद्धरिलेंगणिकेसी ॥ त्यागोपाळाचेंउच्छिष्टखासी ॥ गजसोडविसीपाणियाडें ॥ ५ ॥ ऐसातूंकृपाळुदेवा ॥ प्रसन्न झालासीपांडवा ॥ विष्णुदासनामाविनवीकेशवा ॥ प्रेमभावद्यावामजलागीं ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥३०३॥

गाणेंजरीह्मणोंतरीगणेशशारदा ॥ आणीकनाहींदुजा यांवांचुनी ॥ १ ॥ नाचेनह्मणूंजरीतांडवमहेश्वरु ॥ तोही नृत्यकरूंजाणेएक॥ २ ॥ बोलूंह्मणोंजरीबोलकेवाचाचारी ॥ त्यायेकाचीउरीमगमींबोलों ॥ ३ ॥ जाणोंह्मणोंजरीअठराहिजाणें ॥ त्यापेंकायउणेंमगमींजाणों ॥ ४ ॥ कळावंत ह्मणोंजरीचंद्रसूर्यदोन्ही ॥ बारासोळागगनींदावितातीं ॥ ॥५॥नामाह्मणेअवघेंअवघेंचलें ॥ केशवेंआपुलेंम्हणावेंमातें ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥३०४॥

तरीगातानव्हेजेंगाणिवकरूं॥जेणेंतुमतेंहरिसंतोषउपजे ॥ १ ॥ तरीमीजाणनव्हेतेंजाणिवकरूं ॥ जेणेंतुमतेंहरिसंतोषउपजे ॥२॥ दातानव्हेमीजेंदातृत्वकरूं ॥ जेणेंतुमतेंहरिसंतोषउपजे ॥३॥ बहुरूपीनव्हेमीजेंअभीन्नवनदाटधारी॥ जेणेंतुमतेंहरिसंतोषउपजे ॥४॥ तरीमीयोगीनव्हेजेंमीध्यान धरीं ॥ जेणेंतुमतेंहरिसंतोषउपजे ॥५॥ यावरीजाणसीतेंकरीअनंता ॥ नामाविनवीसंताविष्णुदास ॥६॥ ॥३०५॥

माझियाभक्तासीजोठेवीदूषणा ॥तुटोनरसनापडोत्याची ॥१॥ ऐसेदुराचारीअसतीजेनर ॥ भोगितीअघोरसत्यजाणा ॥२॥ माझियाभक्तासीकरीछळणबुद्धि ॥ त्याचीवंशवृद्धि नव्हेकदा ॥३॥ माझियेभक्ताचाकारितीजेउपहास ॥ सकळ

त्याचावंशयमलोकीं ॥४॥ केशवह्मणेनाम्यामाझीसत्यवाणी॥ लटिकेंह्मणतांपतनींपडतीपापी ॥ ५ ॥ ॥ ॥३०६॥

तुझेचरणींचित्तरंगलेंअनुरागें ॥ बहुजन्मींवियोगेंशिणलेंहोतें ॥ १ ॥ आहाळलेंपोळलेंतापत्रयींपडिलें ॥ तृष्णें विभांडिलेंनानापरी ॥ २ ॥ कामक्रोधलोभदंभमदमत्सर॥ इहींनिरंतरजाजावलों ॥ ३ ॥ बुडतियाअवचटेंलाभेतीये सांगडी ॥ तेजीवेंनसोडीतैसेंझालें ॥ ४ ॥ नामाह्मणेतूंकेशवकृपेचासागर ॥ ह्मणींमाझाअव्हेरकरसीदेवा॥५॥३०७॥

बाळकास्तनपानकरवितेमाता ॥ टाळितांपुरताचरणींरुळे ॥ १ ॥ हातींघेउनीसिपुटीमायलागेपाठीं ॥ चरणींघालीमिठीपरतेंनव्हे ॥ २ ॥ तैसेंमाझेंमनतुजलागींदेवा ॥ नविसंबेकेशवाक्षणभरी ॥ ३ ॥ चातकतेथेंपाणीतृषाक्रांत वनीं ॥ वाटपाहेगगनींजीवनाची ॥ ४ ॥ निराळींचेंपीयूष्य वर्षेतयालागीं ॥ आळवितसेवेगींनामाह्मणे ॥ ५ ॥ ३०८ ॥

माझेमनींआतांऐसेंहोतेंदेवा ॥ भावसमर्पावातुझ्याचरणीं ॥ १ ॥ तंवमायामोहेंमजसींकेलाहेवा ॥ लोटियेलेंभवजळामाजीं ॥ २ ॥ आशानदीपुरींवहावलोंदूरीं ॥ काढीं वेगींहरिकृपाळुवा ॥ ३ ॥ सरितेमाजींधरिलोंयामदनमगरें ॥ पुढारेमाघारेजाऊंनेदी ॥ ४ ॥ नानिघेनानिघेआणीकापोहणारे ॥ सहितपीतांबरेंघालीउडी ॥ ५ ॥ थडीये उभाउभीधांवगाश्रीहरि ॥ मजहानिथोरीसर्वस्वेंगेलों ॥६॥ भक्तिनवरत्नांचीबुडालीवाखोरी ॥ काढीवेगींहरिमायबापा ॥ ७ ॥ धीरआणिवीरयादोन्हीसांगडी ॥ श्रद्धापुढीलदोरीतुटोनीगेली ॥ ८ ॥ भावबळेंसांपडलोंदाटलोंउभडी ॥

वेगींघालीउडीकृपाळुवा ॥ ९ ॥ तुझेंभक्तिविणकोरडाहोय गळा ॥ नेतोरसातळांक्रोधमीन ॥ १० ॥ नामाह्मणेतुझा मीसकळजीवा ॥ तरीकांहाडावाशरणांगता ॥११॥ ३०९॥

माझ्यामनेंतुझ्याचरणींदिलीमिठी ॥ इंद्रियेंहिंपुटींहोउनीठेलीं ॥ १ ॥ आतांविषयसुखतयांनाठवेकांहीं ॥ सुख तुझेपाईंठेवियेलें ॥ २ ॥ नामाह्मणेसंतींदाखविलीसोय ॥ जेणेंविठोबाचेंराहेप्रेमहृदईं ॥ ३ ॥ ॥ ॥३१०॥

मनमाझेंचोरटेंलागलेंकुसंगीं ॥ बांधिलेंषड्वर्गींधरूनियातें ॥ १ ॥ केउतागेलासीमाझ्याकृपावंता ॥ येगापंढरीनाथामायबापा ॥२॥ वासनेचीबेडीघालुनीमाझ्यापाईं ॥ विषयवज्रघाईंत्रासतोंमीं ॥३॥ आशातृष्णामायाआणीकते कल्पना ॥ करितीकामनानानाविध ॥४॥ कामक्रोधलोभलावितातीचाळा ॥ येमाझ्यागोपाळासोडवण्या ॥५॥ नामाह्मणे माझेंनानाचित्तवित्त ॥ करीकाबंधमुक्तसंसारींचें ॥६॥३११॥

प्रियनाहींरायावर्जियेलीकांता ॥ परीतिचीसत्ताजगावरी ॥ १ ॥ तैसेदंभीजहालोंपरीतुझेभक्त ॥ वासयमदूतनपाहतीं ॥ २ ॥ रायाचापैंपुत्रअपराधीदेखा ॥ तोकायआणिका दंडवेल ॥३॥ बाहात्तरखोडीएकदेवमणीकंठीं ॥ तैसामीजगजेठीह्मणेनामा ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥३१२॥

आह्मींशरणांगतींकेलासीसरता ॥ येऱ्हवींअनंताकोण जाणे ॥ १ ॥ वेदींशास्त्रींपुराणींउबगोनीसांडिलासी ॥ तो तूंआह्मींधरिलासीहृदयकमळीं ॥ २ ॥ चतुराशिरोमणी अहोकेशीराजा ॥ अंगीकारतुझाकेलाआह्मीं ॥ ३ ॥ सहस्त्र नामींजरीजाहलासीसंपन्न ॥ तरीहेंहीभूषणआमुचेंचि ॥४॥

येऱ्हवींत्यानामाचीकवणजाणेसीमा ॥ पाहेमेघशामाविचा-
रूनी ॥ ५ ॥ होतासीक्षीरसागरींअनाथाचेपरी ॥ लक्ष्मीते
करीचरणसेवा ॥ ६ ॥ तेहीतंवजाणआमुचीजननी ॥ तूं
तियेवांचुनीशोभसीकैसा ॥ ७ ॥ तुजनाहींनामजातिनाहीं
कुळ ॥ अनादीचेंमूळह्मणतितुज ॥ ८ ॥ आम्हीभक्ततरी
तूंभक्तवत्सल ॥ ऐसाप्रगटबोलजगामाजीं ॥ ९ ॥ ऐसीआ-
मुचेनिभोगिसीथोरीव ॥ आमुचाजीवभावतुझेपाईं ॥१०॥
नामाह्मणेकेशवाजरीहोसीजाणता ॥ ययाबोलाउचिताचि-
त्तदेईं ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३१३ ॥

आह्मींशरणांगतपरिसखेउदार ॥ भक्तीचेसागरसत्व-
शीळ ॥ १ ॥ कायावाचामनेंअर्थसंपत्तिधन ॥ दिधलेंतुज
लागूनपांडुरंगा ॥ २ ॥ आह्माऐसेंचित्ततुह्माकैंचेंदेवा ॥ हा
बडीवारकेशवानबोलावा ॥ ३ ॥ सत्वाचासुभटबळीचक्र
वर्तिं ॥ पहाकेव्हडीख्यातिकेलीतेणें ॥ ४ ॥ त्रिभुवनींचेंवै-
भवजोडिलेंज्यालागुनी ॥ तेंशरीरतुझेचरणींसमर्पिलें ॥५॥
रावणाऐसाबंधुमांडुनीसधर ॥ गतीपरिवारब्रह्मादिक ॥६॥
तेसांडोनीएकसराआलासेधांवत ॥ जहालाशरणांगतबि-
भीषण ॥ ७ ॥ हिरण्यकश्यपेंतुझ्यापैसंबंधें ॥ पाहेत्याप्र-
ल्हादागांजियेलें ॥ ८ ॥ अजगरकुंजरकरितांअग्निपान ॥
परीतुझेंस्मरणनसंडीच ॥ ९ ॥ पतिपुत्राचास्नेहसांडुनी
गोपिका ॥ रासक्रीडेदेखाभाळलिया ॥ १० ॥ एकींतुझें
ध्यानकरितांत्यजिलाप्राण ॥ सांगऐसेंनिर्वाणकोणींकेलें ॥
॥ ११ ॥ ऐसेमागेंपुढेंझालेअसंख्यात ॥ भक्तभागवतसखे
माझे ॥ १२ ॥ त्यांचेनिसरताझाळासीत्रिभुवनीं ॥ विचा-

रीआपुलेमनींपांडुरंगा ॥ १३ ॥ केलेउपचारबोलतांलाजी-
रवाणे ॥ हासतीपिसुनेंसंसारींचीं ॥ १४ ॥ नामाह्मणेअहो
केशवाशिरोमणी ॥ निकराजाल्ह्मणींमायबापा॥१५॥३१४॥

उदाराचाराणाह्मणविसीआपणा ॥ सांगत्वांकवणाका-
यदिलें ॥ १ ॥ उचिताउचितभजसीपंढरीनाथा ॥ नबो-
लोंसर्वथावर्मतुझें ॥ २ ॥ वर्मतुझेंकांहींबोलेंनमीआतां ॥
क्षमापंढरीनाथाकरीबापा ॥ ३ ॥ नघेतांनदेसीआपुलेंतूं
कोण्हा ॥ प्रौढीनारायणानबोलावी ॥ ४ ॥ बाळमित्रसुदा-
माविपत्तींपीडिला ॥ तोभेटावयाआलातुजलागीं ॥ ५ ॥
त्याचेमुष्टीपोहेसाठींमनकेलेंआसट ॥ मगदिलेंउत्कृष्टभाग्य
तया ॥ ६ ॥ छळावयापांडवदुर्वासपातला ॥ द्रौपदीनेंके-
लाधांवातुझा ॥ ७ ॥ येवढियेआकांतींघेउनीभाजीपान ॥
मगदिलेंअन्नऋषीलागीं ॥ ८ ॥ बिभीषणादिधलीसुवर्णा-
चीनगरी ॥ हेकीर्तितुझीहरिवाखाणिती ॥ ९ ॥ वैरियाचें
घरभेदेंत्वांघेतलें ॥ त्याचेंत्यासदिधलेंनवलकाई ॥ १० ॥
ध्रुवआणिप्रल्हादअंबऋषिनारद ॥ हरिश्चंद्ररुक्मांगदआ-
दिकरुनी ॥ ११ ॥ त्यांचेंसेवाऋणघेउनीअपार ॥ मगत्या
देसीवरअनिर्वाच्य ॥ १२ ॥ येकाचेंशरीरसंपत्तिआणि
वित्तें ॥ येकाचींतींचित्तेंहिरूनिघेसी ॥ १३ ॥ मगतयातूं
देसीआपुलेंपद ॥ जगदानीहेंब्रीदह्मणविसी ॥ १४ ॥ मा-
झेंसर्वस्वघेईतुझेंनकोकांहीं ॥ मनोरथाचीनाहींचाडमज ॥
॥ १५ ॥ नामाह्मणेकेशवाजन्मजन्मांतरीं ॥ ऋणीकरीन
हरिसेवाऋणें ॥ १६ ॥ ॥ ॥ ॥३१५॥

निर्गुणनामाच्याअनंतकल्पना ॥ धरुनीनारायणाव्य-

कीसीयेसी ॥ १ ॥ लाजलावियेलीत्यानिर्गुणपणा ॥ श्रु-
तीच्यावचनावाखाणितां ॥ २ ॥ तैसेंआह्मींनहोकरणीचे
विलगट ॥ नामेंचिनिकटदासतुझे ॥ ३ ॥ चतुराशिरोम-
णीनंदाचाखिल्लारी ॥ हेंअघटितमुरारीनामजरी ॥ ४ ॥
तुमचेंतुह्मादेवासांगतांतेंनिकें ॥ समर्थासीरंकेंबोलिजेकेवीं
॥ ५ ॥ देवामुगुटमणीबोलतीपुराणें ॥ आणिबळीचेंराख-
णेंद्वारकाय ॥ ६ ॥ अर्जुनाचासारथीरथवागविसी ॥ उ-
च्छिष्टेंकाढिसीधर्माघरीं ॥ ७ ॥ विश्वंभरनामतुझेंकमळाप-
ति ॥ जगींश्रुतिस्मृतिवाखाणिती ॥ ८ ॥ गौळियाचेघ-
रींदहींलोणीचोरुनी ॥ खातांचक्रपाणीलाजसीना ॥ ९ ॥
आतांदीनानाथब्रीदतुझेंसाचें ॥ तरीभूषणआमुचेंजतनक-
री ॥१०॥ येरठेवाठेवीकायसीआह्माआतां ॥ नामाविनवि-
ताकेशीराजा ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥३१६॥

लाजसांडोनियांझालोंशरणांगत ॥ ऐसीयाचाअंतपहा-
सीझणीं ॥ १ ॥ गुणदोषमाझेमनींगानधरी ॥ पतितपावन
जरीह्मणविसी ॥ २ ॥ परावेंपरदेशीहेंलाजकोणासी ॥ ज-
रीतूंनपावशीपांडुरंगा ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवाचतुराशिरो-
मणी ॥ विचारीअंतःकरणींमायबापा ॥ ४ ॥ ॥ ३१७ ॥

आम्हीजरीपतिततरीतूंपावन ॥ नपावतांजाणलाजको-
णा ॥ १ ॥ पतितमीभलाकींपावनतूंभला ॥ हेंसांगपावि-
ठ्ठलामायबापा ॥ २ ॥ परिसाचेंमहिमानकैसेंनिवाढतें ॥
निर्माणनसतेंलोहजरी ॥ ३ ॥ कल्पतरुचीकीर्तिकैसेंनि
वाढती ॥ जरीकल्पनानसतीयाचकासी ॥ ४ ॥ प्रजाचेंपा-

ळणरायराजेश्वरा ॥ तैसाचीविचारआह्मांतुह्मां ॥५॥ नामाह्मणेसर्वआहेतेंआमुचें॥देवातुजकैचेंक्रियाकर्म॥६॥३१८॥

कायचाडआह्माबाहिरल्यावेषें ॥ सुखाचेंकारणतेंअंतरींअसे १ ॥ भीतरींपालटजंवनाहींझाला ॥ तंववरीनबोलाजाणपण ॥ २ ॥ चंदनाचेसंगेंहेकळिठाकली ॥ नावेंपरिउरलींपालटदेहा ॥ ३ ॥ नामाह्मणेऐसेंसांगामजकोणी ॥ जेणेंकेशवयेउनीहृदयींराहे ॥ ४ ॥ ॥ ३१९ ॥

विषयींआसक्तभ्रांतमाझेंमन ॥ नकरीतुझेंध्यानपंढरीराया ॥ १ ॥ नाथिलासंकल्पकरीनानाविध ॥ तेणेंथोरखेदपावतसे ॥ २ ॥ आयुष्यअसेपरीनसरेकल्पना ॥ भोगवीयातनानानाविध ॥ ३ ॥ जन्ममरणकष्टभोगितांसंकष्टीं॥ येरझारींहिंपुटीमनहोतें ॥ ४ ॥ ऐसामीअपराधीदुराचारी देवा ॥ भेटसीकेशवाकवणेपरी ॥ ५ ॥ मायामोहेंसदाभ्रांतमाझेंचित्त ॥ चुकलोंनिजहितनारायणा ॥ ६ ॥ तूंअनाथकैवारीब्रिदावळीहारी॥सोडवीमुरारीनामाह्मणे ॥७॥३२०॥

आडलियाकोंवसाअनाथाकैवारी ॥ ब्रीदचराचरींवर्णितातीं ॥ १ ॥ येईंबाश्रीहरितूंआमुचाकैवारी ॥ सुदर्शन करींयेईंशीघ्र ॥ २ ॥ गजेंद्राकारणेंकळवळलाअगाध ॥ जगींतुझेंब्रीदतैसायेईं ॥ ३ ॥ सुदामाब्राह्मणअनाथदुर्बळ ॥ तेथेंतूंकेवळअवतरलासी ॥ ४ ॥ ध्रुवासीस्थापिलेंउपमन्याकारणें ॥ क्षीरसागरदेणेंतैसायेईं ॥ ५ ॥ अंबऋषिसाठीं सोसीगर्भवास ॥ दुर्वासाकासाविसतैसायेईं ॥ ६ ॥ विदुरासीभक्तपणतूंउद्धवासीजवळी ॥ अर्जुनासर्वकाळींतैसायेईं ॥ ७ ॥ गोपाळयशोदानंदांसीखेळसी ॥ गाईरानींचा-

रिसीतैंसायेई ॥ ८ ॥ नामाह्मणेमागेनसदांअभयकर ॥ प्रेमाचाउदारतैंसायेई ॥ ९ ॥ ॥ ॥ ३२१ ॥

पतितपावनब्रीदसोडवीनआतां ॥ तरीचपंढरीनाथा दासतुझा ॥ १ ॥ माझेगुणदोषनधरावेमनीं ॥ तारिलेंमजहुनीकोणवंद्य ॥ २ ॥ अजामेळाअधिकारन्यावयावैकुंठा॥ माझियाअदृष्टाकायझालें ॥ ३ ॥ पित्यासीपतनस्वामीचीकरणी ॥ गणिकाविमानींकीर्तिकोण ॥ ४ ॥ शिशुपाळें शिव्यादिल्यासभेआंत ॥ त्याहूनिपतितथोरझालों ॥ ॥ ५ ॥ नामाह्मणेपुढतीबोलेंतुझेंवर्म ॥ अंगीकारुनीप्रेम देईंदेवा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥३२२॥

कृपेच्यासागराभक्तकरुणाकरा ॥ परियेसीउदाराकेशीराजा ॥ १ ॥ मजघातलेंसंसारींकाळाचेआहारीं ॥ करुणा कैसीहरितुजनये ॥ २ ॥ माझीसोडवणकराकृपानिधी ॥ तोडीहेउपाधीसंसारींची ॥ ३ ॥ पुत्रकलत्रबंधुसांगातीदेहाचे ॥ बांधलेमोहाचेवज्रपाशीं ॥ ४ ॥ तिंहींमाझेंचित्तकेलें तडातोडी ॥ नाहींयेकवडीसुखलेश ॥ ५ ॥ सकाळिकसांगातीसंभारकामाचे ॥ परीनदेतीनामाचेंस्मरणकोण्ही ॥६॥ दुःखाचेडोंगरपडिलेमजवरी ॥ धांवगाश्रीहरिपांडुरंगा ॥ ॥ ७ ॥ ऐसासुखगोष्टीनकरितीमजकोण्ही ॥ जहालोंचक्रपाणीपरदेशी ॥ ८ ॥ शिणलीयानह्मणतीबैसघेविश्रांति ॥ आठवीयाश्रीपतिपांडुरंगा ॥ ९ ॥ सकळाचेंदास्यकेलेंथोर आशा ॥ मानिलाभरंवसाहोतीलह्मणोनि ॥ १० ॥ तंवतीं भजतीआपुलियाहिता ॥ नकरितीमाझीचिंतापरलोकींची ॥

॥ ११ ॥ ऐसादुर्जनाचाकरुनीपातेरा ॥ केलाम्यांमातेरा आयुष्याचा ॥ १२ ॥ कुटुंबकावाडीसदाकानकोंडा ॥ जहालोंयाब्रह्मांडामूमीभार ॥१३॥ ऐसींकरुणेचींवचनेंऐकोनी पंढरीरायें ॥ कटावरीबाहेउभारिली ॥ १४ ॥ नाभीनाम्या भयनधरीसर्वथा ॥ माझ्याशरणांगताकोणगांजी॥१५॥३२३

कळावंताचीकळाकुसरी ॥ तेमीनेणेंगाश्रीहरि ॥ १ ॥ वाराधांवेभलत्याठायां ॥ तैसीमाझीरंगछाया ॥ २ ॥ प्रेमभातेभरलेअंगीं ॥ तेणेंछंदेंनाचोंरंगीं ॥३॥ घातमातनेणेंदेवा ॥ नामाविनवितसेकेशवा ॥ ४ ॥ ॥ ३२४ ॥

भुक्तिमुक्तिमागोंतुज ॥ तरीमजलाहांसतीपूर्वज ॥ १ ॥ मजप्रेमपढियेंदेवा ॥ नमगेंआनकांहींसेवा ॥ २ ॥ चाडधरीनब्रह्मज्ञानीं ॥ तरीमजव्यर्थव्यालीजननी ॥ ३ ॥ होईंमासिद्धीचासाधिता ॥ देवेंसांडिलोंतत्वता ॥ ४ ॥ मोक्षमागोंतुजप्रति ॥ संतछळवादेंहांसती ॥५ ॥ नामाह्मणेकांहींन मगें ॥ उभाराहीनसंतामागें ॥ ६ ॥ ॥ ॥३२५॥

माझाभावतुझेचरणीं ॥ तुझेंरूपमाझेनयनीं ॥ १ ॥ सांपडलोंयेकमेकां ॥ जन्मोंजन्मींनाहींसुटिका ॥ २ ॥ त्वांतोडिलीमाझीमाया ॥ मीजडलोंतुझियापाया ॥३॥ त्वांबामज केलेंविदेही ॥ म्यांतुजधरिलेंहृदयीं ॥ ४ ॥ नामाह्मणेगासुजाणा ॥ सांगलटिकेंकेलेंकोणा ॥ ५ ॥ ॥ ३२६ ॥

देहजावोअथवाराहो ॥ पांडुरंगींदृढभावो ॥ १ ॥ चरण नसोडींसर्वथा ॥ तुझीआणपंढरीनाथा ॥ २ ॥ वदनींतुझें मंगळनाम ॥ अखंडसदोदितप्रेम ॥ ३ ॥ जैसाजैसाअसे-

लभोग ॥ तैसातैसाघडेलयोग ॥ ४ ॥ नामाह्मणेकेशवरा-
जा ॥ केलानेमचालवीमाझा ॥ ५ ॥ ॥ ॥ ३२७ ॥

देवातूंहोसीजयाप्रसन्न ॥ तयानबाधीकर्मबंधन ॥ निके
म्हणतीसकळजन ॥ विश्वलोकवंदिती ॥ १ ॥ तुझीदृष्टिकृ-
पावंता ॥ जयावरीपडेअनाथनाथा ॥ तयानबाधीसंसार-
व्यथा ॥ सर्वस्वत्याचेंहरिसी ॥ २ ॥ मातीधरलियाहोय
कनक ॥ भोगभोगितीपरममूर्ख ॥ नातळतीमहादोष ॥
मुखींनामगर्जतां ॥ ३ ॥ धन्यधन्यतेसंसारीं ॥ होकापुरुष
अथवानारी ॥ दरिद्रनाहींत्यांचेघरीं ॥ तूंश्रीहरिसानुकूळ
जाहलिया ॥ ४ ॥ रिद्धीसिद्धीद्वारींओळंगती ॥ वैरीदास्य
करिती ॥ विषेंअमृतेंहोतीं ॥ तूंश्रीपतिसानुकूळजाहलि-
या ॥ ५ ॥ येथूनिनेसीलपरतें ॥ नामाह्मणेवैकुंठावरतें ॥
लक्षानयेचहूवेदांतें ॥ नानामतेंधुंडाळितां ॥ ६ ॥ ३२८ ॥

पहापरदाराजननीसमान ॥ परद्रव्यपाषाणह्म-
णोनिमानी ॥ १ ॥ निंदेसीतूंमुकाहोउनीतत्त्वतां ॥ परद्वे-
षींतत्त्वतांनघालीबुद्धि ॥ २ ॥ ऐसेंदृढमनींधरुनीराहसी ॥
तरीमाझेंपावसीनिजपद ॥ ३ ॥ पराकारणेंप्राणवेंचीजो
सर्वथा ॥ जाणेंपरव्यथाकळवळोनी ॥ ४ ॥ परसुखेंसंतोष
धरीजोमानसीं ॥ जरीतुजपरलोकासीजाणेंआहे ॥ ५ ॥
देहाचाअभिमाननधरावाचित्तीं ॥ धरावीउपरतीउपशमु ॥
॥ ६ ॥ सर्वकाळप्रीतिसंताचीसंगति ॥ गावींअनुरागेंप्रीतीं
नामेंमाझीं ॥ ७ ॥ सर्वांभूतींदेवऐसीसमबुद्धि ॥ सांडा-
वीउपाधीप्रपंचाची ॥ ८ ॥ सर्वकाळींपरमात्माअसेसर्वदे-
हीं ॥ भावनाअहर्निशींहीदृढधरी ॥ ९ ॥ संतसमुदायमिळ-

तीजेथेंजेथें ॥ जावेंतेथेंतेथेंलोटांगणीं ॥ १० ॥ चिंतानक-रीनाम्यायेणेंतरसीजाण ॥ तुजसांगितलीखुणनिर्वाणीं-ची ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३२९ ॥

सगुणनिर्गुणजयाश्रुतिबोलती ॥ तोतूंमाझ्याचित्तींपंढ-रीराया ॥ १ ॥ आहेसीतितुकेंतूंचिसर्वगत ॥ तेथेंमीअनाथ कायवानूं ॥ २ ॥ चरणाचीआवडीनसंडिजेमनें ॥ यापरी पोसणेंतुझेंदेवा ॥ ३ ॥ साक्षभीमरथीसंतपुंडलीक ॥ नामा ह्मणेआणीकनकळेकांहीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ३३० ॥

सुंदरपणेंसुंदरबापमदनाचा ॥ तोस्वामीआमुचापंढरी-राव ॥ १ ॥ जुंझारपणेंबापसुराअसुरांचा ॥ तोस्वामीआ-मुचापांडुरंग ॥२॥ उदारपणेंबापउदारत्रैलोक्याचा ॥ तो स्वामीआमुचापांडुरंग ॥३॥ चतुरपणेंबापचतुराननाचा ॥ तोस्वामीआमुचापांडुरंग॥४॥पवित्रपणेंहाबापपैंगंगेचा॥ तो स्वामीआमुचापांडुरंग ॥५॥ नामाह्मणेहाचिबापपैंविश्वाचा॥ तोस्वामीआमुचापांडुरंग ॥ ६ ॥ ॥ ॥ ३३१ ॥

झणीदृष्टिलागोंतुझ्यासगुणपणा ॥ तेणेंमाझ्यामनाबोध केला ॥ १ ॥ अनंताजन्मींचेंविसरलोंदुःख ॥ पहातांतुझें मुखपांडुरंगा ॥२॥ योगियाचेध्यानींध्यातांनातुडसी ॥ तो तूंआम्हापाशींमागेंपुढें ॥ ३ ॥ नामाह्मणेंजीवेंकरीननिंब-लोण ॥ विटेसहितचरणओवाळीन ॥ ४ ॥ ॥३३२॥

उठोनिप्रातःकाळींअक्षताकचोळीं ॥ निघेवोळावोळींम-हाद्वारीं ॥ १ ॥ अहोजीदाताराविनंतिअवधारा ॥ तुह्मीं यावेंघरांभोजनासी ॥ २ ॥ रखुमाईमातेतुह्मींयावेंतेथें ॥ सामुग्रीसांगातेंचालवावी ॥३॥ सडासंमार्जनहेंमाझेंकरणें ॥

उदकभरीनसुगंधेंशी ॥४॥ शेषपत्रापळीकाढीनउष्टावळी ॥ नित्यवोळावोळींहेंचिकाम ॥ ५ ॥ नामाह्मणेदेवातुमचेंतुह्मीं जेवा ॥ प्रसादह्याठेवासेवकासी ॥ ६ ॥ ॥ ३३३ ॥

उडालीपक्षिणीजायअंतराळीं ॥ चित्तअविसाळींठेऊनि-या ॥ १ ॥ तैसेंमाझेंमनराहोंकांईश्वरीं ॥ मगसुखेंसंसारीं असेनाका ॥ २ ॥ धेनुचरेवनींवत्सअसेघरीं ॥ चित्तवत्सा-वरीठेऊनिया ॥ ३ ॥ दुडीवरीदुडीसखीसींगोष्टीकरी ॥ चि-त्तदुडीवरीठेऊनिया ॥ ४ ॥ विष्णुदासनामाविनवीपरोप-रीं ॥ तेंप्रेमश्रीहरिदेईमज ॥ ५ ॥ ॥ ॥३३४॥

माझ्यामनेंतुझ्याचरणींदिलीबुडी ॥ इंद्रियेंबापुडींवेडा-वलीं ॥ १ ॥ आतांविषयसुखजाणावेंतेंकोणें ॥ जाणोनि भोगणेंस्वामीसुख ॥ २ ॥ देहहेंसहजराहिलेंनिष्काम ॥ हृ-दईसदाप्रेमवोसंडत ॥३॥ नामाह्मणेकेशवाकृपेच्यासागरा ॥ तूंआह्मासोयराआदिअंतीं ॥ ४ ॥ ॥ ॥३३५॥

बाहेरींभीतरींतुजचिमीदेखें ॥ चित्ततेणेंसुखेंवेडावलें ॥ ॥ १ ॥ संतसंगेंमजहापालटजाहला ॥ पाहतांविठ्ठलारूप तुझें ॥ २ ॥ वृत्तिसहितमनआनंदींबुडालें ॥ ननिघेकांहीं केलेचित्तमाझें ॥३॥ नामाह्मणेएकउरलीसेवासना ॥ स्वा-मीसेवकपणादेईदेवा ॥४॥ ॥ ॥ ॥३३६॥

पाहतांतुझेंचरणहरलीभवव्यथा ॥ पुढतिएकाचिंतावाट-तसे ॥ १ ॥ ह्मणीमुक्तिपददेशीपांडुरंगा ॥ मगयासंतसंगा कोठेंपाहूं ॥ २ ॥ मगहेपंढरीआनंदसोहळा ॥ कवणाचेडो-ळांपाहूंदेवा ॥ ३ ॥ मगहेहरिकथाअमृतसंजीवनी ॥ कव-

णाचेश्रवणींऐकोंदेवा ॥ ४ ॥ नामाह्मणेमजपंढरीचीसोय ॥ अनंतजन्महोययाचिलागीं ॥ ५ ॥ ॥ ॥३३७॥

लोखंडाचारवापारिसेंशीलागला ॥ तोमागिलीयामोला केवींपावे ॥ १ ॥ तैसेतुझेपायवंदिलेश्रीरंगा ॥ ह्मणोनिया जगावंद्यझालों ॥२॥ काष्ठींहोतातोहाकाष्ठींकामाविला ॥ नामजोपावलादेवपाट ॥ ३ ॥ दासीहोतीरंगींदेवत्याचेअंगीं ॥ तिसीनानाभोगींउपचारिती ॥ ४ ॥ गांवरसहोतातोगंगेसी मिळाला ॥ निंद्यउद्धरिलानामेंएका ॥ ५ ॥ ऐसाबहुतापुण्यें जोडलासीआह्मा ॥ विनवितसेनामाकेशीराजा ॥६॥३३८॥

निंदाआणिस्तुतितुझीचकरणें ॥ परीआणिकाचेनघेणेंगुणदोष ॥ १ ॥ वैरअथवासख्यतुझीयेठाईं ॥ परीनपडोंहृदईंविसरतुझा ॥ २ ॥ दास्यअथवासत्तागोपाळाचेपरी ॥ असोतुजवरीसर्वलोभ ॥ ३ ॥ जिणेंअथवामरणेंतुझीयेद्वारीं ॥ उदासनरहरिकरिसीझणें ॥ ४ ॥ नामाह्मणेथोरशिणलोंपंढरीनाथा ॥ स्वामीचेंनेणतांप्रेमसुख ॥ ५ ॥ ॥३३९॥

तुझाप्रेमामाझेदाखवीमनातें ॥ मगतुझेचरणातेंनविसंबें ॥ १ ॥ कांमजशिणवीसीथोडियाकारणें ॥ कायतुझेंउणेंहोईलदेवा ॥ २ ॥ चातकासीतहानपुरवितांजळधर ॥ काय याचेंसरेथोरपण ॥ ३ ॥ चंद्रचकोराचापुरवीसोहळा ॥ कायत्याच्याकळान्यूनहोती ॥ ४ ॥ कूर्मीअवलोकीआपुलिया बाळा ॥ कायातिचीडोळादिठिनासे ॥५॥ नामाह्मणेमजतुझाचिभरंवसा ॥ अनाथाकोंवसाहोसीदेवा ॥ ६ ॥ ३४० ॥

तुझाविष्णुदासह्मणतातीजगीं ॥ परीनाहींअंगींप्रेमभाव ॥ १ ॥ तेणेंथोरलाजवाटेपंढरीराया ॥ येमाझ्याहृदयांये-

कवेळां ॥ २ ॥ द्वेषाद्वेषभावअसेमाझ्याठाईं ॥ अनुभवतु-
ज्ञानाहींप्रेमसुख ॥३॥ साकारलेंरूपतेंदिसेचर्मचक्षु ॥ परी
नाहींवोळखीकवणेमानें ॥४॥ देखोवेखींवैसेंसंताचेसंगती ॥
नाहींमाझेचित्तींध्यानतुझें ॥ ५ ॥ नामाह्मणेमाझाउजळक-
रीमाथा ॥ भेटीदेउनीसंतानिरवीमज ॥ ६ ॥ ॥ ३४१॥

अठ्ठाविसयुगेंउभाविटेवरी ॥ मुद्राअगोचरीलाऊनिया ॥
॥ १ ॥ध्यानविसर्जनकेधवांकरिसी ॥ नेणवेकोणासीब्रह्मा-
दिकां ॥ २ ॥ पहातांतुजकडेमाझेंमीपणउडे ॥ भेदाचेंसां-
कडेंहरपलें ॥ ३ ॥ तुजपाशींअसतांमुक्तिजेजीविता ॥ ठक-
लेतत्त्वतांनेणोंकिती ॥ ४ ॥ नामाह्मणेस्वामीकृपादृष्टींपाहे ॥
मनपाईंराहेऐसेंकरी ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥३४२॥

माझियामनाचेंहिंडणेंजेजेठायीं ॥ तेथेंतेथेंराहीपांडुरंगा
॥ १ ॥ भीमाचंद्रभागावैकुंठपंढरी ॥ दावीदृष्टिभरीनिरंतर
॥ २ ॥ तैसाचिअंतरींयेऊनियाराहे ॥ सगुणसुंदरहोयस-
दोदित ॥ ३ ॥ कटींकरविटेसमचरणगोमटे ॥ पहातांअ-
तिनिकटहेंचिध्यान ॥४॥ पुरवीमाझीआसतूंबापमाउली ॥
करीमजसाउलीपद्मकरें ॥ ५ ॥ नामाह्मणेझणेंकरिसीउदा-
स ॥ होतीकासाविसप्राणमाझे ॥ ६ ॥ ॥ ३४३ ॥

छंदिस्तहेंमनमाझेंपंढरीनाथा ॥ नसोडींसर्वथाचरणतु-
झे ॥ १ ॥ यासीकायकरूंसांगजीविठ्ठला ॥ स्नेहकांलावि-
लापूर्वींहूनि ॥२॥ कांसवीचींपिलींसोडोनीनिराळीं ॥ दृष्टि
पान्हायेलीअमृतमय ॥३॥ तैसामीजवळीनीअसेपैंदूरी ॥ दृ-
ष्टिमजवरीअसोंद्यावी ॥४॥ तान्हेवत्सघरींधेनुचरेवनीं ॥ हुं-

वरेपरतोनिक्षणक्षणां॥५॥नामाह्मणेदेवासलगीकरीनिकट॥ ह्मणींमजवैकुंठपददेसी ॥ ६ ॥ ॥ ॥ ३४४ ॥

गाणेंमींगाईलेंभाटिववाखाणिलों ॥ जन्मोनियाझालों दासतुझा ॥ १ ॥ आतांमाझीलाजराखीनारायणा ॥ ह्मणीं केविलवाणादिसोंदेसी ॥ २ ॥ मायामोकलिलोंमोहेंदुरावलों ॥ सोयपैंचुकलोंसंसारींची ॥ ३ ॥ अपवर्गींसांडिलों गोत्रजांतुटलों ॥ येउनीनटलोंतुझेपायीं ॥ ४ ॥ नामाह्मणे तुझेचरणाचीआवडी ॥ लागलीनसोडीचित्तमाझें॥५॥३४५

मुळुचंदनाचाउदानुनेत्राचा ॥ अंगाळुहस्ताचास्वामी माझा ॥ १ ॥ मुगुटजयाचाकोंवळ्याआगळकाटी ॥ पवित्र तळवटीचरणज्याचे ॥ २ ॥ सेलतेभागलेपोकुवेडावले ॥ अंगुळीमागीझालेथकिततया ॥ ३ ॥ ढकारावदनाचाआलावणीवय॥जिंव्हाचिरालियानकळेत्यासी ॥४॥ सद्भावेंशरणआवारुजोडोनी ॥ खेचरविसाचरणींविनटला॥५॥३४६॥

तुझेंनामगुणऐकतांश्रवणींनाराध्य ॥ अवलोकनकरितांनयननाराध्य ॥ पूजनकरितांकरनाराध्य ॥ ऐसीनाराणूकध्यावीकमळापति ॥ १ ॥ नरहरिनामेंउदंड ॥ केव्हांहीनसावेंरिकामेंतोंड ॥ खांदींसततकरंडावाहे ॥ मस्तकींअखंडानिर्माल्यहोय ॥ ध्रु० ॥ २ ॥ तुझेंनिप्रसादेंजठरपोषिलें ॥ चरणोदकेंतृष्णाहरणकेलें ॥ नामनृत्यकारितां मनानिवालें ॥ दंडवतकरितांश्रमहरले ॥३॥ गतशयनींविसरनेदावारामा ॥ यापरींनिश्चिंतपरमात्मा ॥ तूंआलीयासी निवारीश्रमा ॥ ऐकेकेशवराजाविनवितोनामा ॥४॥३४७॥

पुलकधर्मेरोमांचजंवनाहींउठिले ॥ सजळनाहींजहाले

नयनजंव ॥ १ ॥ तंवहरिभक्तीचेंसुखकळलेंजेह्मणती ॥ ल-
टिकेंबोलिजेतीउभयलोकीं ॥ २ ॥ ऐसाभक्तिप्रेमादेईमज
देवा ॥ सर्वभावेंसेवाघडेतुझी ॥३॥ श्रवणींऐकतांनामवाचें
बोले ॥ नाहींसुखपावलेंमनत्याचें ॥ ४ ॥ श्रीहरीचेंनाम
ह्मणवितांनह्मणे ॥ मासहजउच्चारणेंकैसेंत्यासी ॥ ५ ॥
दर्दुराचीपरीजिव्हावटवटी ॥ नामसांडोनीगोष्टीराज्याची
करी ॥६॥ देवाचियामूर्तिसंतमहंतदेखोनी ॥ नवजेलोटां-
गणींभावेंत्यांसी ॥ ७ ॥ नलावीत्यांचेंरजटकमकापाहात ॥
बुजवणतैसेंसेतराखतसे ॥ ८ ॥ ऐसेएकप्राणीआहेतीमूढम-
ति ॥ हितसांगतांचित्तींदुःखवाटे ॥९ ॥ नामाह्मणेकेशवामी
गातुझेंदीन ॥ नेणोंतुजवांचूनआनदुजें ॥ १० ॥ ३४८ ॥

कोटिसूर्यप्रभादीप्ति ॥ गगनींझळकलीअवचितीं ॥ १ ॥
संतनामयासींसांगती ॥ पैलआलाकमळापति ॥ २ ॥ व-
त्सालागींजैसीधेनु ॥ तैसाधांवेंजगजीवनु ॥ ३ ॥ गरुडाचे
पक्षवाती ॥ दाहीदिशाआक्रंदती ॥ ४ ॥ हरिकंठींचीसुम-
नमाळा ॥ सुटूनिआलीभूमंडळां ॥ ५ ॥ उचलोनीदोहींबा-
हीं ॥ नामधरिलाहृदईं ॥ ६ ॥ ॥ ॥ ३४९ ॥

येतियासीपुसेजातियाधाडीनिरोप ॥ पंढरपुरींनांदतो
माझामायबाप ॥१॥ येईवोयेईवोयेईवोमाउलिये ॥ निढळा-
वरीकरठेउनीवाटपाहें ॥ २ ॥ पीतांबरशेलाकैसागगनींझ-
ळकला ॥ गरुडावरीबैसोनीमाझाकैवारीआला ॥ ३ ॥ वि-
ठोबाचेंराज्यआह्मानित्यदिवाळी ॥ विष्णुदासनामाजीवें
भावेंवोवाळी ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ३५० ॥

तूंमाझीमाउलीमीतुझातान्हा ॥ पाजीप्रेमपान्हापांडुरंगे ॥ १ ॥ तूंमाझीगाउलीमीतुझेंवांसरूं ॥ नकोपान्हाचोरूंपांडुरंगे ॥२॥ तूंमाझीपक्षिणीमीतुझेंअंडज ॥ चाराघालीमज पांडुरंगे ॥३॥ तूंमाझीहरणीमीतुझेंपाडस ॥ नकोतोडूंवास पांडुरंगे ॥ ४ ॥ कांसवीचीदृष्टिसदांबाळावरी ॥ तैसीदया करीपांडुरंगे ॥ ५ ॥ नामाह्मणेविठोभक्ताच्यावल्लभा ॥ मागें पुढेंउभासांभाळीत ॥६॥ ॥ ॥ ॥३५१॥

निजाचेंनिजभुवनसांडोनीवैकुंठ ॥ येथेंवाळुवंटआवडलें ॥ १ ॥ देवगूजसांगेपंढरीसीयारे ॥ प्रेमसुखघ्यारेनाममाझें ॥ २ ॥ कायावाचामनेंदृढधराजीवीं ॥ सर्वमीचालवींभार त्याचा ॥ ३ ॥ तारीनभवसिंधुघ्यारेमाझभाक ॥ साक्षपुंडलीककरुनीसांगे ॥ ४ ॥ हेंजरीलटिकेंनामयासीपुसा ॥ त्याआहेभरंवसानामींमाझ्या ॥ ५ ॥ ॥ ॥३५२॥

जननीयेजीवलगेमाझेपांडुरंगे ॥ शिणलोंभेटदेगेएकवेळे ॥ १ ॥ तूंबापमायह्मणोनिआसकेली ॥ विठ्ठलेपाहिलीवास तुझी ॥ २ ॥ करुणाकल्लोळणीअमृतसंजीवनी ॥ चिंतितां निर्वाणींपावसील ॥ ३ ॥ तुजपरतेंदैवतकोणपैंहोईल ॥ तें माझेंजाणेलजडभारी ॥ ४ ॥ वासनेचेसंगेंशिणलेंमाझेंचित्त ॥ विषयांचेआघातपडतीवरी ॥ ५ ॥ नाहींतुझीसेवाकेलीमनोधर्में ॥ संसारसंभ्रमेंभ्रांतिसदां ॥ ६ ॥ नाहींतुझें नामगाईलेंआवडीं ॥ वाळलीहीकुडीत्रिविधतापें ॥ ७ ॥ नामाह्मणेआईधांवलवलाहीं ॥ बुडतोंचिंताडोहींकाढीमज ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३५३ ॥

संपत्तिसोहळानावडेमनाला ॥ लागलाटकळापंढरीचा॥

॥ १ ॥ जावेंपंढरीसीउद्योगमानसीं ॥ कईएकादशीआषा-
ढीहे ॥ २ ॥ आशाढीकार्तिकीकधींयेह्मणोनी ॥ जातिया
लागूनिपुसतसे ॥ ३ ॥ नामाह्मणेऐसेंआर्तज्याचेमनीं ॥
त्याचीचक्रपाणीवाटपाहे ॥ ४ ॥ ॥ ॥ ३५४ ॥
परब्रह्मअविनाशजेंकाआनंदघन ॥ त्याहुनीचरणगोड
तुझे ॥ १ ॥ तेजीवेंनसोडींअगापंढरीनाथा ॥ जाणसीतत्त्व-
तांहृदयमाझें ॥ २ ॥ परात्परध्याईजेजेंकाअपरंपार ॥ त्या-
चेंहेंजिव्हारपायतुझे ॥ ३ ॥ सच्चिदानंदघनजेथेंहारपेम-
न ॥ त्याहुनीचरणगोडतुझे ॥ ४ ॥ नामाह्मणेतुझेंपाउल
सुकुमार ॥ तेंमाझेंमाहेरविटेवरी ॥ ५ ॥ ॥ ३५५ ॥
देवाविचारितांकोणीनाहींमाझें ॥ जाणोनिचरणतुझेध-
रियेले ॥ १ ॥ हेंचिमाझेंज्ञानहाचिमाझागुरुमंत्र ॥ व्रतत-
पतीर्थचरणतुझे ॥ २ ॥ हेचिमाझीक्रियाहेंचिमाझेंकर्म ॥
हाचिमाझाधर्मचरणतुझे ॥ ३ ॥ हेचिमाझीपूजाहेंचिमाझें
स्तवन ॥ हेंचिमनाध्यानहृदयकमळीं ॥ ४ ॥ हाचि
परमानंदहेंचिज्ञानासिद्धि ॥ लयलक्षसमाधिचरणतुझे ॥
॥ ५ ॥ नामाह्मणेमनेंमानिलाविश्वास ॥ तरलोंगर्भवास
याचिपरी ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३५६ ॥
सद्गुरुचेपायजीवेंनविसंबावे ॥ मनवोवाळावेंवृत्तिसहि-
त ॥ १ ॥ डोळियाचाडोळाउघडिलाजेणें ॥ कैवल्यहीपेणें
दाखविलें ॥ २ ॥ जन्ममरणाचेंफेडिलेंसांकडें ॥ कैवल्य
रोकडेंदाखविलें ॥ ३ ॥ कैवल्याचागाभाविटेवरीउभा ॥
दिसेदिव्यशोभापांडुरंग ॥४॥ मोहरलातरुवरफळेंपुष्पींभा-
रें ॥ तेचिनिर्विकारसनकादिक ॥ ५ ॥ नामाह्मणेमाझीखे-

चरमाउली ॥ कृपेचीसाउलीकेलीमज ॥ ६ ॥ ३५७ ॥

मनमाझेंअंधळेंकपटाचींकवाडें ॥ भक्तिकेवींघडेज्ञानेंवि-ण ॥ १ ॥ कायकरूंदेवामाझीयायादैवा ॥ अभक्तासीभावा केवींहोय ॥ २ ॥ हेमाझेह्मणसीकुबुद्धिलेंकरीं ॥ मागेंकाळ वैरीपावतसे ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवामाझातुझाभाव ॥ तु-झेपाईंठावदेईमज ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥३५८॥

मनुष्यकरिसीतरीझाडफेडीमिसें ॥ परीतुझेद्वारींवसेऐ-सेंकरी ॥ १ ॥ पक्षीकरिसीतरीचारियाचेमिसें ॥ परीतुझे द्वारींवसेऐसेंकरी ॥ २ ॥ वृक्षकरिसीतरीमंडपाचेमिसें ॥ परीतुझेद्वारींवसेऐसेंकरी ॥ ३ ॥ झाडकरिसीतरीतुळसीचे मिसें ॥ परीतु० ॥ ४ ॥ उदककरिसीतरीसडीयाचेंमिसें ॥ परीतु० ॥ ५ ॥ श्वानकरिसीतरीउच्छिष्टाचेमिसें ॥ परी तुझेद्वारींवसेऐसेंकरी ॥ ६ ॥ पाषाणकरिसीतरीपायरीचे मिसें ॥ परीतु० ॥ ७ ॥ नामाह्मणेमजकीर्तनाचेंपिसें ॥ प-रीतुझेद्वारींवसेऐसेंकरी ॥ ८ ॥ ॥ ॥ ३५९ ॥

कायदेतीलदेणारे ॥ दिलेंनाहींरघुवीरें ॥ १ ॥ आजी दिलेंउद्यांनाहीं ॥ ऐसीयासीमागूंकाई ॥ २ ॥ हातपसरूं ऐसेंधुरें ॥ दिलेंकल्पांतींनसरे ॥३॥ नामाह्मणेदेवादिदेव ॥ समर्थमाझापंढरीराव ॥ ४ ॥ ॥ ॥ ३६० ॥

मजगांजल्याचाधांवा ॥ सावधानपरिसावा ॥ १ ॥ विठुसुजाणाच्याराया ॥ धांवमाझ्याकुडावया ॥ २ ॥ माझें मनहेंपामर ॥ भ्रांतीहिंडेदावेदार ॥३ ॥ मोहपाशींमजबां-धिलें ॥ भेणेंवैराग्यसाधिलें ॥४॥ नामाह्मणेकायकरूं ॥ तु-जविणभूमिभारु ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ३६१ ॥

कृपणाचेंधनअसेभूमीआंत ॥ जेथेंजायचित्ततेथेंधन ॥ ॥ १ ॥ ऐसीमजदेवालावावीहेसवे ॥ हेंचिमजद्यावेंपांडुरंगा ॥ २ ॥ जेथेंजेथेंमनजाईलहेंमाझें ॥ तेथेंतेथेंतुझेंरूप भासों ॥ ३ ॥ नामाह्मणेमीसर्वांपरिअज्ञान ॥ विनवींआस करूनपांडुरंगा ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ३६२ ॥

नेत्रतान्हेलेपाजीपाणी ॥ पंढरीचेमायबहिणी ॥ १ ॥ बाळपालखींरडेथोर ॥ मातेआलानिद्राभर ॥२॥ वेगींजागी नहोसीमाये ॥ प्राणजातोकरूंकाय ॥ ३ ॥ नामाआलालोटांगणीं ॥ पायींघातलीलोळणी ॥ ४ ॥ ॥ ॥३६३॥

अपराधाच्याकोडीहीचमाझीजोडी ॥ पतितपावनप्रौढी तुझीदेवा ॥१॥ माझीयानिदैवेंऐसेंचिघडिलें ॥ तूंतंवआपुलें नसंडीसी ॥ २ ॥ सहस्रअपराधघालीमाझेपोटीं ॥ तारी जगजेठीनामाह्मणे ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥३६४॥

सिंपीयाचेकुळींमाझाजन्मझाला ॥ हेतुहागुंतलासदाशिवीं ॥ १ ॥ रात्रींआणिशिवीदिवसांनिशिवी ॥ आराणुकजीवींकदानाहीं ॥ २ ॥ सुईआणिसातळुकात्रीगजदोरा॥ मांडिलापसारासदाशिवीं ॥ ३ ॥ नामाह्मणेशिवीविठोबाचीअंगी ॥ ह्मणोनियांजगींधन्यझालों ॥ ४ ॥ ॥३६५॥

भेटीलागींजीवालागलीसेआस ॥ पाहेंरात्रंदिवसवाट तुझी ॥ १ ॥ पौर्णिमेचाचंद्रचकोराजीवन ॥ तैसेंमाझेंमनवाटपाहे ॥ २ ॥ दिवाळीचेमुळालेकीआसावली ॥ पहातवाटुलीमायबापा ॥ ३ ॥ नामाह्मणेआह्मांलेंकराची जाती ॥ भेटावयाखंतीवाटतसे ॥ ४ ॥ ॥ ३६६ ॥

जळकोपलेंजळचरा ॥ मायबाळानेदीथारा ॥ १ ॥ तेणें जावेंकवण्याठाया ॥ बोलावेगींपंढरीराया ॥ २ ॥ गंगागेली सिंधुपाशीं ॥ जरीतोठावनेदीतिसी ॥३ ॥ नामाह्मणेआलों शरण ॥ तंवत्वांकांधरिलेंमौन्य ॥ ४ ॥ ॥ ३६७ ॥

घेतांदेतांतूंचित्रैलोकींउदार ॥ माझाकांअव्हेरकेलाबापा ॥ १ ॥ तुझीसेवादेईतुझीसेवादेई ॥ तुझीसेवादेईश्रीविठ्ठला ॥ २ ॥ विठाह्मणेकेशवानकोहासंसार ॥ तुझेचरणींध्यानअभ्यंतरदेईमज ॥ ३ ॥ ॥ ॥३६८ ॥

शरणांगतातारुनीअपमाननव्हावा ॥ हेंजरीकेशवाजाणतोसी ॥ १ ॥ तुजसांगणेंनलगेसांगणेंनलगे ॥ तुजसांगणेंनलगेदेवराया ॥ २ ॥ समर्थासांगतांसर्वचिविसर ॥ त्याच्याअभ्यंतरींनराहेबोल ॥ ३ ॥ नामाह्मणेतैसानव्हेसीतूंशहाणा ॥ अठरापुराणांवेडावसी ॥ ४ ॥ ॥३६९॥

नव्हेमाझेंकांहींनव्हेतुजवांचोनी ॥ दुजेंबोझेंघेउनीजड बहु ॥ १ ॥ रंगनानासूत्रींअनेकपुतळे ॥ तैसातुझाखेळनकळेकोणा ॥ २ ॥ नामाह्मणेकेशवाआकळतुझीकरणी ॥ जन्मोजन्मींचरणींठेवीमज ॥ ३ ॥ ॥ ॥ ३७० ॥

आसनींशयनींभोजनींमनींध्यानीं ॥ तुझेचरणदोन्ही मजदेई ॥ १ ॥ पातककल्मषासमुळाचाछेदु ॥ मजपरमानंदुतुझेनामीं ॥ २ ॥ ध्याईहृषीकेशाभक्तजनपरेशा ॥ अनाथाकोंवसागोवळिया ॥३॥ विष्णुदासनामाविनवीमेघशामा संसारश्रमातारीदेवा ॥ ४ ॥ ॥ ॥ ३७१ ॥

तुझातूंआहेसीनाम्यायेकलायेक॥ वायाचिकांशोकवाढविसी ॥ १ ॥ आपुलेमानसींविचारूनिपाहे ॥ सावधहोई

सोयधरीनाम्या ॥ २ ॥ तुझातूंचिदेवतुझातूंचिभक्त ॥ आहेपांसिद्धांतगुरुमुखें ॥ ३ ॥ तुझातूंचिपूज्यतुझातूंचि पूजिता ॥ भजनभजितातुझातूंचि ॥४॥ तुझातूंचिगुरुतुझा तूंचिशिष्य ॥ तुझातूंउपदेशघेईनाम्या ॥५॥ नामाह्मणेके-शवाहेंचिसर्वमाझें ॥ हृदयींचरणतुझेनिरंतर ॥ ६ ॥३७२॥

मोक्षपदजरींअभिलाषीनाचित्तीं ॥ ह्मणीमजअंतरतीच-रणतुझे ॥ १ ॥ निर्वासनाचित्तभजनतुझेंकारितां ॥ ह्मणी सायोज्यतादेसीमज ॥ २ ॥ मगमीकायकरूंवैकुंठनाय-का ॥ ऐसेंप्रेमसुखाकोठेंपाहूं ॥ ३ ॥ ध्यानसुखेंकरूं हृदयकमळीं ॥ पक्षिणीऐसीआळीकारितीह्मणी ॥ ४ ॥ संकल्पेंयावेंवाटेचरणाजवळी ॥ विकल्पकाजळीह्मणीदेसी ॥५॥ नामाह्मणेआतांकांहींचमीनकरी ॥ मजहोतूंकोटीव-रीगर्भवास ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ३७३ ॥

निंबलोणकरूंपंढरीच्यासुखा ॥ आणिपुंडलिकामायबा-पा ॥ १ ॥ पहातांभूमंडळींआणिकनाहींदुजें ॥ पांडुरंगा तुजवांचुनीयां ॥ २ ॥ अणिमादीसिद्धीभक्ताचियेद्वारीं ॥ होउनीकामारीवोळंगती ॥ ३ ॥ परलोकींचेयेतीपरतोनी मागुती ॥ सर्वसुखयेथेंभोगावया ॥ ४ ॥ मुक्तिपदकोणी नेघेफुकासाठीं ॥ तेंहिंडेवाळुवंटींदीनरूप ॥ ५ ॥ भक्ता-चियापायापडेपुढतीपुढतीं ॥ मजकरासांगातीमोक्षह्मणे ॥ ॥ ६ ॥ सत्यलोकींजयासुखाचीशिराणी ॥ तेंआह्मांअनु-दिनींप्रत्यक्षादिसे ॥७॥ बंदिजननामाउभामहाद्वारीं ॥ की-र्तिचराचरींवर्णितसे ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥३७४॥

तुझियाचरणाचेंतुटतांअनुसंधान ॥ जातीमाझेप्राणतत्क्षणीं ॥ १ ॥ मगहेंब्रह्मज्ञानकवणापैंसांगसी ॥ विचारी मानसींकेशीराजा ॥ २ ॥ वदनींतुझेंनामहोतांचिखंडन ॥ शतखंडरसनाहोईलमाझी ॥ ३ ॥ सांवळेंसुंदररूपतुझेंदृष्टीं ॥ नदेखतांउन्मळतीनेत्रमाझे ॥ ४ ॥ तुजपरतेंसाध्यआणीकसाधन ॥ साधकमाझेंमनहोईलभ्रांत ॥ ५ ॥ नामाह्मणेकेशवाअनाथाच्यानाथा ॥ झणींमाझाअंतपहासीदेवा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥३७५॥

श्रीमुखाचीसोयपाहोंह्मणोंजरी ॥ येवढामीअधिकारी कैंचादेवा ॥ १ ॥ चरणाजवळोनीनसावेंजीदूरी ॥ जन्मजन्मांतरींहेंचिदेईं ॥ २ ॥ तुजदेतांसोपेंमजहीतृप्तिअल्पें ॥ सर्वज्ञापैंलोपेज्ञानसांगों ॥ ३ ॥ अनाथाचानाथहेंचिब्रीद साच ॥ नकरावेंउदासनामाह्मणे ॥ ४॥ ॥ ३७६ ॥

आपुलेरूपींमजलपाविसीनिरंतरीं ॥ सबाह्यअभ्यंतरीं आडराहे ॥ १ ॥ परीमजतुजअसावासंवाद ॥ भ्रांतिमाया वोधकायकरी ॥ २ ॥ कामक्रोधलोभदंभहेमदमत्सर ॥ हे वैरीअनिवारमारीमाझे ॥ ३ ॥ नामाह्मणेआम्हीजन्मजन्मांतरींचे ॥ पोसणेघरींचेदासतुझे ॥ ४ ॥ ॥३७७ ॥

देवामाझेंमनठेवीतुझेचरणीं ॥ घालीमाझेनयनींरूपतुझें ॥ १ ॥ मजयालोकाचाशीणअसेमनांत ॥ तुजचिचिंतीत हृदयकमळीं ॥ २ ॥ चंदनाचेवृत्तींवेधलेतरुवर ॥ सबाह्याभ्यंतरकायझालें ॥ ३ ॥ सरितासिंधुमाजींमिळोनी लपाली ॥ सागरचिझालीयेकसरें ॥ ४ ॥ लवणजळाचेंप्रसिद्धचिअसे ॥ ऐक्यभावेंवसेनादिसेकांहीं ॥

॥ ५ ॥ नामाह्मणेशरणआलोंकेशीराजा ॥ ऐसाभावमाझा करीवेगीं ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३७८ ॥

विषयतडातोडीकेलेमाझेंमन ॥ राहिलेंह्मणोनतुझेपाईं ॥ ॥ १ ॥ नकोनकोदेवावासनेचासंग ॥ मजआलाउबगनारायणा ॥ २ ॥ कामक्रोधवैरीपाठीलागींयेती ॥ ह्मणीत्यांचे हातींदेसीमज ॥ ३ ॥ नामाह्मणेहोसीअनाथकोंवसा ॥ ब्रीदजगदीशावर्णिताती ॥ ४ ॥ ॥ ॥ ३७९ ॥

पाहुनीनदिसेलौकीकव्हेव्हारीं ॥ ऐसातूंअंतरींलपवी मज ॥ १ ॥ परीतुझ्याचरणींमाझेंअनुसंधान ॥ तरीप्रेम पावनदेईंदेवा ॥ २ ॥ मनाचियेवृत्तिअखंडतूंराहोनी ॥ झेपावतीह्मणींकामक्रोध ॥ ३ ॥ नामाह्मणेऐसेंपावसीतूंमातें तरीमीजीवेंतुतेंनविसंबें ॥ ४ ॥ ॥ ॥ ३८० ॥

अपत्याचेंहितकरिजेजनकेंनिकें ॥ जरीतेंवेडेंमुकेंजहालें देख ॥ १ ॥ तैसेंमीपोसणेंतुझेंजीवलग ॥ अंतरींचीसांग खूणकांहीं ॥२॥ राखेनमीनामतुझेंसर्वभावें ॥ चित्तवित्तेंजीवेंदेईनबळी ॥ ३ ॥ जरीदैवहीनह्मणसीमजला ॥ तरीलाजकवणाह्मणेनामा ॥ ४ ॥ ॥ ॥ ३८१ ॥

धांउनीजाईनश्रीमुखपाहीन ॥ इडापिडाघेईनविठोबाची ॥ १ ॥ तयासुखाद्दष्टिलागेलबोह्मणीं ॥ मगमीसाजणीकायकरूं ॥ २ ॥ ह्मणोनिमाझेंचित्तव्यापिलेंउद्वेगें ॥ शिणलेंतेंवाउगेंजन्मोंजन्मीं ॥ ३ ॥ धरुनीतूंघालीजीवाचे अंतरीं ॥ आंतूनिबाहेरींजाऊंनेदी ॥४॥ वासनापापिणीकरीलपायरव ॥ मगहेअनुभवकोठेंपाहूं ॥५॥ वृत्तिसहितकरीनमनाचेंझाडणें ॥ नविसंबेंप्राणेंनामाह्मणे ॥६॥ ३८२ ॥

सर्वजीवतूंबाझालासीआपण ॥ आह्मींकांपतिततूंकांपावन ॥ १ ॥ मनइंद्रियेंतूंचिचाळिता ॥ आमुच्याठाईंकोण ठेविलीसत्ता ॥ २ ॥ सुवर्णाच्यापोटींझालाअळंकारु ॥ वानितांसाचारुयेकभला ॥ ३ ॥ गंगासिंधुमिळणीझालीसहस्त्रमुखें ॥ वोघतोउदकआननाहीं ॥४ ॥ बिजाचियापोटींवटाचाविस्तारु ॥ सर्वतोआकारुतुझाचिअसे ॥ ५ ॥ नामा ह्मणेसर्वतुझेंचिकरणें॥उणेंखवळोंनदेणेंघेऊंनको ॥ ६॥३८३

विषयाचेंआळुकेंजरीनव्हतोंदीन ॥ तरीदीनानाथकोणह्मणतीतुज ॥ १ ॥ सुष्टदुष्टजरीआमुचेंआचरण ॥ तेंतुजभूषणझालेंदेवा ॥ २ ॥ पतितपावनब्रीदकैसेनीजोडतें ॥ जरीआह्मींनव्हतोंकर्मजड ॥ ३ ॥ नामाह्मणेऐसेंआहेजीगा देवा ॥ विचारीकेशवामायबापा ॥ ४ ॥ ॥ ३८४ ॥

माझीकोणगतिसांगपंढरीनाथा ॥ तारीसीअनाथाकीं बुडविसी ॥ १ ॥ मनापासोनियांसांगमजप्रति ॥ पुसेंकाकुलतिजीवाचीये ॥ २ ॥ नबोलसीकारेधरिलाअबोला ॥ कोणासीविठ्ठलाशरणजाऊं ॥ ३ ॥ कोणालींसांकडेंघालावेंहेंसांग ॥ नकाकरूंरागदीनावरी ॥४॥ बाळकासीजैसी एकचित्तेंमाय ॥ तैसेतुझेपायनामाह्मणे ॥ ५ ॥ ॥३८५ ॥

तुझीयाचरणाचीनसोडींमीआस ॥ मगहोतगर्भवास कोटीवरी ॥ १ ॥ हेंचिमजद्यावेंजन्मजन्मांतरीं ॥ वाचेनरहरीनामतुझें ॥ २ ॥ कृपेचेंपोसणेंमीगायेकदीन ॥ माझा अभिमाननखंडावा ॥ ३ ॥ नामाह्मणेमजचाडनाहींयेरें ॥ इतुकेंचिपुरेकेशीराजा ॥ ४ ॥ ॥ ॥ ३८६ ॥

तुझेचरणींसुखअनुपम्यआहे ॥ हेंतूंजाणसीकायपांडुरं-

गा ॥ १ ॥ आह्मांऐसेंव्हावेंतेणेंतेंभोगावें ॥ नकळेचिस्वभावेंब्रह्मादिकां ॥ २ ॥ चतुरशिरोमणीआमुचीजननी ॥ जाणतीरुक्मिणीजीवनकळा ॥ ३ ॥ चरणाचाप्रभाव जाणतीवैष्णव ॥ नळकुबेरमुनिसुग्रीवआमुचेसखे ॥ ४ ॥ चरणाचाप्रभावजाणेंगौतमवधु ॥ जेणेंश्रापबंधुमुक्तकेला ॥ ॥ ५ ॥ नामाह्मणेतुझेचरणींत्रिपदा ॥ भूषणउमाकांतातेणेंझालें ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३८७ ॥

पक्षिणीप्रभातेंचारियासीजाय ॥ पिलीवाटपाहेउपवासी ॥ १ ॥ तैसेंमाझेंमनकरीवोतुझीआस ॥ चरणरात्रंदिवसचिंतीतसे ॥ २ ॥ तान्हेंवत्सघरींबांधिलेंसेदावा ॥ तयाहृदयींधांवामाउलीचा ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवातूंमाझा सोइरा ॥ ह्मणेमजअव्हेराअनाथनाथा ॥ ४ ॥ ॥३८८ ॥

जन्मजन्मांतरींघेतलेंधरणें ॥ सांगकवण्यागुणेंविष्णुदासा ॥ १ ॥ नाम्याकांहींचनघेसीकांहींचनमागसी ॥ ऋणी कितीकरिसीसेवाऋणें ॥ २ ॥ चतुर्विधमुक्तिअथवाधनसंपत्ती ॥ नलगेतुझ्याचित्तींकायकरूं ॥ ३ ॥ समुद्रवलयांकितअथवाभूमंडळ ॥ अथवारसातळदुर्लभकांहीं ॥ ४ ॥ तुझेभेटीलागींअर्थहेंवैकुंठ ॥ पाहेंतुझीवाटरात्रांदिवस ॥ ५ ॥ नामाह्मणेकेशवासर्ववोसंडीनचित्तें ॥ तुझियाचरणापरतें नलगेकांहीं ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ३८९ ॥

तत्त्वतरीपुसोंजरीज्ञानियासी ॥ भरिलेतयापाशींभेदाभेद ॥ १ ॥ पुराणीकासीपुसोंस्वरूपाचीस्थिति ॥ नाहीं त्याविश्रांतीआशाथोर ॥ २ ॥ हरिभक्तासीपुसोंभक्तीचाउ-

पाव ॥ नाहींत्याचाभावएकेठाईं ॥ ३ ॥ नामाह्मणेऐसेंहिं- डतांशिणलों ॥ ह्मणोनिशरणआलोंतुजदेवा ॥४॥३९० ॥

जन्ममरणाचीखुंटतीलहारि ॥ वायांकांयेरझारीशिणतोसी ॥ १ ॥ मींसांगेनतेंकरीमनमुळींआवरी ॥ येकांतींक्षणभरीचलाजाऊं ॥ २ ॥ आकारलेंतितुकेंआहेनाशिवंत ॥ देवआणिभक्तकैंचातेथें ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवाअसोतुझें तुज ॥ तुजवांचुनीमजनलगेकांहीं ॥ ४ ॥ ॥३९१ ॥

मजघेऊनियांबैसलासकिती ॥ पाहेसहजस्थितींआपुलें सुख ॥ १ ॥ कांहींतूंनव्हेसीविचारीमानसीं ॥ चैतन्यआहेसीशुद्धबुद्ध ॥ २ ॥ क्रियाकर्मकर्तानव्हेसीसर्वथा ॥ आहे सर्वत्रतारूपतुझें ॥ ३ ॥ भजताभजनपूजितापूजन ॥ हें कांहींचजाणआथीचना ॥ ४ ॥ ज्ञानज्ञेयज्ञाताध्यानध्येय ध्याता ॥ हेंनाथिलेंतत्त्वतांनाहींतुज ॥ ५ ॥ नामाह्मणेमज नलगेचिकांहीं ॥ सेवातुझीदेईजन्मोजन्मीं ॥ ६ ॥ ३९२ ॥

शंखचक्रगदापद्मेंसीसहित ॥ मीतुह्मांसांगतनिरंतर ॥ ॥ १ ॥ जिकडेजालतिकडेमीतुमच्यासांगातें ॥ तुह्मांविण विश्रांतिनाहींमज ॥ २ ॥ संसाराचेंवोझेंदंडोंनेदीतुह्मांतें ॥ यावैष्णवासांगातेंनिरंतर ॥ ३ ॥ आसनींशयनींध्यानींमजमनीं ॥ योगक्षेमदोन्हीवाहेत्यांचे ॥ ४ ॥ तें मजआवडतेंतुमचेघरीं ॥ ह्मणोनीतुमचेद्वारींतिष्ठतसें ॥ ॥ ५ ॥ विठोबाह्मणेनाम्यानविसंबावेंमातें ॥ हेंवर्मतुतेंसांगितलें ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३९३ ॥

कांगामोकलिलेंकवणानिरावलें ॥ कठिनकैसेंझालें चित्ततुझें ॥ १ ॥ करुणाकल्लोळणीअमृतसंजीवनी ॥ चिं-

तितांनिर्वाणींपाववेगीं ॥ २ ॥ अपराधीअमंगळअनाथदुर्ब-
ळ ॥ करावासांभाळलागेत्याचा ॥ ३ ॥ नामाह्मणेविठोबा
झालोंपरदेशी ॥ केधवांभेटसीअनाथनाथा ॥४॥ ३९४ ॥

माझेगुणदोषजरीविचारिसी ॥ केवळपापरासीआहेंदे-
वा ॥ १ ॥ अंगुष्ठधरूनमस्तकपर्यंत ॥ अखंडदुष्कृत
आचरलों ॥ २ ॥ स्वप्नामाजींतुझीघडलीनाहींभक्ति ॥
पुससींविरक्तिकोठोनियां ॥ ३ ॥ तूंचिमाझागुरुतूंचिमाझा
स्वामी ॥ सकळअंतर्यामींगातोंतुज ॥ ४ ॥ नामाह्मणेमाझें
निवारीजन्ममरण ॥ नकरींमीशीणपंढरीनाथा ॥५॥३९५॥

चारीवेदतुझेनांदतीनगरीं ॥ तेथेंमीभिकारीकायवर्णूं ॥
॥ १ ॥ वर्णितांतोपारनेणेंचतुरानन ॥ तेथेंमीअज्ञानकाय
जाणें ॥ २ ॥ अंगलगसेवकशेषातोसारिखा ॥ तेथेंमाझा
लेखाकोणीकडे ॥३॥ इंद्रासहितदेवजेथेंवोळंगणें ॥ तेथेंदा-
स्यकरणेंघडेकेवीं ॥ ४ ॥ कैलासींचाराणाकरीतसेध्यान ॥
तेथेंभ्रांतमनकेवींरिघे ॥ ५ ॥ नामाह्मणेकेशवाकायम्यांक-
रावें ॥ तुझ्यापाईंरहावेंकवणेपरी ॥ ६ ॥ ॥ ३९६ ॥

सोयरासुखाचाविसावाभक्ताचा ॥ विठोबानिजाचामा-
यबाप ॥ १ ॥ कृपाळुदीनाचाबडिवारनामाचा ॥ तोडरब्री-
दाचाशोभेतया ॥ २ ॥ कायावाचामनेंसंगधरात्याचा ॥
अनंतजन्मींचाहरेशीण ॥ ३ ॥ नामाह्मणेविठोअनाथाकों-
वसा ॥ तारीलभरंवसाआहेमज ॥ ४ ॥ ॥३९७ ॥

आहेआहेआहेकृपादृष्टींआहे ॥ येउनीयांराहेहृदयामाजीं
॥ १ ॥ वासनेच्यासंगेंशिणलेंमाझेंचित्त ॥ विषयाचेआघात
पडतीवरी ॥ २ ॥ नाहींतुझेंनामगाइलेंआवडीं ॥ वाळिलें

कुंवंडीत्रिविधतापें ॥ ३ ॥ नाहींतुझीसेवाकेलीमनोधर्मे ॥ संसारसंभ्रमेंभ्रांतिसदा ॥ ४ ॥ नामाह्मणेआईधांवलवलाहीं ॥ बुडतोंचिंताडोहींकाढीमज ॥ ५ ॥ ॥ ३९८ ॥

सर्वकाळींपरमात्माअसेसर्वदेशीं ॥ भावनाहेअहार्निशीं दृढधरी ॥१॥ संतसमुदायमिळतीजेथेंजेथें ॥ जावेंतेथेंतेथेंलोटांगणीं ॥ २ ॥ चिंतानकरीनाम्यायेणेंतरसीजाण ॥ तुज सांगितलीखूणनिर्वाणींची ॥ ३ ॥ ॥ ॥ ३९९ ॥

प्रेमतेंपडीभरेंदेवासीवोसंडे ॥ क्षमातयाकडेशोभतसे ॥ ॥ १ ॥ प्रेमाचेंस्फुंदननसांवरेनामया ॥ पसरुनीबाह्यादेत क्षेम ॥ २ ॥ सावधरेनामयाआलिंगिलाबाहीं ॥ आवडे तेंकांहींसांगमज ॥ ३ ॥ उघडोनीदृष्टिपाहेनयनभरी ॥ वैकुंठाभीतरींचलजाऊं ॥ ४ ॥ ऐकूनियांनामाझालासेसावध ॥ मगदेतसेशब्दनारायणा ॥ ५ ॥ भक्तिविणसुखनेघेचिवैकुंठ ॥ पंढरींप्रगटपरब्रह्म ॥ ६ ॥ हेंचिगोडआह्मांआवडेबाहेरी ॥ वैकुंठाभीतरींनाहींचाड ॥ ७ ॥ सर्वकाळसेवाकरूंपैंकीर्तन ॥ येणेंमाझेंमनसंतुष्टसदां ॥ ८ ॥ संबोखिलानामाहृदयावरीहस्तक ॥ येरुहामस्तकचरणींठेवी ॥ ॥ ९ ॥ मागरेतूंनाम्याआवडेजितुलें ॥ त्रिभुवनाइतुलेंब्रह्मसुख ॥ १० ॥ देईनमागसीरिद्धीसिद्धीकामारी ॥ परिपूर्ण घरींअखंडित ॥ ११ ॥ नामाह्मणेपंढरीकीर्तनकरीन ॥ परी मीनसोडीनचरणतुझे ॥ १२ ॥ ॥ ॥४००॥

अंतकाळींमीपरदेशी ॥ ऐसेंजाणोनीमानसीं ॥ ह्मणोनिहृषीकेशी ॥ शरणमीतुजआलों ॥ १ ॥ नवमासगर्भवासी ॥ कष्टत्याझालेमातेसी ॥ मगतीनिष्ठुरझालीकैसी ॥

अंतींदूरींराहिली ॥ २ ॥ जेजेबापाचीआवड ॥ मुखींघा-
लुनीकरीकोड ॥ जेंव्हांलागलीयेवोढ ॥ तेंव्हांदूरींराहिली
॥ ३ ॥ बहिणीबंधूचाकळवळा ॥ तेंतूंजाणसीजिव्हाळा ॥
जेंव्हांलागलीयमशृंखळा ॥ तेंव्हांदूरींराहिली ॥ ४ ॥ क-
न्यापुत्रादिकबाळें ॥ हींतोंस्नेहाचेस्नेहाळें ॥ तुझेदरुषनावी-
णव्याकुळ ॥ अंतींदूरींराहिलीं ॥५॥ देहगृहाचीकामिनी ॥
तीतोंराहिलीभुवनीं ॥ मीजळतसेंश्मशानीं ॥ अग्नीसवेंए-
कला ॥६॥ मित्रआलेगोत्रआले ॥ तेहीश्मशानींपरतले ॥
सेखींटाकोनियागेले ॥ मजलागींश्मशानीं ॥ ७ ॥ ऐसा
जाणोनिनिर्धार ॥ मजआलासेगाहिंवर ॥ दाहीदिशाअंध-
कार ॥ मगमजकांहींसुचेना ॥ ८ ॥ ऐसेंजाणोनियापाही॥
मनुष्यजन्ममागुतानाहीं ॥ नामाह्मणेतुझेपाईं ॥ ठावदेईं
विठ्ठला ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥४०१॥

आरुषसावडेंनेणेंकांहींवेडें ॥ जन्मोनीसांकडेंकेलेंतुज ॥
॥१॥ जाणसीतूंतेकरीकृपाळुवाहारि ॥ लाजसर्वांपरीआहेतुज
॥२॥ मीतंवअपराधीअसेंलक्षकोटी ॥ ह्मणतीजगजेठीदास
तुझा ॥३॥ नाहींतुझीसेवाकेलीमनोभावें ॥ लोभदंभगर्वेंभ्रांत
झालों ॥४॥ कीर्तिम्यांऐकिलीबहुतांच्यामुखीं ॥ केलींबहुसु-
खीशरणांगत ॥ ५ ॥ नामाह्मणेमजमोकलिसीझणीं ॥
अनाथह्मणोनिशरणआलों ॥ ६ ॥ ॥ ॥४०२॥

रात्रंदिवसखंतीवाटेमाझेजीवीं ॥ अनुदिनीं आठवींचरण
तुझे ॥१॥ नेरेपांडुरंगाआपुलियागांवां ॥ तूंमाझाविसावापां-
डुरंगा ॥२॥ मीतोएककअसेंरंकाह्मूनिरंक ॥ त्रिभुवननायककी-
र्तितुझी ॥३॥ मीतुझेंपोसणेंदासपैंदुर्बळ ॥ तूंदीनदयाळस्वा-

मीमाझा ॥४॥ तुझेंमीअनाथचरणींठेवीमाथा ॥ सांभाळीस-
र्वथाब्रीदतुझें ॥ ५ ॥ नामाह्मणेविठोझालोंकासावीस ॥ पुर-
वीमाझीआसमायबापा ॥ ६ ॥ ॥ ॥ ४०३ ॥

भेटसीकेधवांमाझियाजीवलगा ॥ येगापांडुरंगामायबा-
पा ॥ १ ॥ उगवलादिवसलेखीतसेबोटीं ॥ प्राणधरूनिकंठीं
वाटपाहें ॥ २ ॥ श्रीमुखसाजिरेंकुंडलेंगोमटीं ॥ तेथेंमाझीदृ-
ष्टिभरलीसे ॥ ३ ॥ चित्तनिरंतरमाझेंमहाद्वारीं ॥ अखंडनि-
रंतरींहृदईंवसों ॥ ४॥ आसुवेंदाटलींउभारुनीबाह्या ॥ ना-
मावाटपाहेरात्रंदिवस ॥ ५ ॥ ॥ ॥ ४०४ ॥

देवेंचौभुजींदिलेंआलिंगन ॥ कुर्वाळिलेंवदनचहूंकरीं॥१॥
धरुनीहनुवटीपाहेकृपादृष्टीं ॥ केलीअमृतवृष्टिकरुणाघनें ॥
॥ २ ॥ नामदेवऐसेंनामत्याठेविलें ॥ तेणंअनुभविलेंप्रेमसु-
ख ॥ ३ ॥ हेसंतभागवतमाझीयेआवडी ॥ माझ्यारूपींबु-
डीदेउनीठेले ॥ ४ ॥ परियासकळांहूनितुझाभक्तिभाव ॥
अमृतपान्हावोअधिकबोल ॥ ५ ॥ ज्ञानविज्ञानाचेमंडित
ज्ञानेश्वरु ॥ वैराग्याचामेरुनिवृत्तिरावो ॥ ६ ॥ स्वात्मसुख-
बोधाचासिंधुहासोपान ॥ सर्वांतभूषणभक्तराया ॥ ७ ॥
परमानंदजोगाजनमित्रनागा ॥ वटेश्वरचांगाकेशवदास॥
॥ ८ ॥ सावतावंकाचोखाआणिरोहिदास ॥ यासकळांहु-
नीविशेषमहिमातुझा ॥९॥ महादासखेचरनरहरिसोनार॥
आणिगोराकुंभारभानुदास ॥ १० ॥ हेमाझेआवडतेमहा
भक्तराज ॥ परीतुझेनिर्टांसिमजअधिकहोय ॥ ११ ॥ उद्ध-
वरुक्मांगदभीष्मआणिनारद ॥ बाळकध्रुवप्रल्हादप्रसिद्ध

जगीं ॥ १२ ॥ हेविषयींविरक्तसहजजीवन्मुक्त ॥ परीतुझा अधिकभाग्यमहिमा ॥१३॥ हेसंतसोईरेजिवलगआमुचे ॥ सांगातीजिवाचेआवडते ॥१४ ॥ परितुझाआनंदसर्वांहुनी आगळा ॥ मजअसेमानलानामदेवा ॥ १५ ॥ ४०५ ॥

पोटींनाहींप्रेममुखींराममनाम ॥ अंतरींवसेकामलौकिकाचा ॥ १ ॥ ऐसेंनकाकरूंभक्तचूडामणी ॥ पाहेअवलोकुनीयेकवेळां ॥ २ ॥ शिणोनिवित्पत्तिकैसीदिसेतुटी ॥ साच नाहींभेटीतुजसींदेवा ॥ ३ ॥ नामाह्मणेचित्तराहोंतुझेपायीं ॥ हेंचिमजदेईनामातुझें ॥ ४ ॥ ॥ ॥४०६॥

संसारींगांजलोंह्मणोनिशरणआलों ॥ पाठीसीरिघालों देवराया ॥ १ ॥ कळिकाळावासपाहूंतूंनदेसी ॥ भरंवसा मानसींआहेमज ॥ २ ॥ नामाह्मणेदेवातूंस्वामीबायेक ॥ अवतारसेवककरीमज ॥ ३ ॥ ॥ ॥ ४०७ ॥

समर्थाचेंबाळपांघरेवाकळ ॥ हांसतीसकळलाजकोणा॥ ॥ १ ॥ देवआम्रअसतांदैन्यकैंचेंबापा ॥ आम्हांसीतूंकां पाविसरसी ॥ २ ॥ ऐसातूंअविनाशत्रिभुवनींचाराजा ॥ नामाम्हणेमाझातूंचिस्वामी ॥ ३ ॥ ॥ ॥ ४०८ ॥

गगनींध्रुवत्वांअढळपैंकेला ॥ तोप्रायःधाकुलानह्मणसी ॥ १ ॥ अजामेळाचेंत्वांचुकविलेंसंकट ॥ ब्राह्मणतूंनष्टन ह्मणसी ॥ २ ॥ प्रल्हादाचात्वांकेलाकैवारु ॥ वैरीयाचा कुमरुनह्मणसी ॥ ३ ॥ गजेंद्रपशुजळचरेंनाडीये ॥ मगर वोढियेऐसेंनह्मणसी ॥ ४ ॥ रुक्मांगदाचीत्वांउद्धारिलीनगरी ॥ विषयीमुरारीनह्मणसी ॥ ५ ॥ ऐसाअपराधीनह्मणसीदेवा ॥ नामातुजसेवामागतसे ॥ ६ ॥ ॥४०९॥

जयालागींहृदयउलें ॥ तेंम्यांजीवेंसीधरियेलें ॥ १ ॥ विठ्ठलाचींपाउलें ॥ तींम्यांमस्तकींवाहिलीं ॥२॥ नामाह्मणे मुनीरंगले ॥ तेंम्यांजीवेंसीधारिलें ॥ ३ ॥ ॥ ४१० ॥

तूंआकाशमीभूमिका ॥ तूंलिंगमीशाळुंका ॥ तूंसमुद्र मीचंद्रिका ॥ स्वयेंदोन्ही ॥ १ ॥ तूंवृंदावनमीचिरी ॥ तूंतुळसीमीमंजुरी ॥ तूंपांवामीमोहरी ॥ स्वयेंदोन्ही ॥ ॥ २ ॥ तूंचांदमीचांदणी ॥ तूंनागमीपद्मिणी ॥ तूंकृष्णमीरुक्मिणी ॥ स्वयेंदोन्ही ॥ ३ ॥ तूंनदीमीथडी ॥ तूं तारूंमीसांगडी ॥ तूंधनुष्यमीभातडी ॥ स्वयेंदोन्ही ॥४॥ तूंवेदमीस्तविता ॥ तूंशास्त्रमीगाता ॥ तूंगंधमीअक्षता ॥ स्वयेंदोन्ही ॥ ५ ॥ नामाह्मणेपुरुषोत्तमा ॥ स्वयेंजडलोंतुझ्याप्रेमा ॥ मीकुडीतूंआत्मा ॥ स्वयेंदोन्ही ॥६॥ ॥४११॥

माझेंमागणेंतेंकिती ॥ दातालक्ष्मीचापति ॥ १ ॥ मेघ वर्षेशिळाधारीं ॥ तेथेंचातकचुंचभरी ॥ २ ॥ महाडोहगंगाजळ ॥ तृप्तिएकदोअंजुळ ॥ ३ ॥ साकरेच्यासाठीं ॥ तेथेंमुंगीमुखवटी ॥ ४ ॥ नामाह्मणेंमीसेवेसी ॥ तूंतोउदाराचीरासी ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥४१२॥

आषाढीपर्वणीआलायात्राकाळ ॥ निघालेसकळवारकरी ॥१॥ यांचेसमागमेंजातसेंमीखुळा ॥ स्मरेवेळोवेळांविठ्ठलासी ॥ २ ॥ धन्यपुण्यतिथीआलीएकादशी ॥ पावलेक्षेत्रासीविश्वजन ॥ ३ ॥ स्नानविधिकरुनीसमस्ताभेटले ॥ कीर्तनींबैसलेहरिदास ॥ ४ ॥ निवृत्तिज्ञानदेवसोपानसावता ॥ नामयाचीकथाऐकताती ॥ ५ ॥ तंवतोह्मणेकरानामाचा उच्चार ॥ टाळीशींगजरकरूनिया ॥ ६ ॥ गोरियाचेनेत्रीं

आलेजळबिंदु ॥ मजकांगोविंदुविसरला ॥ ७ ॥ कांगाकेशीराजामोकलिलेंमातें ॥ शरणकोणातेंजाऊंआतां ॥ ८ ॥ तुजवीणमजनादिसेनिर्वाणीं ॥ मायबापधनीगणगोत ॥९॥ आतांमाझीलाजराखीपंढरीनाथा ॥ तुजविणआतांकोणी नाहीं ॥ १० ॥ अनाथाचानाथदीनाचाकैवारी ॥ पावला झडकरीआपुल्यादासा ॥ ११ ॥ गोरियाचेहातआलेततक्षणीं ॥ गर्जोनिनामध्वनिउभाठेला ॥ १२ ॥ सकळसंतजनींदेखोनीनयनीं ॥ टाळीतेंपिटुनीगर्जतसे ॥ १३ ॥ निघडाह्मणतीभक्तहावैष्णव ॥ अघटितमावनकळेयाची ॥ ॥ १४ ॥ कैसायेणेंऋणीकेलापंढरीनाथ ॥ आहेसदोदित याचेहृदईं ॥ १५ ॥ पूर्वीतोप्रऱ्हादश्रवणींऐकिला ॥ किंवा हादेखिलासंतांमध्यें ॥ १६ ॥ नामायेऊनियांचरणासीलागला ॥ हृदईंआलिंगिलाभक्तराज ॥ १७ ॥ ॥४१३॥

कायमागूंविठ्ठलधुरे ॥ आह्मांतुळशीदळपुरे ॥ १ ॥ मागूंमुगुटमाथ्याचा ॥ तरीतोआणिलाइंद्राचा ॥२॥ मागूंकुंडलेंकर्णीचीं ॥ तरीतींआणिलींकर्णाचीं ॥३॥ मागूंपीतांबर शेला ॥ तरीतोकासेसीकसिला ॥ ४ ॥ मागूंपादुकाचरणींच्या ॥ तरीत्याआणिल्याशेषाच्या ॥ ५ ॥ मागूंतोडरपायींचा ॥ धाकजाईलअसुराचा ॥ ६ ॥ मागूंजातांलक्ष्मीदेशी ॥ रिद्धीसिद्धीज्याच्यादासी ॥ ७ ॥ नामाह्मणेकांहींन मागों ॥ तुझेचरणींलक्षलागो ॥ ८ ॥ ॥ ॥४१४॥

मायबापापरिसलोभतुझाहरि ॥ आहेमजवरीकेशीराजा ॥ १ ॥ आतांदेवातूंजाणसीतेंकरी ॥ लाजसर्वहरितुजआहे ॥ २ ॥ माझेंयातिकुळनाहींत्वांपाहिलें ॥ अन्याय

साहिलेकोट्यानकोटी ॥ ३ ॥ जन्मोजन्मींमजघातिलेंपा-ठिसी ॥ संकटींरक्षिसीनारायणा ॥ ४ ॥ देउनीप्रेमभातें पाळिलेंवोमातें ॥ साउलीतळहातेंकेलीदेवा ॥ ५ ॥ हीखुणजाणतीतेचिमाझेसखे ॥ मीतुझेंलाडिकेंह्मणवीदेवा॥ ॥ ६ ॥ नामाह्मणेकांहींहोउनीउतराई ॥ पुढेंजन्मनाहींऐ-सेंकरी ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४१५ ॥

तूंयेकसज्ञानमीयेकअज्ञान ॥ तुझेंनामजाणविस्तारिलें ॥ १ ॥ आतांकारिसीकायआतांकारिसीकाय ॥ सांपडली सोयरामचंद्रा ॥२॥ चरणींजेआहेतीमाझीमाय ॥ ईश्वरु तोवाहेशिरकमळीं ॥ ३ ॥ नामाह्मणेदेवानसोडींमीभावा ॥ जन्मोजन्मींसेवाद्यावीतुझी ॥ ४ ॥ ॥ ॥ ४१६ ॥

स्फूर्तिंह्याभुजादंडवक्षःस्थळ ॥ हर्षेनेत्रकमळविकासले॥ ॥ १ ॥ आनंदरोमांचउभारिलेअंगीं ॥ क्षेमदेईवेगींभक्त-राया ॥ २ ॥ मजनानारूपेंतुमचेनिसंभ्रमें ॥ केलींजन्मक-र्मेंअसंख्यात ॥ ३ ॥ तुमचेआवडीअसेंमीविकिला ॥ नुठ-सीकांवहिलाआलिंगना ॥४॥ ह्दईंचेंगुजसांगेसकळिक ॥ तेणेंमजसुखहोईलजीवा ॥ ५ ॥ परतोनियादृष्टिपाहेआळु-माळ ॥ तेणेंहरेलसकळश्रममाझा ॥६॥ भक्तजनवत्सलभ-क्तांचाविसावा ॥ भक्तीचियाभावाभुललाकैसा ॥ ७ ॥ कटींकरउभापुंडलिकाद्वारीं ॥ नामास्वामीहरिनवि-संबे ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४१७ ॥

तपेंकेलींदाटोदाटीं ॥ थोरपुण्याचियासाठीं ॥ १ ॥ ज-न्मोजन्मींच्यासंकटीं ॥ विठोतुझीजहालीभेटी ॥ २ ॥ आ-

तांसोडितांसुटेना ॥ तंतुप्रीतीचातुटेना ॥ ३ ॥ दोनीचरणललाटीं ॥ नामाह्मणेनसोडींमिठी ॥ ४ ॥ ॥ ४१८ ॥

मनींजेंजेंदेखेपरदृष्टितेणें ॥ प्रेमाचीतीखुणजाणावया ॥ ॥ १ ॥ कायकरूंगामायबापाविठ्ठला ॥ मजसींकांअबोला धरियेला ॥ २ ॥ मानसींवसणेंप्रत्यक्षपाहणें ॥ तुझेंनाम गाणेंपरीसाच ॥ ३ ॥ नामाह्मणेकितीसांगूंगामीतुज॥केशवाहेंगूजसांगेमातें ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥४१९॥

तान्हेलीयाजायउदकालागुनी ॥ पारधीदेखोनीमुरडेवेगीं ॥१॥तैसेतुझेचरणविसरलोंदेवा ॥ संसारकेशवादेखोनिया ॥ २ ॥ तैसीपरीमजजहालीजाणदेवा ॥ नामाअसे केशवाविनवित ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ४२० ॥

वरेंआह्माकळोंआलेंदेवपण ॥ आतांगूजकोणराखीतुझें ॥ १ ॥ मारिलेंकांदेवामजआजीवरी ॥ असोंमरोभरीतुज मज ॥ २ ॥ जेंआह्मींबोलतोंआहेतुझेअंगीं ॥ देईनप्रसंगीं शिव्याअंगें ॥ ३ ॥ नामाह्मणेमजखवळिलेंभांडा॥आतांधरितांतोंडानधरवे ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥४२१॥

दिवाळीदसरानित्यपंढरपुरीं॥वोवाळितीनरनारीविठ्ठलासीं ॥ १ ॥ पावावाहेखांदींबरवीतेमांदीं ॥ विठ्ठलाचेछंदीं नाचतसे ॥ २ ॥ नामाह्मणेआह्मींपंढरीसजावें ॥ कवतुकें पहावेंविठोबासी ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥४२२॥

धांवतजाईनआवडीवोरसें ॥ दाटलाउल्हासेंकंठमाझा ॥ ॥१॥ सुखदुःखजिवीचेंसांगेनआपुलें ॥ हृदईदाटलेंफुटोंमाझें ॥२॥ धरूनिपीतांबरसांगेनएकांतीं ॥ जीवींचीसवेखंतीतयापुढें ॥३॥ संतसमागमेंखेळेनकौतुकें ॥ हरिखेंभातुकेंघेऊ-

निया ॥४॥ मनींचीआवडीतोचिजाणेएक ॥ सांगेलतेंसुख सद्गुरुरावो ॥५॥ नामाह्मणेमजआहेजीभरंवसा ॥ मनातूंवि-श्वासादृढधरी ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ४२३ ॥

अवघाचिसंसारकरीनसुखाचा ॥ जरीझालादुःखाचादु-र्धरहा ॥ १ ॥ विठोबाचेंनामगाईनमनोभावें ॥ चित्ततेणें नांवेंसुखपावे ॥ २ ॥ इंद्रियांचींकोडेंसर्वस्वेंपुरती ॥ मनाचे मावळतीमनोधर्म ॥ ३ ॥ श्रवणींश्रवणानामाच्याप्रबंधा ॥ नाइकेस्तुतिनिंदादुर्जनाची ॥ ४ ॥ कुंडलेंमंडितश्रीमुखनि-र्मळ ॥ पाहतांहेडोळेनिवतीमाझे ॥ ५ ॥ विटेसहितचरण धरीनमस्तकीं ॥ तेणेंतनूसुखीहोईलमाझी ॥ ६ ॥ संतस-मागमेंनाचेनरंगणीं ॥ तेणेंहोईलधणीत्रिविधतापा ॥ ७ ॥ नामाह्मणेसर्वसुखाचासोयरा ॥ मजनविसंबेदाताराक्षण-भरी ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४२४ ॥

सांडोनीअभिमानआलोंशरणांगत ॥ ऐसीयाचाअंतप-हासीलकाई ॥ १ ॥ माझेगुणदोषमनींगानधरी ॥ पति-तपावनजरीह्मणविसी ॥२॥ पीडूंयापामराझणींदेसीदेवा ॥ हीलाजकेशवाकोणासजी ॥ ३ ॥ नामाह्मणेदेवाचतुराशि-रोमणी ॥ निकुराजासीझणींमायबापा ॥ ४ ॥ ॥४२५॥

असोनिनादिसेलौकीकवेव्हारीं ॥ ऐसातूंअंतरीलपवी मज ॥ १ ॥ परीतुझेपायींमाझेंअनुसंधान ॥ वरीप्रेमजीव-नदेईदेवा ॥ २ ॥ मनाचियावृत्तिआडतूंराहोनी ॥ झेपाव-तीझणींकामक्रोध ॥ ३ ॥ नामाह्मणेऐसेंपाळिसीतूंमातें ॥ परीमीजीवेंतुतेंनविसंबें ॥ ४ ॥ ॥ ॥ ४२६ ॥

तुझेपायींमाझ्यामनेंदिलीबुडी ॥ इंद्रियेंबापुडींवेडावलीं ॥ १ ॥ इंद्रियविषयजाणावेकवणें ॥ जाणोनीभोगणेंकवणें स्वामी ॥ २ ॥ देहसहजस्थितिपाहिलेंनिष्काम ॥ हृदयीं सप्रेमवोसंडत ॥ ३ ॥ नामाह्मणेदेवाभक्तजनवत्सला॥क्षणें जीवावेगळानकरींमज ॥ ४ ॥ ॥ ॥ ४२७ ॥

आशानदीपुरींवहावलोंदूरीं ॥ कृपाळुवाहरिकाढीमज ॥ ॥ १ ॥ धीरआणिविद्यादोनीयासांगडी॥मायादोरीपिडीतुटोनिगेली ॥ २ ॥ अगायेथडीयेपहातोसीहरि ॥ हानी झालीथोरीसर्वस्वगेलें ॥ ३ ॥ ननिघेंमीदेवाआणिकापोहणारें ॥ सहितपीतांबरेंघालीउडी ॥४॥ नामाह्मणेविठोथांवलवलाहीं ॥ बुडतोंमीडोहींकाढीमज ॥ ५ ॥ ॥४२८ ॥

सोयसांडिलीसर्वांची ॥ जोडीकेलीविठ्ठलाची ॥ १ ॥ लोभसांडिलासर्वांचा ॥ संगधरिलाविठोबाचा ॥ २ ॥ झालोंनिधडानिःशंक ॥ गायनाचेंकवतुक ॥३॥ प्रेमभरितसर्वदां ॥ मुखींनामहरिगोविंदा ॥ ४ ॥ ऐसासर्वकाळगाय ॥ भावेंविठोबाचेपाय ॥ ५ ॥ नामाह्मणेऐकेंहरि ॥ दासीजनीचीवाटकरी ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ४२९ ॥

अगापांडुरंगाभक्तजनकैवारी ॥ सेवकजनद्वारींवाटपहाती ॥ १ ॥ निवृत्तिज्ञानदेवसोपानहापाही ॥ आलीमुक्ताबाईचांगदेव ॥ २ ॥ खेचरविसोबाआसंदसुदामा ॥ चौवारेपुरुषोत्तमाआलाअसे ॥ ३ ॥ मैराळजनकवत्छरातोनारा ॥ विठासारंगधराआलाअसे ॥ ४ ॥ परिसाभागवतसावतानरहरि ॥ चोखामेळाद्वारींभानुदास ॥ ५ ॥ नटनाट्यकुसरींकान्होपात्राद्वारीं ॥ चवरीविंजणेहरिजाणवि-

ती ॥ ६ ॥ माचंगीअनंतानरसिंगपुरींहोता ॥ तोहीपंढरी-
नाथाआलाअसे ॥ ७ ॥ मत्स्येंद्रगोरखचर्पटचौरंगी ॥ गो-
पीचंदयोगीआलाअसे ॥८॥ विडातोपिंगळासूक्ष्मअबळा ॥
षड्रसगोपाळाघेउनीआला ॥ ९ ॥ तेथेंबाळदिंडीघेउनीयां
नामा ॥ भेटोंपुरुषोत्तमाआलाअसे ॥ १० ॥ ॥ ४३०

सहजतुझेंसुखआहेतुजजवळीं ॥ वायामृगजळींबुडोंन-
को ॥ १ ॥ सावधहोईबासोयधरीवेगीं ॥ अनुभवअंगीं
स्वस्वरूपीं ॥ २ ॥ हाहोजगडंबरपसरलापाल्हाळ ॥ माया-
मयसकळस्वप्नसर्व ॥ ३ ॥ शरीरसंपत्तीचामानिसीनिर्धा-
र ॥ हेंक्षणभंगुरसत्यजाण ॥ ४ ॥ आपुलीसाऊलीजैसीव-
सावया ॥ कोणतापलियानिववील ॥५॥ नामाह्मणेदेवाऐसें
तुझेंज्ञान ॥ देवातुजवांचूननकळेकांहीं ॥६॥ ॥४३१॥

कांहींचमीनव्हेंऐसेंजरीकेलें ॥ तरीकांउपजविलेंपंढरी-
राया ॥१॥ हेंकायब्रह्मज्ञानसांगसीतेंमातें ॥ खातयानखातें
देखोंनशके ॥२॥ यातिहीनयाचाअधिकारीमीकैंचा ॥ हा
स्वधर्मजयाचात्यासीसांग ॥३ ॥ योगीपरमहंसतपीदिगंब-
र ॥ आसक्तसंसारदेखवेना ॥४॥ तुझेंसेवासुखनेणोनिप्रेम
गोडी ॥ झालेदेशधडीवायाविण ॥५॥ नामाह्मणेदेवाचतुरा
शिरोमणी ॥ हेमूर्खबुझावणीनकरीबापा ॥ ६ ॥ ॥४३२॥

करुणेच्याउत्तरेंबोलेनामदेव ॥ ऐकोनीपंढरीवहांसिन्नले
॥ १ ॥ मगहेविवंचनासांगेरुक्माइसी ॥ ह्मणेनामयासी
आणावेगीं ॥ २ ॥ मगरुक्माबाईचरणींठेवीमाथा ॥ आ-
णाजीसमर्थानामयासी ॥ ३ ॥ मगपंढरीरावरुक्माईज्ञान-
देव ॥ गरुडपुंडलिकसमुदावचालिलासे ॥ ४ ॥ येऊनि

नाम्यापाशींउभेपैंठाकले ॥ पुंडलीकबोलेनामयासी ॥ ५ ॥ धन्यनामदेवातुझायेकभाव ॥ सहितपंढरीरावआलेयेथें ॥ ६ ॥ पीतांबरछायारूपप्रगटलें ॥ नामयाआलिंगिलेंपांडुरंगें ॥ ७ ॥ नामयाचेमुखींघालूनिकवळु ॥ पुसेहागोपाळुशीणभाग ॥ ८ ॥ कडीयेघेउनीनामारुक्माईजननी ॥ प्रेमपान्हावोरसोनिपाजीतया ॥ ९ ॥ नामयासीघेउनी आलेपंढरीसी ॥ ठावनामयासीमहाद्वारीं ॥ १० ॥ नामा ह्मणेजेमहाद्वारपायरी॥वैकुंठवोवरींकळसकेला ॥११॥४३३॥

नकोगामोकलूंदीनापंढरीनाथा ॥ तुजविणआतांकोण पावे ॥ १ ॥ अपराधकोटिपाहूंनकोकांहीं ॥ येगेविठाबाई झडकरीं ॥ २ ॥ माझ्यादोषासाठींपाठिमोराहोसी ॥ पावनब्रिदासीलागेबोल ॥ ३ ॥ नामाह्मणेजननीतूंचराचर ॥ तारिसीअपारजडजीव ॥ ४ ॥ ॥ ॥ ४३४ ॥

बहुपुरेंवाहिलींबहुदुःखेंसाहिलीं ॥ बहुचिंतावाहिलीबहुतहे ॥ १ ॥ बहुआसक्ताबहुवोळंगणा ॥ बहुविटंबना झालीमाझी ॥ २ ॥ बहुकालगेलेअनुचितकेलें ॥ परीनाहीं गाईलेंनामतुझें ॥ ३ ॥ बहुजन्मांशेवटींस्वामीतुझीभेटी ॥ बहुताहिंपुटीझालोंदेवा ॥ ४ ॥ नामाह्मणेदेवाउरलीवासना ॥ दावीनारायणाचरणसेवा ॥ ५ ॥ ॥ ४३५ ॥

सदामाझेंमनवोढेपंढरीनाथा ॥ नसोडींसर्वथापायतुझे ॥ १ ॥ यासीकायकरूंसांगाजीविठ्ठला ॥ स्नेहकांलाविला पूर्वींहुनी ॥ २ ॥ हृदईंचित्तवृत्तिमनासींमिळुनी ॥ अवघीं तुझेचरणींसुखाडिलीं ॥ ३ ॥ नामाह्मणेदेवाधरिलीतुझीसेवा ॥ सुखेंअनुभवाअनुभविलें ॥ ४ ॥ ॥ ४३६ ॥

येईगेविठ्ठलेअनाथाचेनाथे ॥ माझेकुळदैवतेपंढरीचे ॥ १ ॥ पंचप्राणांचाउजळोनीदीपक ॥ सुंदरश्रीमुखवोवाळीन ॥ २ ॥ मनाचाप्रसादतुजलागींकेला ॥ रंगभोगआपुलाघेउनीराहे ॥ ३ ॥ आनंदाचाभोगघालीनआसनीं ॥ वैकुंठवासिनीतुझ्यानामें ॥ ४ ॥ आपुलेंह्मणोनिसनाथकरावें ॥ भावेंसंचरावेंहृदयांत ॥ ५ ॥ नामाह्मणेमाझेपुरवी मनोरथ ॥ देईसदोदीतप्रेमकळा ॥ ६ ॥ ॥ ४३७ ॥

कांगामोकलिलेंमाझियाविठ्ठला ॥ धांवातुझाकेलापांडुरंगा ॥ १ ॥ त्रितापेंतापलोंबहुतपोळलों ॥ चिखलींपडलों दीनानाथा ॥ २ ॥ यालागींतुजलाभाकितोंकरुणा॥धांवसी निर्वाणापांडुरंगा ॥ ३ ॥ नामाह्मणेदेवाअनाथाच्यानाथा रुक्माईच्याकांताउडीघाली ॥ ४ ॥ ॥ ॥ ४३८ ॥

पाहूंद्यारेमजविठ्ठलाचेंमुख ॥ लागलीसेभूकडोळीयांसी ॥ १ ॥ कस्तूरीकुंकुमभरूनियाताट ॥ अंगींबरवंटगोपाळाच्या ॥ २ ॥ जाईजुईपुष्पेंगुंफोनीयामाळा ॥ घालूंघननीळाआवडीनें ॥ ३ ॥ नामाह्मणेविठुपंढरीचेराणे ॥ डोळियांपारणेंहोतअसे ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ४३९ ॥

पूर्णकृपाकेलीदेवा ॥ दिधलीपादपद्मसेवा ॥ १ ॥ पापें पळालींपळालीं ॥ नामकीर्तनकल्लोळीं ॥ २॥ द्वारींतुळसीवृंदावन ॥ अखंडनामसंकीर्तन ॥ ३ ॥ रंगमाळाच्यारंगणीं॥ तेथेंमुक्तिवाहतीपाणी ॥ ४ ॥ जन्मवैष्णवकुळींयावा ॥ घडोसंताचीतेसेवा ॥ ५ ॥ नामदेवाचीआवडी ॥ संतचरणीं देतोबुडी ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥४४०॥

निरंतरसुखद्यावेंयेणेंमानें ॥ राहोंअनुसंधानेंचरणाचेनी ॥ १ ॥ ऐसीकृपाकरीमजगाविठ्ठला ॥ ह्मणविसीआपुला दासजगीं ॥ २ ॥ वासनेविरहीतहोउनीएकट ॥ असावें निकटसंतसंगें ॥ ३ ॥ वदनींतुझेंनामगावेंनिर्विकल्प ॥ धरुनीतुझेंरूपहृदयकमळीं ॥ ४ ॥ नेत्रींतुझेंरूपपहावेंसर्वत्र॥ व्हावेभूतमात्रसखेमाझे ॥ ५ ॥ अखंडपैंव्हावाहरिभक्तांचा संग ॥ असावाअनुरागहरिकथेचा ॥ ६ ॥ हेंचिमाझेंतीर्थ हेंचिमाझेंव्रत ॥ करावेंदास्यतेंहरिभक्ताचें ॥ ७ ॥ मानाचा मजत्रासअपमानींउल्हास ॥ अखंडतुझाध्यासहृदईंवसे ॥ ॥ ८ ॥ नामाह्मणेदेवातारीशरणांगत ॥ नातरीपतितह्मणतीमज ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥४४१॥

अनाथअनाथह्मणतीमातें ॥ अनाथनाथह्मणतीतूंतें॥१॥ आपुलेंब्रीदसाचकरी ॥ एकवेळांभेटीदेईगामुरारी ॥ २ ॥ पतितपतितह्मणतीमातें ॥ पतितपावनह्मणतीतुतें ॥३॥ दीनदीनह्मणतीमातें ॥ दीनानाथह्मणतीतुतें ॥४॥ नामाह्मणे देवाऐकसुजाणा ॥ नायकसीतरीलाजकवणा ॥ ५ ॥४४२॥

कांरेविष्णुदासाकोमाइलासीवदनीं॥गांजिलासीकवणींदुराचारीं ॥ १ ॥ क्षणएकजीवनगमेमजवेगळा ॥ मीहीत्याजवळासदाअसें ॥ २ ॥ वैकुंठभुवननलगेमाझेंचित्तीं ॥ ह्मणीं याचीखंतिहोईलतुज ॥ ३ ॥ लक्ष्मीचेविलासींनलगेमाझें मन ॥ ह्मणेंत्याचेप्राणजाजावती ॥ ४ ॥ मीवोयाचेप्राण हाहीमाझेंमन ॥ जाणतीहीखूणभक्तमाझे ॥ ५ ॥ ह्मणोनीजवळीवोलाविलाकेशवराजें ॥ नामाधरीवोजेंचरणदोन्ही ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥४४३॥

नामाशिंपेनामाशिंपे ॥ रोपलाविलेंकेशववापें ॥ १ ॥
येकपुष्पफळांआलीं ॥ एकफळचिनिर्फळझालीं ॥ २ ॥ एक
उगवलींआरडींदरडीं ॥ एकवाळोनीकोरडीं॥३॥ नामाउग-
वलाकेशवद्वारीं ॥ नमायआंतनाबाहेरीं ॥ ४ ॥ ॥४४४॥

वासनेचाफांसापडिलामाझेकंठीं ॥ हिंडलोंजगजेठीनाना-
नायोनीं ॥ १ ॥ सोडवीगादेवादीनदयानिधी ॥ मीएक
अपराधीदासतुझा ॥ २ ॥ शरणआलीयाचेनपाहसीअव-
गुण ॥ कृपेचेंलक्षणतुजसाजे ॥ ३ ॥ त्रिभुवनींसमर्थउदार
मनाचा ॥ कृपाळुदीनाचाब्रीदतुझें ॥ ४ ॥ गर्देंद्रगणिकेची
राखिलीत्वांलाज ॥ उद्धरिलाद्विजआजामेळ ॥ ५ ॥ नामा
ह्मणेदेवाअव्हेरिसीमज ॥ जगींथोरलाजयेईलतुज ॥६॥४५

पतितअनेकपावनतूंएक ॥ जहालासीसुरेखकवणाचेनि
॥ १ ॥ पतितमीभलाकींपावनतूंभला ॥ सांगबाविठ्ठलामा-
यबापा ॥२॥परिसाचेंमहिमानकेंसेनिवाढतें ॥ निर्माणनस-
तेंलोहजरी ॥३॥ कल्पतरूचीकीर्तिकैसेनिवाढती ॥ जरीक-
ल्पनानसतीयाचकाची ॥४॥ प्रजांसीपोषिलेंशोभतीराजेश्व-
र ॥ तैसाहाविचारतुह्माआह्मा ॥५ ॥ नामाह्मणेस्वामीनोहेतें
आमुचें ॥ तुजदेवाकैंचेंक्रियाकर्म ॥ ६ ॥ ॥ ४४६ ॥

वेदासीकानडाश्रुतीसीकानडा ॥ विठ्ठलउघडापंढरीये ॥
॥ १ ॥ नामबरवेंरूपबरवें ॥ दर्शनबरवेंकानडीयाचें ॥ २ ॥
नामाह्मणेतुझेंअवघेंचिबरवें ॥ त्याहुनीवरवेंप्रेमतुझें ॥३॥४७

तुझेंभक्तिसुखप्रेमद्यावेंमज ॥ वसोंनामतुझेंमाझेमुखीं ॥
॥ १ ॥ सद्भक्तिविचारवाहोमाझेचित्तीं ॥ हेंचिकृपामूर्तिद्या-
वेंमज ॥ २ ॥ पदरपसरिलाजननिघेमाघारें ॥ विठोबा

दातारा द्यावें आतां ॥३॥ तुझा दास जगीं ह्मणवितों विख्यात॥ पसरिला हात फिरवूं नको ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा इतुकें द्यावें मज ॥ ऐकोनी केशीराज काय बोले ॥ ५ ॥ ॥४४८ ॥

घेरे घेरे नाम्या दिलें माझें प्रेम ॥ घोकी माझें नाम सर्वकाळ ॥ १ ॥ शिरावरी हात ठेवितसे माझ्या ॥ अभिमान तुझा गेला ह्मणोनि ॥ २ ॥ भक्तिसुख देवें दिल्हें नामयातें ॥ नामा परमामृतें तृप्त झाला ॥ ३ ॥ ॥ ॥ ४४९ ॥

जन्ममरणाचें भय मज दाविसी ॥ तें म्यां हृषिकेशी अंगीकारिलें ॥ १ ॥ आतां माझी चिंता तुज कां पंढरीनाथा ॥ असों दे भलपरता भलेठायीं ॥ २ ॥ सुखदुःख भोगणें माझें मीच जाणें ॥ तुज तंव भोगणें नलगे कांहीं ॥३ ॥ नामा ह्मणे माझें हेचि मनोरथ ॥ होईन शरणांगत जन्मोजन्मीं ॥४ ॥ ४५० ॥

जन्ममरणाची काय सीरे चिंता ॥ तुझ्या शरणांगता पंढरीराया ॥ १ ॥ वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी ॥ असतां चक्रपाणी भय कैंचें ॥ २ ॥ हृदईं तुझें ध्यान बिंबलें साकार ॥ तेथें कोण पाड संसाराचा ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझ्या नामाची पाखर ॥ असतां संसार पायातळीं ॥ ४ ॥ ॥४५१ ॥

भक्त पुंडलिकें अससी उभा केला ॥ त्याचेनी रागें मजशीं धरिला अबोला ॥ १ ॥ मी तुझें पोसणें मी तुझें पोसणें ॥ मी तुझें पोसणें पांडुरंगा ॥२॥ तुझी कृपा नाहीं सत्य मी तरी॥ प्रत्यक्षरूप हरि अवलोकितों ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा तूं जाणतोसी मातें ॥ उफराटें पाहूं नागिळीन तुतें ॥ ४ ॥ ॥ ४५२ ॥

दिवसेंदिवस कैसा जालासी शहाणा ॥ गोवळ्यासी खेळसी पंढरीच्या राण्या ॥ १ ॥ विश्वामाजीं तुझे बोभाट मोठे ॥ ज-

न्ममरणाचासंकल्पतुटे ॥ २ ॥ अकळकरणीनकळेलिहि-
तां॥धरणीसिंधुशिरोमणीनामतुझें ॥ ३ ॥ नामाह्मणेकीर्ति
कायवर्णूदेवा ॥ भक्ताचाकुडावाब्रीदतुझें ॥ ४ ॥ ॥ ४५३ ॥

रामाराजीवलोचना ॥ करुणानिधीभक्तजना ॥ याता-
यातीनिवारणा ॥ तूंपावनास्वामिया ॥ १ ॥ दयाजळदग-
हना ॥ सीतापतिजगज्जीवना ॥ कायबावानूंतुझीयागु-
णा ॥ अवघ्याजनाआवडसी ॥ २ रामात्रैलोक्यभंजना ॥
दशकंधरतूंछेदना ॥ मधुकैटभनिर्दलना ॥ गरुडवाहना
वासुदेवा ॥ ३ ॥ रामादशरथनंदना ॥ योगिजनमनरंज-
ना ॥ अभयवरदवैष्णवजना ॥ बिभीषणास्थापिलें ॥ ४ ॥
जयजयश्रीवत्सलांछना ॥ ब्रह्मपदार्चीयाभूषणा ॥ अहि-
ल्याकष्टनिर्दलना ॥ नारायणापरियेसी ॥ ५ ॥ ह्मणऊनि
तुझेंमीपोसणें ॥ हेंएकऐकारघुनंदन ॥ येणेंचिकारणेंआ-
लोंशरण ॥ विष्णुदासह्मणेनामा ॥ ६ ॥ ॥ ४५४ ॥

मातापिताबंधुभागिनी ॥ इष्टमित्रविठ्ठलातूंरे ॥ बापा-
यावेंभेटावें ॥ विसावामाझातूंरे ॥ १ ॥ माझेंकुळाचारमा-
हेर ॥ जिव्हारविठ्ठलातूंरे ॥ माझेंविद्याधनआयुष्य ॥ आ-
रोग्यताविठ्ठलातूंरे ॥ २ ॥ माझेंतपव्रतदान ॥ विठोबातूंरे॥
माझागुरुमंत्रदैवत ॥ आगमनिगमविठ्ठलातूंरे ॥ ३ ॥ भू-
पतिसुरपति ॥ ब्रह्ममूर्तिविठोबातूंरे ॥ माझाआचारवि-
चार ॥ सत्यवादधीरविठोबातूंरे ॥४॥माझेयमनियमप्राणा-
याम ॥ प्रत्याहारविठ्ठलातूंरे ॥ नामाह्मणेविठोबाकेशवा ॥
परमात्मामाझातूंगा ॥ ५ ॥ ॥ ॥ ४५५ ॥

संकल्पविकल्पनिरसोनियाभ्रांति ॥ दावीनविश्रांति अभिनवतुज ॥ १ ॥ सर्वमाझीधरूनिआवडी ॥ आसतूं रेसोडीइंद्रियांची ॥ २ ॥ जेंजेंविषयसुखलागेलतुझ्यामनीं ॥ तेंतूंखेवाघालुनीघेईमज ॥३॥ श्रवणघ्राणरसनात्वचा आणिलोचन ॥ हेसकळहोऊनमीचभोगीं ॥ ४ ॥ यातायातितुजनघालीरेसायास ॥ धरीमाझाविश्वासदृढमनीं ॥ ५ ॥ अंतरींचेंगुजबोलोनीपंढरीनाथ ॥ आलिंगनदेतनामयासी ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४५६ ॥

संसारींच्याआह्याआहाळलोंभारी ॥ निववीगाश्रीहरि अमृतदृष्टीं ॥ १ ॥ मीअनाथअपराधीदुर्बळदुराचारी ॥ कृपाळुवाश्रीहरितारीमज ॥ २ ॥ नामाह्मणेविठोकृपेचाकोंवळा ॥ जाणसीकळवळाअनाथाचा ॥ ३ ॥ ॥ ४५७ ॥

देवातुजभांडवलमोक्षएकगांठीं ॥ तोकेलापाउटीतुझेनिनामें ॥१॥ आतांकायगोप्यआहेतुजपाशीं ॥ तेंतूंमजदेसीपांडुरंगा ॥ २ ॥ चतुर्विधामुक्तिद्वारींवोळंगती ॥ ध्यातांतुजचित्तींहृदयकमळीं ॥ ३ ॥ आणिरिद्धीसिद्धीचीजरी दाविसीआस ॥ तरीत्यादासींचाअभिलाषकोणकरी ॥४॥ भूतळींचेंवैभवनिजकर्मभोग ॥ तुजकारणेंउद्वेगकरणेंकाय ॥ ॥ ५ ॥ नामाह्मणेविसोबानेंसांगितलेंबीज ॥ तेंतूंमजशीं गुजबोलेकांहीं ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ४५८ ॥

निर्वाणींचीहेसांगितलीखूण ॥ कैवल्यचरणाविठोबाचे ॥ ॥ १ ॥ वेदशास्त्रश्रुतिबोलतीपुराणें ॥ पाहूनिजाणणेंहेंचि सत्य ॥ २ ॥ क्रियाकर्मधर्मज्यालागींकरणें ॥ खूणतेनिर्वाण हेंचिअसे ॥ ३ ॥ जपतपअनुष्ठानकायकरिजेसाधन ॥ तें

प्रत्यक्षनिधानहेंचिअसे ॥ ४ ॥ नामाह्मणेमजकळलेंअनुभवें ॥ नसोडींहेजीवेंचरणतुझे ॥ ५ ॥ ॥ ४५९ ॥

संसारावरीरुसलोंहोनामें ॥ दाटलेंसप्रेमेंवोसंडत ॥१॥ स्फुंदतस्फुंदतनाचेमहाद्वारीं ॥ दृष्टिचरणावरीविठोबाच्या ॥ ॥ २ ॥ देखोनीपांडुरंगउभारुनीबाहे ॥ पालवीतआहेपीतांवरें ॥ ३ ॥ घेरेमजजवळाधरीनजीवासी ॥ कोणेगांजिलासीदुराचारीं ॥ ४ ॥ अंतरींचेंसांगपढीयंतेंमाग ॥ कां करिसीउद्वेगसंसारींचा ॥ ५ ॥ उठीवोरुक्मिणीआणीबुझाउनी ॥ वोसंगाघेउनीआलीतया ॥ ६ ॥ कवणेत्याचेंचित्त चुकविलेंचाळा ॥ शिणलामजडोळानदेखतां ॥ ७ ॥ तंव तीजगत्रजननीसंभ्रमेंकरुनी ॥ प्रीतिपान्हास्तनींवोसंडत ॥ ॥ ८ ॥ धाउनीकडीयेघेतिलाहरिखें ॥ पीतांबरेंमुखपुसिलें त्याचें ॥ ९ ॥ देवेंआलिंगिलादोघांजाहलाप्रेमा ॥ हांसेसत्यभामानवलकरी ॥ १० ॥ हाकवणियेकुळींचाकायलोभ नाम्याचा ॥ स्वामीहादीनांचापंढरीराव ॥ ११ ॥ ४६० ॥

मरणेंहेपरणेंजन्महाउगवणें ॥ मायेचीहेखूणजाणितली ॥ ॥ १ ॥ शिणलोंभारीबहुयेरझारें ॥ संगतुझापुरेनारायणा ॥ २ ॥ तूंतरीनमरेमीतरीनपुरे ॥ भक्तिहेसंचरेहाचिलाभ॥ ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवाठाईंचामीनेणें ॥ गर्भवासभोगणें तुझीलाज ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४६१ ॥

विठोबामाउलीकृपेचीकोंवळी ॥ आळवितांघालीप्रेम पान्हा ॥ १ ॥ नसांगतांसर्वजाणेतहानभूक ॥ नविसंबे व्यापकजवळींअसे ॥ २ ॥ परीमायामोहकैसाझकवीसर्वथा ॥ अंतरींचीव्यथातोचिजाणे ॥ ३ ॥ सुखशांतिस्वरूप

लेवविलीं अंगीं ॥ लागूंनेदीधगीसंसारींची ॥ ४ ॥ देउनीअभयदानकरेंतोकुर्वाळी ॥ करीतसेसाउलीपीतांबरें ॥ ॥ ५ ॥ नामरत्नांकितकथापैंश्रवणीं ॥ लेवविलींलेणींनानाविध ॥ ६ ॥ नयनींकृष्णांजनसांवळेंसुदलें ॥ समाधानझालेंडोळीयांसी ॥ ७ ॥ अच्युतअनंतसुवर्णाचीपेटी ॥ वातलीसेकंठींनिर्विकार ॥ ८ ॥ माजीचतुर्भुजरूपमध्यमणी ॥ प्रभात्रिभुवनींविराजीत ॥ ९ ॥ मुक्तपदकरींबिंदलीं गोजिरीं ॥ पद्महस्तशिरींपिंपळपान ॥ १० ॥ संतचरण रजलल्लाटींटिळक ॥ नाहींभयशंकाकळिकाळाची ॥ ११ ॥ सगुणसाजिराकटींकटदोरा ॥ प्रावर्णदुर्भराहृढबोधु ॥ १२ ॥ कामक्रोधादिककरूनीपुतळे ॥ पायींजेघातलेपायवट ॥ १३ ॥ वासनेचीबेडीलागूंनेदीक्षणीं ॥ उभाचक्रपाणीमागेंपुढें ॥ ॥ १४ ॥ संतचरणींनामाशृंगारेंमंडीत ॥ उभाअसेक्रीडत महाद्वारीं ॥ १५ ॥ ॥ ॥ ॥ ॥४६२॥

कौस्तुभसोज्वळकंठींशोभताहे ॥ भक्तांसाठींबाह्यापसरिल्या ॥ १ ॥ जनहितासाठींकरीतधांवण्या ॥ विदुराच्याकण्याकरीगोड ॥ २ ॥ ब्रह्मचारीसाक्षसमत्वेंकारिसी ॥ पुढेंतूंधांवसीआवडीनें ॥ ३ ॥ वचनाअंतरपडोंनेदीसत्य ॥ नामाह्मणेभृत्यहोसीदेवा ॥ ४ ॥ ॥ ॥ ४६३ ॥

खगावरीस्वारीकरूनियांदेवा ॥ धांवसीकेशवाभक्तांसाठीं ॥ १ ॥ रामपरशुरामकृष्णनारायण ॥ हरिसंकर्षण भक्तांसाठीं ॥ २ ॥ विभीषणातारीरावणातेंमारी ॥ दावी मावहरिभक्तांसाठीं ॥ ३ ॥ नामाह्मणेभक्ताकारणेंगोविंद॥ घेऊनियांगदाउभाठासी ॥ ४ ॥ ॥ ॥ ४६४ ॥

सर्वांभूतींनांदेसर्वनारायण ॥ सर्वसंस्थापनपांडुरंग ॥१॥ अगादेववंद्याअगागोपवेशा ॥ पावनपरेशापरमार्थी ॥ २ ॥ मूर्तीअमूर्तीचामुक्तपारंगत ॥ सर्वमायातीतसाक्षरूप ॥ ॥ ३ ॥ नामाह्मणेदेवादानवाजिंकीसी ॥ तेभाकेंआह्मांसी सांभाळावें ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥४६५॥

कागाचेविष्ठेंतजन्मत्यापिंपळा ॥ अपवादतयालाबोलूं नये ॥ १ ॥ परद्वारीणपतिकरुनीझालीसति ॥ मागील त्यास्थितिबोलूंनये ॥ २ ॥ इळाहोतातोपरिसालागला ॥ मागिलीयामोलाबोलूंनये ॥ ३ ॥ गांवरसहोतागंगेसीमिळाला ॥ गंगाजळावांचूनत्यालाबोलूंनये ॥ ४ ॥ श्वानाचीयेआस्थिपडिल्याचक्रतीर्थी ॥ चक्रांगितावांचुनीस्थितिबोलूंनये ॥ ५ ॥ तैसीमजपरीजालीगादेवा ॥ नामाह्मणेकेशवाविनवीतसें ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥४६६॥

तुजनेणोंगामहेशा ॥ ह्मणउनीआलोंगर्भवासा ॥ अंध कूपींपडिलाजैसा ॥ रात्रंदिवसतोनेणें ॥ १ ॥ तुझियानामाचीसांगडी ॥ अखंडदेईतेनखंडी ॥ पावेनमीपैलथडी ॥ त्यासांगडीआधारें ॥ २ ॥ कामक्रोधादिजळचरीं ॥ कासाविसझालोंभारी ॥ व्याकुळहोयचिंतालहरीं ॥ दुःखेंभारी दाटलों ॥ ३ ॥ कल्पनावेलीगुंडाळलीपाईं ॥ तेणेंबुडेविषयडोहीं ॥ भोंवतेंपाहींतंवकोण्हीनाहीं ॥ मगतुजध्याईंविश्वेशा ॥ ४ ॥ मजबांधोनीकर्मडोहीं ॥ घातलेंसंसारप्रवाहीं ॥ मायानदीच्यामहाप्रवाहीं ॥ वहावलोंदातारा ॥५॥ ऐसाखेदें खिन्नझालोंबहुवस ॥ नदेखोंविश्रांतीचीवास ॥ विनवीना-

माविष्णुदास ॥ गर्भवासपुरेआतां ॥ ६ ॥ ॥ ४६७ ॥

देवातूंप्रथमकर्मभोगिसी ॥ सागरींजळचरुमच्छझालासी ॥ कमठेंपाठीनसांडीऐसी ॥ कर्मैकासाविसीकेलेंतुज ॥ ॥ १ ॥ अपवित्रनामआदिवराह ॥ याहूनीथोरकर्मकांसव ॥ अर्धसावजअर्धमानव ॥ हेंभवभावकर्मांचे ॥ २ ॥ खुजेपणबळीसपाताळींघातिलें ॥ तेणेंकर्मेंतयाचेंद्वाररक्षिलें ॥ पितियाचेवचनेंमातेसीवाधिलें ॥ तेंकर्मजोडलेंपरशुरामें ॥ ३ ॥ श्रीरामाजाल्याआपदाबहुता ॥ कर्मभोगविलेंअंतरलीसीता ॥ भालुकातीर्थीवधियेलेंअवचिता ॥ नामअच्युतातुजझालें ॥ ४ ॥ ऐसाकष्टीहोउनीबौध्यराहिलासी ॥ तूंकलंकीयालोकामारिसी ॥ आपुल्यादोषासाठीं आणिकादंडिसी ॥ निष्कळंकहोसीनारायणा ॥ ५ ॥ ऐसातूंबहुतादोषींवांधिलासी ॥ पुढिलांचेजन्मअवगतोसी ॥ विष्णुदासनामाह्मणेहृषीकेशी ॥ तुझीभीडकायसीस्वामी याहो ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४६८ ॥

केशवह्मणेनामयासी ॥ जैंतूंधरिलाहोतासी ॥ तैंतूंकाकुलतीभाकिसी ॥ मजलागींहिंडसीदाहीदिशा ॥ १ ॥ तुझेंगाऱ्हाणेंसांगूंसंतापाशीं ॥ तींहींतुजसरतेंकेलेंभक्तीसी ॥ मीतंववंद्यातिहींलोकांसी ॥ त्वांतंवमजसीपाजियलें ॥ २ ॥ आमुचेंवर्मकर्मबोलतोसी ॥ सलगीकरुनीफारजातोसी ॥ उंचपदवीदिल्यापाइकासी ॥ तरीकायस्वामीसीभिऊंनये ॥ ॥ ३ ॥ मीविश्वासलोंतुझीयाभावासी ॥ श्रुतिस्मृतीआगमांसी ॥ नकळेआठरापुराणांसी ॥ ऐसेंतूंमजसीपरजीयलें ॥ ४ ॥ आतांअसोतबहुबोलासी ॥ शाहाणोसिंतरलेमान-

सीं ॥ तप्तलोहाउदकग्रासी ॥ तैसाहोऊनीठेलासीवि-
ष्णुदासनामयारे ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥४६९॥

सुखदुःखजीवींचेंसांगेनआपुलें ॥ हृदयफुगलेंफुटोंपाहे
॥ १ ॥ धरुनीपीतांबरनेईनएकांतीं॥सांगेनजीवींचीखंतित-
यापुढें ॥ २ ॥ संतसमागमेंखेळविलेंकौतुकें ॥ प्रेमाचेंभा-
तुकेंदेउनीयां ॥ ३ ॥ अंतरींचीआवडीतोचिजाणेयेक ॥
जीवलगजनकपंढरीराव ॥ ४ ॥ नामाह्मणेमजआहेपैंभरं-
वसा ॥ मनातूंविश्वासादृढधरी ॥ ५ ॥ ॥ ४७० ॥

सर्वभावेंतुजजेध्यातीदातारा ॥ त्यांचीयासंसारातूंची
होसी ॥ १ ॥ ज्याचेचित्तींनाहींआणीककांहींकाम ॥ त्या-
चायोगक्षेमतूंचिहोसी ॥ २ ॥ ऐक्यपरत्रजेंकांहींदेखिजे॥तें
त्वांहोईजेमायबापा॥३॥नामाह्मणेमाझीभक्तिजेमाउली॥ के-
शवपाहिलीक्षणमात्रें ॥ ४ ॥ ॥ ॥ ४७१ ॥

जगदानीहेंब्रीदआहेतुझेंजगीं ॥ तेंआजीमजलागींकाय
झालें ॥ १ ॥ मजपाहतांविसरुपडिलात्यानामाचा ॥ कीं
तूंजआमुचाविटआला ॥ २ ॥ सुजाण्याच्याराजापरिसी
केशवराजा ॥ भक्ताच्यियाकाजालाजूंनको ॥ ३ ॥ भक्तका-
जकैवारीहेंब्रीदचराचरीं ॥ तेंठेविलेंक्षीरसागरींलक्ष्मीपाशीं
॥ ४ ॥ मजपाहतांअभिलाषधरिलामानसीं ॥ मगतूंहृषी-
केशीविसरलासी ॥ ५ ॥ दीनानाथऐसेंनामबहुतांशींवांटि-
लें ॥ निर्गुणतेंउरलेंतुजपाशीं ॥ ६ ॥ ह्मणोनिकेशीराजावि-
सरलाआह्मां ॥ विनवितसेनामाविष्णुदास ॥ ७ ॥४७१॥

तुजवीणआह्माकोणहोपोषितां ॥ अहोजीकृपावंता
पंढरीराया ॥ १ ॥ नकरीविठ्ठलाआतांलाजीरवाणें ॥ मीं

तुझेंपोसणेंपांडुरंगा ॥ २ ॥ काकुळतीकोणायेऊंमीहोआ-
तां ॥ अनाथाच्यानाथाविठ्ठलातूं ॥ ३ ॥ एकवेळेआतांपा-
हेमजकडे ॥ नामाह्मणेवेडेंरंकतुझें ॥ ४ ॥ ॥ ४७२ ॥

विठ्ठलमाउलीकृपेचीकोंवळी ॥ आठवितांघालीप्रेमपा-
न्हा ॥ १ ॥ मजकांमोकलिलेंकवणानिरविलें ॥ कठिनकैसें
झालेंहृदयतुझें ॥ २ ॥ तुजाविणजीवलगदुजेंकोणहोईल ॥
तेंमाझेंसाहीलजडभारी ॥ ३ ॥ तूंमाझीमाउलीमीतुझातो
वत्स॥परतोंपरतोंवासपाहेंतुझी ॥ ४ ॥ मायामोहकैसीन
विसंवेसर्वथा ॥ अंतरींचीव्यथाकोणजाणे ॥ ५ ॥ ना-
माह्मणेविठ्ठलेकांगारुसालिसी ॥ केंव्हांसांभाळिसीअना-
थनाथे ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥४७३॥

तुजवांचुनीकांहींगोडनवाटेजीवा ॥ मजदिव्यकेशवा
पायतुझे ॥ १ ॥ लौकिकापासोनिकधींसोडविसी ॥ सांग
हृषीकेशीउघडोनी ॥ २ ॥ तुझेपायदिव्यतुझेपायादिव्य ॥
तुझेपायादिव्यदातारा ॥ ३ ॥ नामाह्मणेजिव्हेकाढिनामिर-
वा ॥ तुझेपायकेशवादिव्यमज ॥ ४ ॥ ॥ ४७४ ॥

जाणतेंकरीकृपाळुवाहरि ॥ लाजसर्वापरींआहेतुज ॥
॥ १ ॥ आरुषसाबडेंमीकांहींनेणेंवेडें ॥ जन्मोनीसांकडें
केलेंतुज ॥ २ ॥ बहूकीर्तिऐकिलीबहुतांचेमुखीं ॥ बहुतके-
लेसुखीशरणागत ॥ ३ ॥ नाहींतुझीसेवाकेलीमनोभावें ॥
लोभदंभगर्वेंभ्रांतिसदा ॥ ४ ॥ नामाह्मणेमजहोतातिविल्प-
त्ती ॥ सोडवीश्रीपतियेथोनिया ॥ ५ ॥ ॥ ४७५ ॥

येईंवोविठ्ठलेमजलागींझडकरी ॥ बुडतोंभवसागरींका-
ढीमज ॥ १ ॥ आक्रांतअवसरींस्मरलासेगजेंद्र ॥ दीना-

नाथब्रीदसत्यकेलें ॥ २ ॥ स्मरलीसंकटींद्रौपदीवनवासीं ॥ धांवूनिआलासीलवडसवडी ॥ ३ ॥ प्रल्हादेंतुजलागीं स्मरिलेंनिर्वाणीं ॥ संकटापासूनिरक्षियेलें ॥ ४ ॥ नामाह्मणेथोरपीडिलेंगर्भवासें ॥ अखंडपहातुसेंवास तुझी ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४७६ ॥

वाघाचियागळांशेळीबांधोनिया ॥ तैसीतुझीमायालोभापर ॥ १ ॥ कांमजसंसारींघालितोसीदेवा ॥ कैसीतुझी मायाजीवागोड ॥२ ॥ विषयाचेकल्लोळपाजीसीकेवळ ॥ हृदयकमळकैसेंतुझें ॥ ३ ॥ नामाह्मणेमजआदिअंतुयेकु ॥ जननीजनकुपंढरीराव ॥ ४ ॥ ॥ ॥ ४७७ ॥

तुझीयेचरणींअसतीदोन्हीभाव ॥ तरीमाझाजीवनकें कुंडीं ॥ १ ॥ बोलबोलेयेकमनींअसेआणिक ॥ तरीयासीदेखदोन्हीबाप ॥ २ ॥ तुजविणसुखआणिकाचेंमानीं ॥ तरी मजजननीदोन्हीदेखा ॥ ३ ॥ नामाह्मणेमाझासत्याचासाहाकारी ॥ वासमीनकरींआणिकाची ॥ ४ ॥ ॥४७८॥

जेंजेंघडेलतेंतेंघडो ॥ देहराहोअथवापडो ॥१॥परिमीन सोडींसर्वथा ॥ तुझेपायपंढरीनाथा ॥ २ ॥ क्लेशहोतनाना परी ॥ मुखींरामकृष्णहरि ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवातें ॥ जें जेंघडेलयादेहातें ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥४७९॥

केशवपुसेनामयासी ॥ तुझीनांदणूककैसी ॥ १ ॥ आह्माकायउणेंकायउणें ॥ तुझेनीधर्मेंदातारा ॥ २ ॥ तुह्मा घरींबोचकींलुगडीं ॥ आह्माघरींपोरेंउघडीं ॥ ३ ॥ तुह्मा घरींदुर्गदारवंटे ॥ आह्माघरींबारावाटे ॥ ४ ॥ तुह्माघरीं गाईह्मशी ॥ आह्माघरींउंदिरघुसी ॥ ५ ॥ तुह्माघरींवट-

कीदासी ॥ आह्माघरींआहेतिलासी ॥ ६ ॥ तुह्माघरींसे जाबाजा ॥ आह्माघरींतृणसेजा ॥ ७ ॥ तुह्माघरींसुवर्ण मडकीं ॥ आह्माघरींखापरेंफुटकीं ॥ ८ ॥ तुह्माघरींलेंकुरें बाडें ॥ आह्माघरींतुळशीझाडें ॥ ९ ॥ नामाह्मणेतुमचेघ-रींसाणेदाम ॥ आमुचेघरींतुझेंनाम ॥ १० ॥ ॥ ४८० ॥

देवदगडाचाभक्तहामावेचा ॥ संदेहदोषाचाफिटेकैसा ॥ ॥ १ ॥ ऐसेदेवतेहीफोडिलेतुरकीं ॥ घातलेउदकींबोभा-तिना ॥ २ ॥ ऐसियादेवासीवाहिलेटिळेडोळे ॥ भ-क्तभाळेभोळेनागविले ॥ ३ ॥ ऐसींहींदैवतेंनकोदाऊंदेवा ॥ नामाह्मणेकेशवाविनवीतसे ॥ ४ ॥ ॥ ॥४८१॥

ऐशाविचारेंविलासेंसमाधानकरी ॥ गोविंदाश्रीहरीना-रायणा ॥ १ ॥ सर्वकाळऐसीवदोंहीवैखरी ॥ आणीकअं-तरींआठवावें ॥ २ ॥ आणिकासींगुजनबोलेवदन ॥ वदों नारायणसर्वकाळ ॥ ३ ॥ रामकृष्णमाझ्याशेषाचेंस्तवन ॥ शास्त्रेंहीपुराणेंभाटज्याचीं ॥४॥ नामाह्मणेआतांऐसेंकरीदे-वा ॥ हृदयींकेशवाराहेमाझ्या ॥ ५ ॥ ॥ ॥४८२॥

देहपडेतंवदेहाचाअभिमान ॥ नकरींमीअज्ञानआत्म-हित ॥ १ ॥ मीमाझेंह्मणतांगेलेनेणोंकिती ॥ रंकचक्रव-र्तीअसंख्यात ॥ २ ॥ क्षणक्षणांदेहीचेंआयुष्यपैंझडे ॥ वासनातेवोढेनित्यनवी ॥ ३ ॥ मोहाचींखाणोरींमिळालीं चोरटीं ॥ खाउनीशेवटींघरघेती ॥४॥ जंववरीसंपत्तितंवव-रीसखे ॥ गेलियातेनभुंकेश्वानजेवीं ॥५॥ नामाह्मणेकेशवा मीवोतुझादास ॥ मजआहेविश्वासतुझेनामीं ॥६॥ ४८३ ॥

कितीदेवातुलायावेंकाकुलती ॥ काययासंचितीलिहिलें असे ॥ १ ॥ केलीकांहोसांडीमाझीहृषीकेशी ॥ आह्मींको-णापाशींतोंडवासूं ॥२॥ ब्रिदाचातोडरगर्जेत्रिभुवनीं ॥ तूं-चियेकधनीत्रैलोक्याचा ॥३ ॥ समूळघेतलापृथ्वीचाभार ॥ माझाकांजोजारझालातुज ॥४॥ नकोपाहूंअंतपांडुरंगेआई॥ नामाविठोबापायींमिठीघाली ॥५॥ ॥ ॥४८४॥

लपालासीतरीनामकैसेंनेसी ॥ आह्मीअहर्निशींनाम गाऊं ॥ १ ॥ आह्मापासोनीयाजातांनयेतुज ॥ तेंहेंवर्मबी-जनामघोकूं ॥ २ ॥ आह्मासीतोंतुझेंनामचीपाहिजे ॥ म-गभेटीसहजेंदेणेंलागे ॥ ३ ॥ भोळेभक्तआह्मीचुकलोंहोतों वर्म ॥ सांपडलेंनामनामयासी ॥ ४ ॥ ॥ ४८५ ॥

घालुनीआसनसाधिलापवन ॥ घेतिलेंजीवनअंतारिक्ष ॥ ॥१॥ परहस्तेंतृप्तिनव्हेजीदातारा ॥ कृपाकरुणाकराकेशी-राजा ॥२॥ तूंजीवाचेंजीवनसर्वांचेंकारण ॥ धांवेमजलागू-नकेशीराजा ॥३॥ अनाथाचानाथहेंब्रीदसाचार ॥झणींमा-झाअव्हेरकरिसीदेवा ॥ ४ ॥ विष्णुदासनामाआंकिलापैं तुझा ॥ विनवीकेशीराजाप्रेमसुखें ॥ ५ ॥ ॥ ४८६॥

काशीयेकनोजाद्वारकेगुजरु ॥ कानडाविठ्ठलुपंढरिये ॥ ॥१॥ मायबापमाझेविठ्ठलरुक्मिणी ॥ द्वारकेपाटणींमाहीयेर २ ॥ पर्वतशिखरींबदरिनारायणु ॥ सोयरासज्जनुपंढरि-ये ॥ ३ ॥ बारसींभगवंततेरेसतिखया ॥ विठ्ठलुसोयरिया पांडुरंगा ॥ ४ ॥ विटेवरीनिटसमचरणींउभा ॥ पुंडलि-काचेलोभाभक्तिलागीं ॥ ५ ॥ विष्णुदासनामाचरणींउता-वेळु ॥ करावासांभाळुआपल्याचा ॥ ६ ॥ ॥४८७॥

अपत्याचेपरीसांभाळिलेंश्रीहरि ॥ वाटनिरंतरींपहा-
तसें ॥ १ ॥ संसारींकष्टजाहलेतभारी ॥ मजनिववीह-
रिमायबापा ॥ २ ॥ गांवतेपंढरीभींवरेच्यातीरीं ॥ निरो-
पमाहेरींसांगोंनिका ॥ ३ ॥ क्षीरसागराभीतरींपहुडले
श्रीहरि ॥ कवणधांवाकरीकुमारीचा ॥ ४ ॥ पुंडलिकानेंभ-
क्तिमांडिलीचराचरीं ॥ गुढियानिरंतरींउभाविल्या ॥ ५ ॥
संतसनकादिकतेमाझेसज्जन ॥ द्वारींअसेवहनगरुडाचें ॥
॥६॥ रखुमाईमाताविठोबामाझापिता ॥ नामाह्मणेसंताभे-
टावया ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४८८ ॥

संसाराचेसोयेंचुकलेबापुडे ॥ केशवमागेंपुढेंसांभाळी-
त ॥ १ ॥ आळीकरनामेंखेळेमहाद्वारीं ॥ आंतुनीबाहेरीं
नवजेकांहीं ॥ २ ॥ संतातेंदेखोनीमिठीघालीचरणीं ॥ कु-
वंडीकरुनीदेहटाकी ॥ ३ ॥ ऐसेनिजबोधेंराहिलेनिवांत ॥
नामायेकुलतेंकेशवचरणीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ४८९ ॥

तुवांयेथेंयावेंकींमजतेथेंन्यावें ॥ खंतीमाझ्याजीवेंमांडि-
येली ॥ १ ॥ माझेंतुजविणयेथेंनाहींकोणी ॥ विचारावेंम-
नींपांडुरंगा ॥ २ ॥ नामाह्मणेवेगींयावेंकरुणाघना ॥ जा-
तोमाझाप्राणतुजलागीं ॥ ३ ॥ ॥ ॥ ४९० ॥

क्षणएकयेकांतींबैसेननिवाडें ॥ मागमजपुढेंआवडेजें
जें ॥ १ ॥ शिणभागआपुलासांगेपैंवहिला ॥ असेलजो
वाढलामजविण ॥ २ ॥ पुरवीनजीवींचेंसर्वतुझेंकोड ॥ गग-
नाहुनीवाडअसेलजरी ॥३॥ वाटेमाझेंसर्वद्यावेंतुझेहातीं ॥
नामरूपवृत्तीसहितमन ॥ ४ ॥ परिसर्वभावेंतुझेंउदासीन
चित्त ॥ उरलेंमाझेंआर्तकवणपुरवी ॥ ५ ॥ ह्मणोनिपां-

डुरंगधरुनीहनुवटी ॥ सांगेजिवींच्यागोष्टीनामयाजव-
ळी ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥४९१॥

भक्ताचेहृदयींजाणोनिअवस्था ॥ आलाशरणांगतालोभा-
पर ॥ १ ॥ संतापुसेमाझेंदाखवारेनामें ॥ तुह्मासमागमें
खेळेसदा ॥ २ ॥ दृष्टीसीदाटलेंकृपेचेंभरतें ॥ ह्मणेतेंआ-
वडतेंकेउतेंगेलें ॥ ३ ॥ वाहेजळनयनींकोमाइलेवदनीं॥
आणारेगवसोनीआळीकर ॥ ४ ॥ तंवतोवाटपहातहोता
परलक्षीं ॥ भेटीदेउनीसुखीकेलादेव ॥ ५ ॥ नामाह्मणेवि-
ठोतूंमाझासुखराशी ॥ ह्मणीदूरजासीहृदयींचा ॥६ ॥४९२॥

दाहीदिशापाहतांदिसतीनिर्मळ ॥ स्फुरणवक्षस्थळहोत
असे ॥ १ ॥ येईलमाझाविठोदेईलआलिंगन ॥ जीवेंनिं-
बलोणकरीनत्यासी ॥ २ ॥ प्रेमपूरभरतेंसुखासिंधुलोटली ॥
माउलीभेटलीजीवलग ॥ ३ ॥ धरुनीहनुवटीसांगेलगुज
गोष्टी ॥ पाहीलकृपादृष्टिमाझेंह्मणोनि ॥ ४ ॥ प्रीतीच्या
पडीभरेंकुर्वाळीलमज ॥ सांगेलनिजगुजसंसारींचें ॥ ५ ॥
हर्षेनिर्भरनामानिवालानिवाडें ॥ नाचेसंतापुढेंसांगेगु-
ज ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥४९३॥

अज्ञानबापुडेंनेणेंकांहींविडें॥ जन्मोनीसांकडेंतुजदेवा ॥
॥ १ ॥ जाणसीतेंकरीकृपाळुवाहरी ॥ लाजसर्वांपरीआहे
तुज ॥ २ ॥ मीतंवअपराधीअसेंलक्षकोटी ॥ परीह्मणवि-
तोंजगजेठीदासतुझा ॥ ३ ॥ नाहींतुझीसेवाकेलीमनोभा-
वें ॥ लोभदंभगर्वेंभ्रांतसदा ॥ ४ ॥ बहुतांमुखींतुझीऐ-
किलीकीर्ति ॥ दीनानाथह्मणतीआर्तबंधु ॥ ५ ॥ नामाह्मणे
मजमोकलिसीझणीं ॥अनाथह्मणोनिपाळीदेवा ॥६॥४९४॥

तुझीयासंतांचीअंगसंगसंगती ॥ तेशिणल्याविश्रांति संसारिया ॥ १ ॥ श्रवणकीर्तनध्यानघडेअनायासें ॥ भेदभ्रमनासेतेचिक्षणीं ॥ २ ॥ ऐसेंभाग्यमजदेसीकवणेकाळीं ॥ होईनपायधुळीवैष्णवाची ॥ ३ ॥ वदनींतुझेंनाम वसेनिरंतर ॥ राखीनत्याचेंद्वारथोरआशा ॥ ४ ॥ येतां जातांमजकरितीसावधान ॥ वदनींकृष्णकृष्णह्मणविती ॥ ॥ ५ ॥ कामधेनुघरींअसेप्रसवली ॥ तेविकावयानेलीदैवहतें ॥ ६ ॥ पंथींपडिलापायालागेचिंतामणी ॥ पाषाणह्मणउनीउपेक्षिला ॥ ७ ॥ तैसीपरीमजझालीसेअधमा ॥ चुकलोंतुझ्यावर्मांकेशीराजा ॥ ८ ॥ नामाह्मणेथोरखंतीवाटे जीवा ॥ कृपाकरुनीठेवाकरमाथा ॥ ९ ॥ ॥ ४९५ ॥

गौळीयाच्याघरींकैवल्याचादानी ॥ परब्रह्मअंगणींक्रीडतसे ॥ १ ॥ ऐसेंकांहींकराआलेनोंसंसारा ॥ जेणेंजोडे सोयरापांडुरंग ॥ २ ॥ करितांत्याचेंकाजमनींनधरीलाज ॥ ह्मणेहेंशरणमजसर्वभावें ॥ ३ ॥ राखेबळीचेंद्वारपाहेत्याची वास ॥ ह्मणेहामाझादासअंतरंग ॥ ४ ॥ गोवळ्याचेंउच्छिष्टभक्षीनधरीविट ॥ आवडीनिकटगोपाळाची ॥ ५ ॥ तरीचक्रियाकर्मकेलेंहोसफळ ॥ जरीहृदईंगोपाळयेउनीराहे ॥ ६ ॥ येरतेमायावीजगभुलवणी ॥ नित्यविभांडणीसर्व भावें ॥ ७ ॥ नामाह्मणेऐसेंसंताचीयासोई ॥ विठोबाचे पाईंठावमज ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ४९६ ॥

कायाकरपैंफुटोंनेदी ॥ टाळदिंडीवाहीनखांदीं ॥ १ ॥ तूंवोमाझातूंवोमाझा ॥ तूंवोमाझाकेशीराजा ॥ २ ॥ आळ-

वणीचातूंबावाचे ॥ येणेंछंदेंपंधानाचे ॥३॥ तूंवामाझामीदा-
सतुझा ॥ विनवितोनामाकेशीराजा ॥ ४ ॥ ॥४९७॥

भावेंविणभक्तिकशानेंहोकरी ॥ मायामोहवैरीदेहामाजीं
॥ १ ॥ तुझेंनामदिव्यरसजिव्हेस्वाद ॥ नाशकामक्रोधक-
रितीमाझा ॥ २ ॥ जेजेवस्तूतेंनयनींमीपाहें ॥ त्यात्याधां-
वताहेविषयींमन ॥ ३ ॥ नामाह्मणेथोरउबगलोंसंसारीं ॥
पुढेंकाळवैरीग्रासूंपाहे ॥ ४ ॥ ॥ ॥ ४९८ ॥

तुझ्यापायींचित्तरंगलेंमाझें ॥ नाहींकेशीराजेंऐसेंकेलें ॥
॥ १ ॥ उठवितांकायहोईलसंतोष ॥ मजअभाग्यासमोक-
लिलें ॥ २ ॥ प्रपंचकावाडींनघालींमजदृढ ॥ नकोवाडें
कोडेंह्मणींमज ॥ ३ ॥ नामाह्मणेभावेंविनंतिसमस्तां ॥ न-
काभंगोंआतांप्रेमपान्हा ॥ ४ ॥ ॥ ॥ ४९९ ॥

दाविसीअनंतास्वरूपेंअनेक ॥ वाउगाचीशोकवाढवि-
सी ॥ १ ॥ आपुल्यामानसींविचारूनीपाहे ॥ सावधान
होयतुझ्यापायीं ॥ २ ॥ नामाह्मणेनामनिर्वाणींचेंबीज ॥
मजसाठींगुजदावीयेलें ॥ ३ ॥ ॥ ॥ ५०० ॥

पंढरिसीकरूंनित्यतेदिवाळी ॥ आरतीवोवाळीकेशवरा-
जा ॥ १ ॥ पावावयाभेटीबरव्याविनोदें ॥ नामघोषछंदें
नाचतसे ॥ २ ॥ नामाह्मणेआह्मीपंढरीसजाऊं ॥ कवतु-
केंपाहूंविठोबासी ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ५०१ ॥

भेटिलागींमाझाफुटतसेप्राण ॥ कायावाचामनजीवभाव
॥ १ ॥ जयादेखेंतयापुसेंहेचीमात ॥ कैंमजअनंतबोलवी-
ल ॥ २ ॥ संतसमागमदसरादिवाळी ॥ ठेउनीनिराळीं
वाहेसदा ॥ ३ ॥ सखेपंढरीचेयेतीवारकरी॥आर्तमीतोघरीं

त्यांचेपायीं ॥ ४ ॥ नामाह्मणेऐसेंकरीदंडवत ॥ आमुतेंपुनीतकरीबापा ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ५०२ ॥

वाळवंटींउभाकरेंकुर्वाळिला ॥ जीवींचेंपुसेत्यालाजडभारी ॥ १ ॥ हरुषेंलोळणीघालूंमहाद्वारीं ॥ येईलसामोरी केशीराज ॥ २ ॥ माझाअभिमानधरुनीमानसीं ॥ नामाह्मणेहोसीभक्तांसाह्य ॥ ३ ॥ ॥ ॥ ५०३ ॥

तूंमायमाउलीआसकेलीथोरी ॥ वासनिरंतरींपंढरीये ॥ ॥ १ ॥ स्वरूपदाखवींयेकवेळमज ॥ धरूंनकोलाजपांडुरंगा ॥ २ ॥ नामाह्मणेतुजभक्तीचेंपैंपिसें ॥ पुरविसीआसदुर्बळाची ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥५०४॥

कपटनाटकाकल्लोळकरुणा ॥ मजलागींदीनाधांवसीदेवा ॥ १ ॥ रात्रंदिवसमजठेवूनजवळ ॥ घालिसीकवळ मुखामाजीं ॥ २ ॥ पेंध्यासुदाम्यांचेकारसीकैवार ॥ मजशीं अंतरकेलेंआतां ॥ ३ ॥ नामाह्मणेआतांकारितोबोभाट ॥ भिऊंनकोभेटकेशीराजा ॥ ४ ॥ ॥ ॥ ५०५ ॥

मुंगिचीयागळाबांधोनियांमेरु ॥ तेणेंहाप्रकारुकळोंआला ॥ १ ॥ माळियाचेंपोरलपविलेंपोटीं ॥ तेणेंजगजेठी सुखमानी ॥ २ ॥ कुल्लाळेंहाततोडविलेंमूळ ॥ दाखवीनवलतयासाठीं ॥ ३ ॥ मजसाठींकायधरियेलेंमौना ॥ धांवनारायणानामाह्मणे ॥ ४ ॥ ॥ ॥ ५०६ ॥

निर्गुणपणाच्यावहासीअभिमाना ॥ तुजनारायणानसोडींमी ॥ १ ॥ कायतुझीभीडधरावीमीआतां ॥ कृपाळुवाअनंतादेवराया ॥ २ ॥ पुंडलीकासाठींउभाराहिलासी ॥

ठकडातूंहोसीमजलागीं ॥ ३ ॥ नामाह्मणेनकोमजचाळवण ॥ लवकरींचरणदावीदेवा ॥ ४ ॥ ॥ ५०७ ॥

भक्तांचीअपेक्षाधरुनीअंतरीं ॥ राहेभीमातीरींपंढरीये ॥ ॥ १ ॥ अठ्ठावीसयुगेंगेलींविचारितां ॥ निर्गमसर्वथानव्हे देवा ॥ २ ॥ कटींकरउभाशिणलेंशरीर ॥ धरुनीनिर्धार भक्तिभावा ॥ ३ ॥ नामाह्मणेआतांनकोखटपट ॥ आमुचेवोभाटनकोपाहूं ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥५०८ ॥

निर्विकल्पनामअनंतकल्पना ॥ होसीनारायणाअन्यक्तेशीं ॥ १ ॥ लाजतेलाविलीनिर्गुणपणासी ॥ श्रुतिपुराणासीसाम्यदावी ॥ २ ॥ चातुर्यसागरनंदाचाखिल्लारी ॥ गाईनिरंतरींचारशील ॥३॥ देवातूंदेवपणमिरविसीनिकें ॥ नामाह्मणेसुखतुझेपायीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ५०९ ॥

पतितपावनाधांवसीनिर्वाणीं ॥ ब्रीदचक्रपाणीसत्यकेलें ॥ ॥ १ ॥ कायअपराधकोणाचेपाहिले ॥ नाहींत्वांत्यागिलें नष्टखळां ॥ २ ॥ अजामेळासाठींआहारावर्जिलें ॥ बीजतें भाजिलेंभवमूळ ॥ ३ ॥ नामाह्मणेदेवानागवेंचिवरें ॥ आतांउणेंपुरेंपाहूंनका ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ५१० ॥

सकळवैभवनिजकर्मभोग ॥ तेंतुजउद्वेगदावीकांहीं॥१॥ मीतूंपणातेथेंअसेमगकैंचा ॥ निर्वाणठाईंचातोडीवेळ ॥२॥ आपुलाकरुनीठेवीमजपायीं ॥ थोरपणकांहींनकोमज ॥ ॥ ३ ॥ नामाह्मणेतुझेपायहेसाचार ॥ कायसाविचारदेखों आतां ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५११ ॥

केशवचरणींमनेंदिलीबुडी ॥ इंद्रियेंबापुडींधांवतीपाठीं॥ ॥ १ ॥ संसारसंभ्रमनकोसुखलेश ॥ भातुकेंसरिसेंपाठवि-

सी ॥ २ ॥ जन्मजन्मांतरींजाणावेंकवणें ॥ जाणोनिभोग-
णेंकवणेंस्वामी ॥३॥ नामाह्मणेकेशवातूंभक्तवत्सला ॥ आ-
ह्मासीवेगळाहोऊंनको ॥ ४ ॥ ॥ ॥ ५१२ ॥

धन्यमाझाजन्मधन्यमाझावंश ॥ धन्यविष्णुदासस्वामी
माझा ॥१॥ कामधाममाझेंकेशवाचेपाय ॥ दीननिशीपाहे
हारपली ॥ २ ॥ शुकसनकादिकांजेणेंसुखीकेलें ॥ तेंसुख
राहिलेंमाझेमनीं ॥३॥ नामाह्मणेजगींअलभ्यलाभझाला ॥
हरिसांपडलाविटेवरी ॥४॥ ॥ ॥ ५१३ ॥

केशवाचेंमजपाहूंद्यारेमुख ॥ लागलीसेभूकनयनांसी ॥
॥ १ ॥ कस्तूरीकुंकुमभरूनियाताट ॥ अंगींबरवंटगोपाळा-
सी ॥ २ ॥ जाईजुईपुष्पेंगुंफियेल्यामाळा ॥ घालूंघननिळा
आवडीनें ॥ ३ ॥ नामाह्मणेहरीपंढरीचेराणे ॥ श्रीमुख
पारणेंहोतअसे ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ५१४ ॥

सहस्रामिळणीसिंधुझालीजेमुखें ॥ वोघतोउदकेंआन
नाहीं ॥ १ ॥ बीजाचियापोटींवटाचाविस्तार ॥ सर्वतोआ-
कारतुझाअसे ॥ २ ॥ नामाह्मणेतुझेंअवघेंकरणें ॥ खवळो-
नीसुणेंघेऊंनको ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥५१५॥

तीर्थासीजाउनीकायम्यांकरावें ॥ वाउगेंहिंडावेंपंथेंतेणें
॥ १ ॥ माझेंतीर्थक्षेत्रपंढरीपेंजाण ॥ उघडेंनिधानदृष्टीपुढें॥
॥ २ ॥ मागेंथोरथोरींहेंचिपैंसाधिलें ॥ नाम्यासीदिधलेंखे-
चरानें ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥५१६॥

मरणेंपरणेंजन्मउगवणें ॥ मायेचीतेखूणसांगितली ॥१॥
संगतुझापुरेंसंगतुझापुरें ॥ संगतुझापुरेंनारायणा ॥२॥ तूंत-
रीनमरेंमीतरीनपुरें ॥ भक्तिहेसंचरेहाचीलाभ॥३॥नामाह्मणे

माझ्याठायींचामीनेणें॥ संसारभोगणेंतुझीलाज ॥४॥५१७॥

गर्भवासह्मणतांमीऐसाभितों ॥ गाईबैसवितोंव्याघ्रापुढें ॥ १ ॥ नकोहासंसारनकोहासंसार ॥ नकोहासंसारदेवराया ॥ २ ॥ कोपेंकाळसर्पेंधरिलेंअजेसी ॥ तेणेंकासाविसीसांगोंनेणें ॥ ३ ॥ नामाह्मणेतुझेंकेशवामींबाळ॥ ऐसा तूंकृपाळमायबाप ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ५१८ ॥

भिउनीनिंघिजेसमर्थाचेपाठीं ॥ विषयाचीभेटीनकोमज ॥ १ ॥ तैसामीशरणआलोंतुजकेशवा ॥ मजत्वांराखावापायातळीं॥२॥ नकोउदासीनराखाअभिमान ॥ माझेंआगमन विचारीकां ॥३॥ तुझेंनिहोईलतेंचिमीमागेन ॥ नसोडींचरण अहर्निशीं ॥४॥ अविद्याअपारसंचरलीदेवा ॥ आह्मांसीकुडावानाहींकोणीं ॥५॥ देवामजआतांनकोगर्भवास ॥ नामा विष्णुदासविनवीतसे ॥ ६ ॥ ॥ ॥ ५१९ ॥

शरणांगतासीनकोमोकलावा ॥ हेंतरीकेशवाजाणतोसी ॥ १ ॥ सांगणेंनलगेसांगणेंनलगे ॥ सांगणेंनलगेमायबापा ॥ २ ॥ सांगतांसमर्थसर्वेचिविसरे ॥ त्याच्याअभ्यंतरींनव्हेबोल ॥ ३ ॥ नामाह्मणेतैसानहोसीशहाणा ॥ आठरापुराणांवेडावलें ॥ ४ ॥ ॥ ॥ ५२० ॥

सर्वजीवजंतुझालासीआपण ॥ पतितपावनकैसाहोसी ॥ १ ॥ मनइंद्रियांचातूंचिचाळविता ॥ ठेविशीतूंसत्ता कोणेठाईं ॥ २ ॥ सुवर्णाचेपाठींझालाअळंकारू ॥ वानितां साचारुयेकरूप ॥ १ ॥ नामाह्मणेऐसाअसतांनिर्धार ॥ आह्मांसीअव्हेरकरूंनका ॥ ४ ॥ ॥ ॥ ५२१ ॥

मुळींचमीजाणेंतुझ्याठेंगेपणा ॥ कायनारायणाबोलशील ॥ १ ॥ पुरेपुरेआतांतुमचेआचार ॥ मजसींवेव्हारघालूं नका ॥ २ ॥ लालुचाईसाठींमागेभाजीपान ॥ लाजनारायणातुजनाहीं ॥ ३ ॥ नामाह्मणेकायसांगोंतुझीकीर्ति ॥ वाउगीफजितीकरूंतुज ॥ ४ ॥ ॥ ॥ ५२२ ॥

सांडोनीसंसारझालोंमीअंकित ॥ ऐसियाचाअंतपाहूं नको ॥ १ ॥ पातकीमीसत्यपातकीमीसत्य ॥ पातकीमी सत्यपांडुरंगा ॥ २ ॥ माझेगुणदोषनधरिसीचित्तीं ॥ थोरपणख्यातिदावीआह्मा ॥ ३ ॥ ऐसाअपराधआणूंनकोमना ॥ पंढरीच्याराणाह्मणेनामा ॥ ४ ॥ ॥ ५२३ ॥

साचपणेंब्रीदासोडवीनतुझ्या ॥ आतांकेशीराजापणहाचि ॥ १ ॥ लवाडतूंदेवालबाडतूंदेवा ॥ लवाडतूंदेवाठावा आह्मा ॥ २ ॥ कायमूर्खपणसांगशीलगोष्टी ॥ थोरपणेंमोठीपुरेवोआतां ॥ ३ ॥ नामाह्मणेकायखवळिसीआह्मा ॥ लाजनाहींतुह्माकोणाविषीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ५२४ ॥

वायातडातोडीकेलीमाझ्यामनें ॥ राहिलेंलपोनतुझेपाईं ॥ १ ॥ नकोनकोमजकल्पनेचासंग ॥ आलासेउबगनारायणा ॥ २ ॥ कामक्रोधलोभपाठीलागींयेती ॥ ह्मणीत्याचे हातींदेसीदेवा ॥ ३ ॥ नामाह्मणेहोसीअनाथाचाकैवारी ॥ ब्रीदचराचरींवाणिताती ॥ ४ ॥ ॥ ॥ ५२५ ॥

अपराधाच्याकोटीहोचिमाझीजोडी॥पावनत्वप्रौढीनामतुझें ॥१॥ माझियासंचिताऐसेंचिपैंझालें॥कायतूंआपुलेंसांडीसीब्रीद ॥ २ ॥ अन्यायाच्याकोटीघालुनीयापोटीं ॥ नामाह्मणेभेटीदेईंआह्मा ॥ ३ ॥ ॥ ॥ ५२६ ॥

आतांमाझीचिंतातुजनारायणा ॥ रुक्मिणीरमणावासुदेवा ॥ १ ॥ द्रौपदीसंकटींवस्त्रेंपुरविलीं ॥ धांवत्वांघेतली गजेंद्रासी ॥ २ ॥ उपमन्याआळीदेवापुरविली ॥ अढळपदींदिल्हीवस्तीध्रुवा ॥ ३ ॥ नामाह्मणेकराकरुणाकेशवा ॥ तूंमाझाविसावापांडुरंगा ॥ ४ ॥ ॥ ५२७ ॥

हेंचिमाझीसंध्याहेंचिमाझेंस्नान ॥ तुझ्यापाईंमनलागोदेवा ॥ १ ॥ हेंचिमाझीरिद्धिहेंचिमाझीसिद्धि ॥ अखंडसमाधिपायतुझे ॥ २ ॥ नामाह्मणेहेंचिदेईंगाश्रीपति ॥ कथेचीविश्रांतिजन्मोजन्मीं ॥ ३ ॥ ॥ ॥ ५२८ ॥

वीणाघेउनीयाकरीं ॥ उभाराउळामाझारीं ॥ १ ॥ ताहानभूकहारपली ॥ छंदलागलाविठ्ठलीं ॥ २ ॥ कन्यापुत्रबापमाय ॥ त्याचाआठवतोनये ॥३॥ नामाह्मणेहेंचिदेईं ॥ तुझेंपायींमाझीडोई ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ५२९ ॥

कटींकरठेउनीउभा ॥ पाहाकैसाघरघेण्या ॥ १ ॥ माझाहिशोबकरीहिशोबकरी ॥ हिशोबकरीकेशवा ॥ २ ॥ चौऱ्याशीलक्षजन्मकेलीतुझीसेवा ॥ माझेंठेवणेंदेईंदेवा ॥ ३ ॥ नामाह्मणेमजखवळिसीवाया ॥ पिसाळलोंतरीझोंबेनतुझ्या पायां ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५३० ॥

नामयानेंबंदरघेतिलें ॥ विठ्ठलासीजीतचिधरिलें ॥ १ ॥ नामाआलारेह्मणती ॥ भेणेंकळिकाळकांपती ॥ २ ॥ भावभक्तिकरुनीकडी ॥ विठ्ठलपाईंजडलीगोडी ॥ ३ ॥ देहकरूनिबंदरवान ॥ विठ्ठलसांठविलानिधान ॥४॥ सोहंशब्दमारकेला ॥ विठ्ठलकाकुलतीआला ॥ ५ ॥ नामाह्मणेविठ्ठलातें ॥ जीवगेल्यानसोडींतुतें ॥ ६ ॥ ॥ ॥ ५३१ ॥

तुझियापायाचेंप्रमाणहेंमाझें ॥ चरणकमळतुझेंविसंबे-
ना ॥ १॥ संसाराच्यागोष्टीकिटजालेंपोठीं ॥ रामकृष्णकं-
ठींमाळघाली ॥ २ ॥ दुरोनीयादेखेंगरुडाचेंवारिकें ॥ गो-
पाळासारिखेंचतुर्भुज ॥ ३ ॥ नामाह्मणेविठोजन्मन्मांतरीं ॥
ऋणीकरुनीकरींघेईमज ॥ ४ ॥ ॥ ॥ ५३२ ॥

देशींपरदेशींजालोंतुजविण ॥ माझेंसमाधानकोण
करी ॥ १ ॥ चातकचकोरापरिपाहेवास ॥ तूंकांरेउदास
पांडुरंगा ॥ २ ॥ नामाह्मणेचित्तदेईमाझ्याबोला ॥ जीवहा
उरलातोनिघोंपाहे ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ५३३ ॥

करींघेउनीब्रह्मवीणा ॥ नारदबोळगेनारायणा ॥ १ ॥
हेंचिहेंचितत्त्वसार ॥ नामह्मणेकांनिरंतर ॥ २ ॥ आपण
शिवआणिशक्ति ॥ रामनामतेजपती ॥ ३ ॥ गातनाचत
प्रल्हादवीर ॥ स्तंभींकेलासेअवतार ॥ ४ ॥ कुंटणीपक्षीह्म-
णेबारामा ॥ तिसीनेलेंनिजधामा ॥ ५ ॥ अहल्येसीलाग-
तांचरण ॥ तिसीआलेंमनुष्यपण ॥ ६ ॥ अजामेळपात-
कीअपार ॥ नामेंपावलापैलपार॥७॥गजेंद्रेंकेलेंनामस्मरण॥
त्याचेंतोडिलेंबंधन ॥ ८ ॥ द्रौपदीस्मरेहृषीकेशी ॥ वस्त्रें
पुरविलींतियेसी ॥ ९ ॥ परीक्षितीसीघडलेंस्मरण ॥ त्या-
सीजालेंसुलभचरण ॥ १० ॥ नामाह्मणेनिरंतरु ॥ गगनीं
अढळकेलाधुरु ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ५३४ ॥

सर्वसुखजेणेंलाहिजेतेंयेक ॥ तेंहेंपुंडलिकेंदाखविलें॥१॥
पाहारेउघडाडोळापरब्रह्मपुतळा ॥ मुक्तीचासोहळापांडुरंग
॥ २ ॥ पाहतांमनमुरेध्यातांचित्तनुरे ॥ गातांधणीनपुरेकी-

तिंज्याची ॥ ३ ॥ नामयाचास्वामीउभाविटेवरी ॥ तथा जीवेंकरीनिंबलोण ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ५३५ ॥

पांडुरंगातुझीपहातसेंवास ॥ चरणरात्रंदिवसाचिंतीतसें ॥ १ ॥ तान्हेंवत्सघरींबांधलेंसेंदावां ॥ हृदईस्मरेधांवामाउलीचा ॥ २ ॥ नामाह्मणेविठोतूंमाझासोइरा ॥ ह्मणींमज अव्हेराअनाथनाथा ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥५३६॥

असोमाझेंमनसदापंढरीनाथा ॥ नसोडींसर्वथाचरणतुझे ॥ १ ॥ यासीकायकरूंसांगाजीगोपाळा ॥ कांस्नेहलाविलापूर्वींहूनी ॥ २ ॥ हृदईंचित्तवृत्तिमनेंसींमिळोनी ॥ अवघींतुझ्याचरणींसुरवाडिलीं ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवाधरली तुझीसेवा ॥ सुखअनुभवाअनुभविलें ॥ ४ ॥ ॥५३७॥

उदारकृपाळसांगसीलजना ॥ तरीकांरावणामारियेलें ॥ १ ॥ नित्यनित्यपूजाशिरकमळींकरी ॥ तेणंतुझेंहरिकायकेलें ॥ २ ॥ कितीवडीवारसांगसीलवाया ॥ ठावापंढरिरायाआहेसीआह्मा ॥ ३ ॥ कर्णाऐसावीरजुंझारउदार ॥ त्यासीतूंजर्जरकेलेंवाणीं ॥ ४ ॥ पाडिलेंभूमींसीनियेतुजकरुणा ॥ त्याचेनारायणापाडिलेदांत ॥ ५ ॥ श्रीयाळबापुडें सात्विकनिर्वाणीं ॥ खादलेंकापूनित्याचेंपोर ॥ ६ ॥ ऐसा कठिनकोणहोईलदुसरा ॥ कांडियेलेंशिराउखळामाजीं॥७॥ शिभ्रीचक्रवर्तिकरितांयज्ञयाग ॥ कापिलेत्याचेंअंगठाईंठाईं ॥ ८ ॥ जाचूनियाप्राणघेतलातयाचा ॥ कायसांगसीवाचा बडिवार ॥ ९ ॥ हरिश्चंद्राचेंराज्यघेउनीयासर्व ॥ विकिलें त्याचेजीवडोंबाघरीं ॥१०॥ बहुतचिश्रमदिधलेतयासी ॥ परितोसत्वासीढळेचिना ॥ ११ ॥ पडिलाविघडनळदमयं-

ति ॥ ऐसीकृपामूर्तीबुद्धितुझी ॥ १२ ॥ आणीकतुझीकीर्ति सांगावीतीकिती ॥ केलीत्वांफजितीमाउशीची ॥ १३ ॥ मारियेलामामासखापुरुषोत्तमा ॥ नामाह्मणेसीमाफारके-ली ॥ १४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५३८ ॥

येईनाआझूनिश्रीकृष्णसदना ॥ गोवळारक्षणामायबापा ॥१॥ लाउनीयाआशाफिरविसीदिशा ॥ प्रेमभावकैसादा-वीआतां ॥ २ ॥ विष्णुदासनामाकरितोविनंति ॥ निर्वाणीं श्रीपतिकोपूंनको ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ५३९ ॥

मीअसेंतेथेंमगतूंकैंचा ॥ हाउपजतठाईंचातोडीवेलु ॥१॥ आपुलेंकरुनीठेवीतुझेचरणीं ॥ नमानितीकोणीक्षितीनाहीं ॥२॥ सेवातुझीदेवादेईंदुजेपण ॥ येरतोअभिमानखंडीमा-झा ॥ ३ ॥ नामाह्मणेदेवाआवडसीमाझ्याजीवा ॥ सुखरू-पकेशवाविठ्ठलराजा ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥५४०॥

निरंतरयेणेंराहेसमाधान ॥ मगप्रारब्धभोगणेंगोडवाटे ॥ १ ॥ हृदईंतुझेंरूपवदनींतुझेंनाम ॥ बुद्धिहेनिष्कामधरी-नदेवा ॥ २ ॥ नामाह्मणेतुझींपाउलेंचिंतितां ॥ झालोंकृत-कृत्यजन्मोजन्मीं ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥५४१॥

असोआतांकितीकरूंठेवाठेवी ॥ कृपाविठ्ठलदेवींकेलीमज ॥१॥ अंतरींच्यासुखेंनाचतसेभोजें ॥ हेंचिनिजगुजजाणवलें ॥ २ ॥ नामाह्मणेअंतरीचेंनिजगुज ॥ सांगितलेंमजपां-डुरंगें ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५४२ ॥

वांसरूंभोंवतेंखुंटियाभोंवतें ॥ आपणआपणीयातेंगोवि-येलें ॥ १ ॥ तैसीपरीमजझालीगादेवा ॥ गुंतलोंसेंयाभा-

वालटिकिया ॥ २ ॥ नामाह्मणेकेशवातोडीकांबंधनें ॥ मी येकपोसणेंतुझेंभक्त ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥५४३॥

देवाविनंतीएकमाझी ॥ म्यांसेवाकरावीतुझी ॥ आसन करावीआणिकाची ॥ यासाभिलाषालाउनी ॥ १ ॥ म्यां तूंतेंअनुसरावें ॥ तुवांमातेंआपंगावें ॥ आणिकाचेंह्मणोंने-दावें ॥ त्रिभुवनींसमर्था ॥ २ ॥ वदनींतुह्मातेंवर्णावें ॥ श्र-वर्णीगुणनामऐकावें ॥ नयनींचरणनविसंबावे ॥ क्षणयेकदा-तारा ॥ ३ ॥ आणिकासंसारा ॥ धाडूंनकोमजलादारा ॥ तूंअनादीसोयरा ॥ बंधुआदिकरुनी ॥ ४ ॥ जरीतुजन पोसवेदातारा ॥ तरीआयुष्याघालींचिरा ॥ येकापोटासाठीं दुर्भरा ॥ उपेक्षूंनको ॥ ५ ॥ सेवकनकरीआणिकाचा ॥ जन्मोजन्मींदाससाचा॥तुजवर्णावयाहेमाझीवाचा ॥ आणि-काउच्छिष्टाहोऊंनेदी ॥ ६ ॥ मजनह्मणेचिसकळजन ॥ प-रीत्वांनव्हावेंउदासीन ॥ तुझीयानामावांचून ॥ आणीकन मगेचीसर्वथा ॥ ७ ॥ नामविक्रयोनकरावा ॥ दानप्रतिग्रह नघ्यावा ॥ कष्टेंकरुनीमेळवावा ॥ तोचिग्रासआपुला ॥८॥ नलगेछत्रघोडेदिवटे ॥ जेणेंतुजसीअंतरपडे ॥ तुझेंनाम-चीआवडे ॥ मगबापुडेंह्मणोतकां ॥ ९ ॥ मीजीअपराधी अनाथ ॥ तुझेंनामअसेघोकित ॥ रात्रंदिवसहृदयांत ॥ थोरआशालाऊनियां ॥ १० ॥ विष्णुदासनामाह्मणे ॥ प-रीसखरेंकुडेंनाणें ॥ जन्मोजन्मींचेंपोसणें ॥ विठ्ठलाउणेंये-ऊंनेदी ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५४४ ॥

परियेसीनामयासांगेनमीतुज ॥ अंतरींचेंगुजभरावया ॥ १ ॥ तूंमाझेंआवडतेंकृपेचेंपोसणें ॥ चित्ताचेंपैंपार-

णेंकरीनतुज ॥ २ ॥ येणेंसंतसंगेंयावेंमाझेगांवां ॥ भोगा-
याराणीवावैकुंठींच्या ॥३॥ माझियाकथेचीजयासाआवडी ॥
माझीप्रेमगोडीपढियेजया ॥ ४ ॥ त्याचीपायधुळीलावावी
सर्वांगें ॥ ह्मणोनिमागेंमागेंहिंडतसे ॥ ५ ॥ भलतेयातीचे
भलतेनीचभावें ॥ भलतेंयेकध्यावेंनाममाझें ॥ ६ ॥ त्या-
चियेउपकारेंदाटेंमीसर्वदां ॥ मुगुटकरुनीमाथांवाहिनत्या-
सी ॥ ७ ॥ चिंतानकरीनाम्यानुपेक्षीसर्वथा ॥ अभयकर
माथाठेविलादेवें ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ५४५ ॥

लवनिमिष्यह्मणाआतांआहेनाहींपाहतां ॥ क्षणएक
संपदाविषयोहा ॥ १ ॥ स्वहिततेंआचराहिततेंविचरा ॥
नामींभावधराजाणतेनो ॥ २ ॥ संपत्तीचेबळेंएकझालेअं-
धळे ॥ वेढिलेंकळिकाळेंस्मरणनाहीं ॥ ३ ॥ एकविद्यावंत
जातीचाअभिमान ॥ तेनेलेतमोगुणेंरसातळा ॥ ४ ॥ मि-
थ्यामायामोहकरुनीहत्यास ॥ वंचिलेंआयुष्यवायावीण ॥
॥ ५ ॥ नामाह्मणेकृपाकरुनीऐशाजीवा ॥ सोडवीकेशवा
मायबापा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ५४६ ॥

मायबापाचीतेसांडोनियाआस ॥ धरलीतुझीकासपां-
डुरंगा ॥१॥ ह्मणींपांडुरंगाउपेक्षिशीलमातें ॥ तरीहांसती-
लतुतेंसंतजन ॥ २ ॥ नामाह्मणेतुझींपाउलेंसमान ॥ तेथें
माझेंमनास्थिरावलें ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ५४७ ॥

आह्मीकायनेणोंतुझाअंतपार ॥ होसीतूंसाचारनिवारि-
ता ॥ १ ॥ बहूअपराधीजाणायातिहीन ॥ पतितपावन
पांडुरंगा ॥ २ ॥ नामाह्मणेऐसापातकीपामर ॥ करिसीउ-
द्धारसाचब्रीदें ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ५४८ ॥

नावडेप्रपंचतापत्रयमाया ॥ येईधांवोनियाकेशीराजा ॥ ॥ १ ॥ भवभयेंफारभ्यालोंजन्मांतरा ॥ चौऱ्याशीचाफेरा बुडवितो ॥ २ ॥ सत्कथाश्रवणनामसंकीर्तन ॥ नघडेभजनमजदेवा ॥ ३ ॥ नवविधाभक्तिकोणेंकेलीकैसी ॥ नामा ह्मणेऐसीदावीसदा ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥५४९॥

निरंजनवनींपाषाणपैंव्हावें ॥ परिनवजावेंमागत्याच्या ॥ १ ॥ राजाचेंलेंकरूंपांघरेवाकळ॥ तेंव्हांतेसकळलाजकोणा ॥ २ ॥ पोसवेनातरीदवडोनीदेईदेवा ॥ नामातुजकेशवाविनवीतसे ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥५५० ॥

---

# नामदेवास गुरूपदेश.

## अभंग

देवआणिनामाउभाभीमातीरीं ॥ प्रेमयेरयेरींवोवाळिती ॥ १ ॥ देवह्मणेनाम्याऐकएकगोष्टी ॥ संसाराचीतुटीजेणेंहोय ॥ २ ॥ श्रीगुरुवांचुनीमुक्तिनाहींनाहीं ॥ भवनदी डोहींनुतरती ॥ ३ ॥ शरणगुरूसीजाहलीयाप्रेमें ॥ संसाराचाश्रमउतरुनी ॥ ४ ॥ गुरुवांचुनीयाकैंचामुक्तीचातो ठाव ॥ संसारतोवावकैसाहोय ॥ ५ ॥ ह्मणोनियानाम्या त्वांगुरूसीजावेंशरण ॥ तेणेंभवबंधनतुटेलतुझें ॥६॥ ऐसेंऐकोनीयानामाथरारिला॥मूर्छागतपडलाभूमीवरी ॥७॥५५१

भूमिलोळेनामाकंठसद्गदीत ॥ डोळियास्त्रवतअश्रुजळ ॥ १ ॥ इतुकेंदेखोनीयाद्रवलापुरुषोत्तमु ॥ नाम्यासीसप्रेमु

उचलिलें ॥ २ ॥ नाम्यातुजकायवाटतसेदुःख ॥ संसाराचाशोकतुजझाला ॥ ३ ॥ नामाह्मणेदेवातुजऐसादाता ॥ मजभवव्यथाकवणेपरी ॥ ४ ॥ ॥ ॥ ५५२ ॥

अनाथाचानाथतुझीब्रीदावळी ॥ मजकांरेजाळीभवव्यथा ॥ १ ॥ देवह्मणेनाम्यागुरुवांचुनीया ॥ मुक्तिपावावया आननाहीं ॥ २ ॥ आननेणेंकांहींकरिसीवित्पात्ति ॥ नव्हे माझीप्राप्तिगुरूविण ॥ ३ ॥ जाईनाम्याजाईगुरूसीशरण ॥ तुटेभवबंधनतुझेंवेगीं ॥ ४ ॥ नामाह्मणेदेवाकवणाशरण जाऊं ॥ कोणाचामीहोऊंशरणांगत ॥ ५ ॥ ॥ ५५३ ॥

देवह्मणेनाम्याविसोबाखेचरासी ॥ शरणतयासीजायवेगीं ॥ १ ॥ इतुकेंऐकोनीयानमियेलेंदेवा ॥ चालियेलातेव्हांविसोबापाशीं ॥ २ ॥ चिंताग्रस्तनामाआलाआवंढ्यासी ॥ पुढेंदेउळासीदेखियेलें ॥३॥ नामातयेकाळींगेलादेउळासी ॥ देउळींकौतुकासीपहातसे ॥ ४ ॥ ॥ ॥ ५५४ ॥

देवावरीपायठेउनीखेचर ॥ निजलापरिकरनिवांतची ॥ ॥१॥ देखोनियानामापावलाविस्मय ॥ कैसाहाप्राणीयादेव नेणे ॥ २ ॥ उठीउठीप्राण्याअंधळातूंकाय ॥ देवावरीपायठेवियेले ॥ ३ ॥ विसोबाखेचरबोलेनामदेवा ॥ उठविलें जीवाकांरेमाझ्या ॥ ४ ॥ देवाविणठावरिताकोठेंआहे ॥ विचारुनीपाहेनामदेवा ॥ ५ ॥ जेथेंदेवनसेतेथेंठेवीपाय ॥ पाहेपाअन्वयाविचारुनी ॥ ६ ॥ नामाह्मणेअवघाजिकडेतिकडेदेव ॥ कोठेंरिताठावनदेखेची ॥ ७ ॥ ॥ ५५५ ॥

इतुकेंदेखोनीचरणींघालीमिठी ॥ सांठविलासृष्टींअवघा देव ॥ १ ॥ तिहींत्रिभुवनींआपणव्यापुनी ॥ आनंदकोठो-

नीराहिलाये ॥ २ ॥ श्रीगुरूचेपायजीवेंनाविसंबतां ॥ मनोवृत्तीसाहितांबोळंगिलें ॥ ३ ॥ डोळियाचाडोळाउघडिला जेणें ॥ आनंदाचेंलेणेंलेववीलें ॥ ४ ॥ जन्ममरणाचेंतोडिलें सांकडें ॥ कैवल्यचिपुढेंदाखविलें ॥५॥ कैवल्याचागाभाविटेवरीउभा ॥ नामाह्मणेशोभादिव्यदिसे ॥ ६ ॥ ५५६ ॥

हत्तीचेचरणावरीबैसेमाशी ॥ नमनतयासीकरावया ॥ ॥ १ ॥ तैसेंकायमीतेंकेव्हडेंबापुडें ॥ लागेकोणीकडेकेशीराजा ॥ २ ॥ नामाह्मणेतैसेंमीयेकदुबळें ॥ चरणावेगळेंकरूंनका ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५५७ ॥

मायमेलीपोरटेंलहान ॥ कवाडधरूनउभेंठेलें ॥ १ ॥ नेणतेंबापुडेंदारवंटाधरी ॥ शेखींआसकरीभीतरील ॥ २ ॥ राउळींह्मणतीकैंचेंहेंभणग ॥ जंवतंवअंगचुकावीत ॥ ३ ॥ जातिनाहींत्यासीकायसीपंगती ॥ नेणोनीयेकांतींबैसविलें ॥ ४ ॥ सातादारवंटावाहेरटाकीपूजा ॥ तेथेंबरव्यावोजा सांगितलें ॥ ५ ॥ देवह्मणेनाम्यापोषीनमीतुतें ॥ मुठीमुठीशितेंदेऊनियां ॥ ६ ॥ ॥ ॥ ५५८ ॥

जींहींशरणागतींसांडिलीवासना ॥ तेत्वांनारायाणाआपंगिले ॥ १ ॥ ह्मणोनिउतराईव्हावयाआमुतें ॥ वोरसलें चित्तेंचाळविसी ॥२॥ आज्ञानलेंकरूंत्वांठकविलेंधुरु ॥ तैसामीअधीरुनव्हेंजाणा ॥ ३ ॥ लंकापतीत्वांकेलाबिभीषण ॥ जालासीउत्तीर्णवाचाऋणें ॥४॥ नामाह्मणेमीतैसानव्हें अज्ञान ॥ मागसर्वदेईंनतुझेहातीं ॥ ५ ॥ ॥ ५५९ ॥

चौऱ्याशीलक्षजन्महिंडतां ॥ घोंगडेंअनंताजर्जरजालें ॥ १ ॥ जेथेंजायतेथेंतुटीचपडे ॥ मुद्दलनघडेकायकरूं॥२॥

संचितआटलेंवेवसायखुंटलें ॥ ह्मणोनिठाकिलेंद्वारतुझें॥३॥
नामाह्मणेविठुजरीहोसीजाणता ॥ तरीयाबाळाउचिताप्रेम
द्यावें ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५६० ॥

मजचालतांआयुष्यपंथें ॥ तारुण्यपणपातलेंतेथें ॥ मद
मत्सरादिश्वापदेंबहुतें ॥ आलींकळकळितेंमजपाशीं ॥ १ ॥
तींधांवतीपाठोपाठीं ॥ पाहेतंवविषयाचेघाटीं ॥ कामक्रोध
व्याघ्राचीदाटी ॥ देखोनीयापोटींरिघालेंभय ॥ २ ॥ मग
स्वधर्ममार्गीरिगालों ॥ तंवअहंकारतस्करेंआकळिलों ॥ रा-
हेराहेह्मणोनिउभाकेलों ॥ तेणेंसितरलोंस्वामिया ॥ ३ ॥
जंवक्षणयेकउघडीडोळे ॥ पाहेतंवकंठदाटलाव्याळें ॥ मा-
यामोहसर्पेंडंखिलें ॥ त्याचियागरळेंझळंबिलों ॥ ४ ॥ जंव
नपवेशेवटीललहरी ॥ तंवधांवधांवउपावकरी ॥ विष्णुदास
नामाधांवापोकारी ॥ माझाकैवारीकेशीराज ॥ ५ ॥ ५६१॥

काखेपानअंगणींउभेंउगें ॥ भोजनमागेंरामनाम ॥ १ ॥
आणीकनाहींमजचाड ॥ रामनामगोडजेऊंघाला ॥ २ ॥
आनरससेवितांमंदपडिलों॥ तुझेंनिनामेंरुचीसीआलों ॥३॥
इच्छाभोजनतूंयेकदाता ॥नामाविनवीपंढरीनाथा ॥४॥५६२

कोहाळिबाकायकोहाळिजडे ॥ तैसेंमीतुझेंवेडेंलडीवाळ ॥
१ ॥ अंधळेंमुकेंकानींनाइके ॥ त्याचीकायजननीपोसूंनश-
के ॥ २ ॥ नामाह्मणेकेशवकृपेचासागरु ॥ जयाचाजोजार
तयासीचभारु ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ५६३ ॥

चोरवेढोनियानेइजेतेसुळीं ॥ चालतांपाउलींमृत्युजैसा
॥ १ ॥ तैसीमजपरीझालीनारायणा ॥ दिवसेंदिवसउणा
होतअसे ॥ २ ॥ वृक्षाचीयामुळींघातलीकुऱ्हाडी ॥ वेंचत-

सेघडीआयुष्याची ॥ ३ ॥ नामाह्मणेहेंहीलहरीचेंजळ ॥ आटतसकळभानुतेजें ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥५६४॥

संसारव्याघ्रदेखोनीयाडोळा ॥ झालेंसेव्याकुळचित्तमाझें ॥ १ ॥ पावेगाविठोबापावेगाविठोबा ॥ पावेगाविठोबा मायबापा ॥ २ ॥ तूंभक्तकैवारीकृपाळुबाहरी ॥ येईगाझडकरीदेवराया ॥ ३ ॥ नामाह्मणेनेणेंतुजवांचूनआन ॥ जनकजननीजाणकेशीराजा ॥ ४ ॥ ॥ ॥ ५६५ ॥

त्वांचाळविलेंअनंतसेवकां ॥ तोचीचाळामजदाविसीनिका ॥ १ ॥ भलारेभलाझालासीशहाणा ॥ भेषपळविलेशास्त्रपुराणा ॥ २ ॥ आदिअंतींतुझ्याजाणितल्याखुणा ॥ आतांकायकरिसीपंढरीच्याराण्या ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवामजमारुनीदवडी ॥ पुढतीनधरावीसोयमाझी ॥ ४ ॥५६६॥

तुजविकूनघातलीवोर ॥ मजसमोरबोलतोसी ॥ १ ॥ उच्छिष्टसिदोरीवेउनीकरीं ॥ भक्ताचाभिकारीतूंयेक ॥ २ ॥ चोरआणिसिंदळुचाळविलेगोवळे ॥ अनंतमर्दिलेदुष्टखळ ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवासांगेनवर्म ॥ ऐकतांनराहेसंताचें कर्म ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५६७ ॥

यारेनाचंप्रेमानंदें ॥ विठ्ठलनामाचेनीछंदें ॥ १ ॥ जाऊं ह्मणतांपंढरी ॥ यमत्याचीसेवाकरी ॥ २ ॥ धरितांपंढरीचीवाट ॥ कळिकाळाभयवाटे ॥३॥ चंद्रभागेकरितांस्नान ॥ यमलोकींपडलीहान ॥ ४ ॥ झालीपुंडलिकाचीभेटी ॥ पूर्वजांआनंदवैकुंठीं ॥ ५ ॥ राउळासीजातां ॥ झालीजीवाचीमुक्तता ॥ ६ ॥ विष्णुदासनामाह्मणे ॥ आतांनाहींयेणें जाणें ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५६८ ॥

# पंढरीमाहात्म्याचे अभंग.

सर्वसुखआहेभीवरेच्यातीरीं ॥ आमुचीपंढरीकामधेनु ॥ १ ॥ प्रेमामृतदुभेसदासंतजना ॥ वोसंडतपान्हानित्य नवा ॥ २ ॥ धर्मअर्थकाममोक्षचारीस्थानें ॥ दोहणारजाण पुंडलीक ॥ ३ ॥ भक्तीचेंमेळवणभावाचेनीबळें ॥ देखोनीया वोळेअधिकाधिक ॥ ४ ॥ जियेचेंदुभतेंनित्यनवेंवाढे ॥ पंढरीसीवोढेपूर्वपुण्यें ॥ ५ ॥ भाग्यवंतनामातेंक्षीरलाधला ॥ प्रेमेंवोसंडलागर्जेनामें ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ५६९ ॥

अगाधभवजळतारावयादुस्तर ॥ रचिलेंपंढरपुरभीमातीरीं ॥ १ ॥ तारुपंढरीनाथमोलेंविणउतरी ॥ उभाअसेतीरींवाटपाहे ॥ २ ॥ बुडण्याचेंभयनाहींपैंसंसारीं ॥ कलीमाझीथोरीपंढरीनाथ ॥ ३ ॥ जयानावेवरीआठराही आवलें ॥ साहीखणभलेमिरवती ॥ ४ ॥ चहूंमुखींजिचा नकळेचिपार ॥ पाहतांअगोचरसहस्त्रमुखा ॥ ५ ॥ सज्या लावीकासेकुटुंबीनावेवरी ॥ उतरिलेतीरींकेशवराजें ॥ ६ ॥ प्रेमाचींपेटींबांधोनीयांपोटीं ॥ उतरीजगजेठीपांडुरंग ॥७॥ अंगेंघालीउडीबुडतीयाकाढी ॥ ऐसेंकल्पकोडीतारियले ॥ ॥८॥ तारियलेसत्यहाचिपैंनिर्धार ॥ भक्तपैलपारउतरिले ॥ ९ ॥ उतरिलेपारकायत्याकठिण ॥ वारीजन्ममरणसर्वत्यांचें ॥ १० ॥ सर्वत्याचेंकाजकरीपंढरीराव ॥ पाहोनियांभावशुद्धत्यांचा ॥ ११ ॥ शुद्धभावेंविणइतरउ-

पाव ॥ होतीजाणावावफलनाहीं ॥ १२ ॥ नामाह्मणेतुह्मां सांगतोंमीआतां ॥ स्मरापंढरीनाथाशुद्धभावें॥१३ ॥५७०॥

ऐकापंढरीचेंमहिमान ॥ राउळतितुकेंप्रमाण ॥ तेथील तृणआणिपाषाण ॥ तेहीदेवजाणावे ॥ १ ॥ ऐसीपंढरीमनीं जेध्याती ॥ त्यांसीतिहीलोकींगति ॥ तेनरआणिकातीर्था जाती ॥ तीर्थेंवंदितीतयांसी ॥ २ ॥ वाराणसीचालिजेमा- सा ॥ गोदावरीयेकादिवसा ॥ पंढरीपाउलपरियेसा ॥ ऐसाठसानामाचा ॥ ३ ॥ शंकरसांगेऋषीजवळीं ॥ सक- ळतीर्थेंमाध्यान्हकाळीं ॥ येउनीपुंडलीकाजवळीं ॥ करि- तीअंघोळीवंदितीचरण ॥ ४ ॥ ऐशातीर्थींपापघडे ॥ ऐसें बोलतांजिव्हाझडे ॥ नामाविनवीसंतापुढें ॥ पंढरीपेठन संडावी ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥५७१॥

सांडोनीपंढरीजासीआणिकातीर्था॥लाजतुझेचित्ताकैसी नये ॥ १ ॥ त्रिभुवनींचींतीर्थेंझालींपैंमळीन ॥ व्हावयापा- वनआलींयेथें ॥ २ ॥ येवढाब्रह्मानंदकैंचाआणिकेठाईं ॥ जोकाआहेपाईंविठोबाच्या ॥ ३ ॥ नित्यतादिवाळीसुखा- चासोहळा ॥ भोगिजेअवलीळासंतसंगें ॥ ४ ॥ धर्मअर्थ काममोक्षमुक्तीचाऱ्ही ॥ देतोह्माश्रीहरिनामयेका ॥ ५ ॥ नामाह्मणेनिकीसांपडलीसोय ॥ नविसंबेंमीपायखेच- राचे ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५७२ ॥

पंढरीसीजावेंजीवन्मुक्तव्हावें ॥ जीवलगाभेटावेंविठो- बासी ॥ १ ॥ कायावाचामनचरणींठेवावें ॥ प्रेमसुखमा- गावेंपंढरीनाथा ॥ २ ॥ सुखाचेंसाजिरेंश्रीमुखपहावें ॥ जी-

वेंउतरावेंनिंवलोण ॥ ३ ॥ नामाह्मणेआह्मादीनांचेंमाहे-
र ॥ गातांमनोहरगोडवाटे ॥ ४ ॥ ॥ ५७३ ॥

पंढरीचेंसुखपहातांयेकघडीं ॥ वासकल्पकोडीवैकुंठींचा॥
१ ॥ आणितांअनुमाननपावेसमसरी ॥ महिमानवर्णवेथो-
रीसहस्त्रमुखा ॥ २ ॥ जेंसुखसुरवरास्वप्नींनाहींदृष्टीं ॥ तेंहें
वाळुवंटींतुह्मांआह्मां ॥३॥ धन्यत्यानरनारीगर्जतातीनामें॥
ऐकोनीडोलेप्रेमेंशूळपाणी ॥ ४ ॥ धन्यवेणुनादधन्यवृं-
दावन ॥ धन्यतेजीवजनक्षेत्रवासी ॥ ५ ॥ धन्यआसपा-
सींधन्यपंचक्रोशी ॥ दुमदुमितअहर्निशींनामघोष ॥ ६ ॥
धन्यपशुपक्षीकिटकपतंगभृंग ॥ जयाअंगसंगपांडुरंगीं ॥
७ ॥ धन्यतेतरुवरअवघेसानथोर ॥ अवतरलेअमरगुप्त
रूपें ॥ ८ ॥ धन्यतेसंसारीअवघेजीवन्मुक्त ॥ सदाज्यांचें
आर्तपांडुरंगीं ॥ ९ ॥ धन्यत्याचावंशज्यानामींविश्वास॥
धन्यविष्णुदासनामाह्मणे ॥ १० ॥ ॥ ॥ ५७४ ॥

ऐसेंतीर्थकोणीदाखवासुलभ ॥ जेथेंसमारंभहरिकथेचा॥
१ ॥ तीयेकपंढरीविख्यातत्रिभुवनीं ॥ सकळांसिरोमणी
चंद्रभागा॥२॥ऐसेंतीर्थकोणीदाखवासुखरूप ॥ जेथेंत्रिविध-
तापहारपती ॥ ३ ॥ ऐसेंतीर्थकोणीदाखवानिर्मळ॥जेथेंना-
सेमळदुष्टबुद्धि ॥ ४ ॥ ऐसेंतीर्थकोणीदाखवासुंदर ॥ गरु-
डटकेभारविराजती ॥ ५ ॥ नामाह्मणेसंतजनाचेंमाहेर ॥
गातांमनोहरगोडवाटे ॥ ६ ॥ ॥ ॥ ५७५ ॥

रखुमाईमाताराहीवोवाळिती ॥ नित्यपंचारतीहरीच्या
दासा ॥ १ ॥ नित्यभक्तहरियाळागींविनट ॥ पंढरीचीपेठ
वसविली ॥ २ ॥ धन्यहानिवृत्तिधन्यहासोपान ॥ धन्यहा

निधानज्ञानदवे ॥ ३ ॥ खेचरसावताधन्यजनामित्र ॥ यासीसकळदेतहरिब्रह्मा ॥ ४ ॥ पांडुरंगपिसायालागींझाला ॥ मुक्ताईपाजिलाप्रेमपान्हा ॥ ५ ॥ नामाह्मणेखुणजाणतीसज्ञान ॥ अखंडतेंध्याननिवृत्तिदेवीं ॥ ६ ॥ ५७६ ॥

कृतत्रेतद्वापरकली ॥ ऐसाचहुयुगांचामेळ ॥ तेंमहायुगअढळ ॥ वेदांतशास्त्रीं ॥१॥ ऐसाब्रह्मीयाचादिनांतर ॥ तैसीचरात्रयेकसहस्त्र ॥ तीसादिसांचाप्रखर ॥ येकमास ॥२॥ ऐसेबारामास ॥ त्यांचेंयेकवर्षं॥ शतभरीआयुष्य॥ब्रह्मीयाचें ॥ ३ ॥ ऐशाब्रह्मीयाच्यादिनांत ॥ सहस्त्रयुगेंगणित ॥ ज्याप्रळईंपोहत ॥ मार्कंडेयउदकीं ॥ ४ ॥ ऐशींआठ्ठाविस युगेंजाण ॥ पंढरपुरास्झालींपूर्ण ॥ जोकींब्रह्मीयाचादिन ॥ प्रळयेंकेला ॥५ ॥ नामाह्मणेपंढरीचीसंख्या ॥ सांगितली संतमहंतलोकां॥लक्षुनीपादुका॥श्रीविठोबाच्या ॥६॥५७७

तंवश्रोतेह्मणतीविष्णुदासा ॥ याब्रह्मादिनाचेप्रळईंकैसा ॥ पंढरीच्याभासा ॥ नाशकींनाहीं ॥ १ ॥ तंवनामा ह्मणेसुदर्शनावरी ॥ देवेंरचिलीपंढरी ॥ भक्तासहितराज्य करी ॥ रुक्मिणीवर ॥ २ ॥ तोपरमात्मागुणातीत ॥ अपरोक्षभक्तासहित ॥ जेथेंप्रळयहातजोडीत ॥ तयालागीं ॥ ॥ ३ ॥ जैंब्रह्मीयाचेंआयुष्यसरे ॥ तैंलयाजायचराचर ॥ तैंपंढरपुर ॥ मिळेवस्तुमाजीं ॥ ४ ॥ नामाह्मणेयाखुणा ॥ येकजाणेपंढरीराणा ॥ कळतीसंतसज्जना ॥ इतरमाईक जनांनेणवती ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ५७८ ॥

आधींरचिलीपंढरी ॥ मगवैकुंठनगरी ॥ १ ॥ जैंनव्हतें चराचर ॥ तैंहोतेंपंढरपुर ॥२॥ नाशिलीयाब्रह्मांडगोळ ॥

उरेपंढरीमंडळ ॥ ३ ॥ आहेसुदर्शनावरी ॥ ह्मणोनिअवि-
नाशपंढरी ॥ ४ ॥ नामाह्मणेगाश्रीहरि ॥ आह्मींदेखि-
लीपंढरी ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५७९ ॥

ज्यासीविन्मुखसंसार ॥ तोकरीमोक्षाचाविचार ॥ १ ॥
आह्मीपंढरीचेलाटे ॥ नवजोंवैकुंठींचेवाटे ॥ २ ॥ सांडो-
नीपंढरीचीवारी ॥ मोक्षमागेतोभिकारी ॥ ३ ॥ ताटवोग-
रिलेंनिकें ॥ सांडोनीकोणजायभिके ॥ ४ ॥ जन्मोजन्मीं-
चाआळसी ॥ तोचिमोक्षाचाअभिलाषी ॥ ५ ॥ जोनेणे
नामगोडी ॥ तोमुक्तीतेंचरफडी ॥ ६ ॥ नामाह्मणेविष्णुदास ॥
ह्मणीभ्यालागर्भवास ॥ ७ ॥ ॥ ॥ ५८० ॥

काशीनपवेसरी ॥ दुजीवैकुंठपंढरी ॥ १ ॥ येकपंढरी
वैकुंठ ॥ थेरवाउगाबोभाट ॥ २ ॥ साहीचारीअनुवादती
त्यासीअठरासाक्षदेती ॥ ३ ॥ बोलेनाराविष्णुदास ॥ सं-
तगर्जतीनामघोष ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥५८१॥

पुंडलिकेंरचिलीपेठ ॥ संतग्राहीकचोखट ॥ १ ॥ प्रेम
साखरावाटिती ॥ नेघेत्याचेतोंडींमाती ॥ २ ॥ समतेचे
फणसगरे ॥ आंबेपिकलेपाडिभरें ॥ ३ ॥ नामद्राक्षाचेतेघड
॥ अपाररसाआलेगोड ॥ ४ ॥ नामाह्मणेधराभावो ॥ अ-
भक्ताचेंमढेंजावो ॥ ५ ॥ ॥ ॥ ५८२ ॥

पुंडलिकालागींह्मणेपांडुरंग ॥ सखाजीवलगतूंचिमाझा
॥ १ ॥ नपाहसीवासबोलसीउदास ॥ सांडुनीयाआसस-
र्वस्वाची ॥ २ ॥ वैकुंठसांडोनीआलोंतुजपाशीं ॥ कावान
बोलसीभक्तराजा ॥ ३ ॥ पितृभजनाचाझालासीअधिकारी
॥ केलीबापायरीवैकुंठासी ॥ ४ ॥ मागबापाकांहींआवडेतें

घेई ॥ मजवाटेहृदईंघालावासी ॥ ५ ॥ नामाह्मणेदेवा स्वामीमुगुटमणी ॥ उभाकरठेउनीकटावरी ॥६॥ ॥५८३॥

ह्मणेपुंडलीकदेवामुगुटमणी ॥ परिसावीविनवणीएक- माझी ॥ १ ॥ संसारबंधनतोडावेंदरुशनें ॥ हेंचिएकमागणेंतुजप्रति ॥ २ ॥ पंचमहापातकीविश्वासघातकी ॥ ज्यांसीयमादिकींगांजियेलें ॥ ३ ॥ ऐसीयापातितांत्वांकरावेंसनाथ ॥ पुरवीमाझेंआर्तपांडुरंगा ॥ ४ ॥ हेंचिमाझेंकाज अंतरींचेंगुज ॥ उद्धरीसहजमहादोषी ॥ ५ ॥ नामाह्मणेवरादिल्हानारायणें ॥ विठ्ठलदरुशनेंमोक्षहोय ॥६॥५८४॥

जाईनह्मणतांपंढरी ॥ यमथोरचिंताकरी ॥ १ ॥ धरितांपंढरीचीवाट ॥ पापेंपळालींकपाट ॥ २ ॥ कळसदेखिलानयनीं ॥ झालीपातकांचीधुणी ॥ ३ ॥ चंद्रभागेकरितां स्नान ॥ सर्वदोषांपडेखाण ॥ ४ ॥ पुंडलीकाझालीभेटी ॥ पूर्वजउद्धरिलेवैकुंठीं ॥ ५ ॥ नामाह्मणेजीकेशवा ॥ आह्मीकरूंतुझीसेवा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥५८५॥

महामुक्तिक्षेत्रतीर्थांचेंतारक ॥ उपमेसीआणीकनाहीं दुजें ॥ १ ॥ तेंहेंपंढरपुरप्रेमाचेंमाहेर ॥ नामनिरंतरगर्जतसे ॥ २ ॥ येवढेंतीर्थअसतांजवळीउदार ॥ वायाचिंतातुरव्हालझणीं ॥ ३ ॥ जीवन्मुक्तज्ञानीपुंडलीकमुनी ॥ बैसलासेंध्यानींपरलक्षीं ॥ ४ ॥ योग्याचेंहृदईंचेंनिजध्यान नेटकें ॥ तेंज्याचेनीसुखेंवेडावलें ॥ ५ ॥ पुण्यपावनभीमा दक्षिणवाहिनी ॥ अमृतसंजीवनीसुखरासी ॥ ६ ॥ आनंदरसकुपिकातेहेचंद्रभागा ॥ दर्शनेंनयावेंगागर्भवासा ॥७॥ स्वर्गींमंदाकिनीलाजोनिराहिली ॥ पाताळींप्रवेशलीभोगा-

वती ॥ ८ ॥ सहस्त्रभागभेणेंझालीभागीरथी ॥ सागरींमि-
ळतीझालींवेगीं ॥ ९ ॥ ऐसेंभक्तजननांदतीभाग्याचे ॥ जे-
थेंवैराग्याचेमुगुटमणी ॥ १० ॥ तेथेंविष्णुदासनामासंता-
चेसंगतीं ॥ गीतींगायकीर्तिविठोबाची ॥११॥ ॥ ५८६ ॥

येकवेळाभेटीआलोंभक्तराया॥ स्फुरतीमाझ्यावाह्याप्रेमा-
लागीं ॥ १ ॥ ऊठपुंडलीकापरतोनिपाहे ॥ जीवींचेंआर्त
कायसांगेमज ॥ २ ॥ जीवींचीशिराणीफेडीडोळियाची ॥
वासश्रीमुखाचीपाहूंदेई ॥ ३ ॥ हेंचिआर्तधरुनीआलोंअ-
सेजीवीं ॥ तेंतूंबापुरवीभक्तराया ॥ ४ ॥ नामयाचास्वामी
कृपेचाकोंवळा ॥ ह्मणोनीउतावळाभक्तालागीं ॥ ५ ॥५८७

पितियाचीभक्तिपुंडलीकेंकेली ॥ मातहेऐकिलीदेवरा-
येँ ॥ १ ॥ नवलक्षगोधनेंपांचशेंसंवगडे ॥ रामकृष्णपुढें
चालताती ॥ २ ॥ उठाचलाजाऊंपुंडलिकापाहूं ॥ देवह्म-
णेभावोपाहूंत्याचा ॥ ३ ॥ गोकुळीहुनीनामापंढरीसीआ-
ला ॥ त्वरितपावलावेणुनादीं ॥ ४ ॥ तेथोनिपरतलावा-
ळुवंटींआला ॥ तंवदेवदेखिलापुंडलीकें॥ ५ ॥ देवउभाआ-
हेपुंडलीकापाहे ॥ चतुर्भुजस्वयेंदेखियेला ॥ ६ ॥ देखिये-
लाहरिशंखचक्रकरीं ॥ आयुधेंतींचारीझळकती ॥ ७ ॥ च-
तुर्भुजमूर्तिदेखियेलीदृष्टीं ॥ पुंडलीकेंविटटाकियेली ॥ ८ ॥
विटेवरीउभाविठ्ठलराहिला ॥ ठसामिरवलात्रिभुवनीं॥ ९ ॥
पुंडलिकभावदेवपाहूंआला ॥ प्रसन्नपैंझालापुंडलीका ॥
॥१०॥वैकुंठकैलासआणीलहायेथें ॥ नामाह्मणेहितझालेंआ-
ह्मा ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५८८॥

कर्मजडमूढपतितपामर ॥ भवसिंधुपारनठाकेजया ॥१॥

यालागींकेलीपंढरीमूळपेठ ॥ भक्तिभूवैकुंठवसविलें ॥२॥ हें-
चिपुंडलीकेंमागितलेंनिकें ॥ जेंसर्वथापरलोकेंचाडनाहीं ॥
३ ॥ भुक्तिमुक्तिसिद्धीजेजयाआवडे ॥ तयातेपोवाडेविठ्ठल-
नामें ॥ ४ ॥ नलगतीसायासकरणेंकायाक्लेश ॥ नामाचा
विश्वासदृढधरा ॥ ५ ॥ नामाह्मणेअवघेचलापंढरीये ॥
भेटूंबापमायपांडुरंगा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ५८९ ॥

दोनीहातठेउनीकडवा ॥ उभाभीवरेचेथडवा ॥ १ ॥
हरिबरवयाबरवया ॥ विठोबापंढरीच्याराया ॥ २ ॥ भक्त-
वाटपहात ॥ प्रेमेंकरूनिवहात ॥३॥ नामाह्मणेवेगींधांवा॥
दैवआलेंयाचियागांवा ॥ ४ ॥ ॥ ॥ ५९० ॥

ऐसेंतीर्थकोणीदाखवागोमटें ॥ प्रत्यक्षहेंभेटेपरब्रह्म॥१॥
कोठेंऐसेंक्षेत्रआहेत्रिभुवनीं॥सकळांशिरोमणीचंद्रभागा॥२॥
ऐसेंतीर्थकोणदाखवापैंयेक ॥ देखतांचिसुखपावेमन ॥ ३ ॥
ऐसेंतीर्थकोण्हीदाखवासुंदर ॥ गरुडटकेभारअपारहे ॥ ४॥
ऐसेंतीर्थकोणदाखवासुलभ ॥ जेथेंसमारंभहरिकथेचा ॥
॥ ५ ॥ ऐसेंतीर्थकोणीदाखवासाजिरें ॥ दयाप्रेमपूरवोसंड-
त ॥ ६ ॥ ऐसेंतीर्थकोण्हीदाखवानिर्मळ ॥ ब्रह्मरसके-
वळसकळजीवां॥ ७ ॥ नामाह्मणेआह्मादीनांचेंमाहेर ॥
धन्यपंढरपुरगीतींगातां ॥ ८ ॥ ॥ ॥ ५९१ ॥

अरूपरूपासीआलें ॥ परब्रह्मसांवळें ॥ भक्तापुंडलि-
काफावलें ॥ गोप्यझालेंप्रगट ॥ १ ॥ धन्यधन्यभीवरातट
॥ चंद्रभागावाहेनिकट ॥ धन्यधन्यवाळुवंट ॥ मुक्तिपेठपं-
ढरी ॥ २ ॥ धन्यधन्यपद्माळें ॥ सबराभरितस्वानंदजळें ॥
स्नानकेलियानिर्मळें ॥ कोटिकुळेंउद्धरिलीं ॥ ३ ॥ धन्यध-

न्यताहोदेशु ॥ तेथेंविठ्ठलेंकेलारहीवासु॥ नामाविनवीविष्णुदासु ॥ देईसौरसुभक्तीचा ॥ ४ ॥ ॥ ॥५९२॥

येकयेकादशीजरीहोयपंढरीसी ॥ सुकृताच्याराशीब्रह्मानेणे ॥ १ ॥ चंद्रभागातीरींचतुर्भुजनरनारी ॥ विठ्ठलकैवारीउभाअसे ॥ २ ॥ परतोनियेथेंनयेसीमागुता ॥ आणिकासर्वथाऐसेंनाहीं ॥ ३ ॥ क्षीरसागरींचेंजिव्हारकींवैकुंठींचेंसार ॥ पुंडलिकेंउपकारकेलालोकां ॥ ४ ॥ नामाह्मणे मजथोरलाभझाला ॥ तापत्रयगेलापांडुरंगा ॥५॥ ॥५९३॥

बरवेंबरवेंवाळुवंट ॥ कायइच्छिसीवैकुंठ ॥ १ ॥ ऐसेंसुखकोठेंआहे ॥ मुक्तिमागूनकरसीलकाय ॥ २ ॥ दिंडीयापताकांचेभार ॥ टाळघोळांचागजर ॥ ३ ॥ संतमहंतांचीदाटणी ॥ अगाधमहिमाकीर्तनीं ॥ ४ ॥ महाद्वाराचेरंगणीं ॥ नामाजातोलोटांगणीं ॥ ५ ॥ ॥५९४॥

झळझळितसोनसळा ॥ कळसदिसतोतेजाळा ॥ १ ॥ बरवेंबरवेंपंढरपुर ॥ विठोबारायाचेंनगर ॥ २ ॥ माहेरसंताचें ॥ नामयास्वामीकेशवाचें ॥ ३ ॥ ॥ ५९५ ॥

सांडुनीवैकंठनधरतपातलों ॥ तुजभेटावयाआलोंपुंडलिका ॥ १ ॥ प्रीतीचाबोरसुहृदईंदाठला ॥ नुठींकांवहिला आलिंगना ॥ २ ॥ भक्ताशिरोमणआमुचाजीवलग ॥ ह्मणे पांडुरंगपुंडलिका ॥ ३ ॥ स्फुरतीभुजादंडआणिवक्षस्थळ॥ हर्षेंनयनकमळविकासलें ॥ ४ ॥ आनंदरोमांचउद्भवलेंअंगीं ॥ क्षेमदेईवेगींभक्तराया ॥ ५ ॥ मजनामरूपतुमचेनी संभ्रमें ॥ केलींजन्मकर्मेंअसंख्यात ॥ ६ ॥ तुमचेआवडीं असेंमीअंकिला ॥ सांगकोण्याबोलारुसलासी ॥ ७ ॥ हृ-

दईचेंनिजगुजसांगरेसकाळिक ॥ तेणेंसमाधानऐक्यहोईल जीवा ॥ ८ ॥ परतोनिद्दष्टिपाहेअळुमाळ ॥ हरेलशीणसकळमाझेभेटीं ॥ ९ ॥ ऐसाभक्तजनवत्सलभक्तांचाविसावा ॥भक्ताचीयाभावाभाळलासे ॥१०॥ कटावरीदोन्हीहातउभा पुंडलीकाद्वारीं॥नामयास्वामीश्रीहरिविनवीतसे॥११॥५९६

हावोहावोदेवह्मणतातिश्रुति॥परित्यानेणतीभुललिया ॥ ॥ १ ॥ तुझियारूपानेणतीकमळापती ॥ तुजबाळह्मणती गौळियाचें ॥ २ ॥ विष्णुदासनामियानेंदाखविल्याखुणा ॥ पंढरीचाराणाश्रीविठ्ठल॥ ३ ॥ ॥ ॥ ॥५९७॥

बाहेरीभितरींपाहतांदिसेयेकु ॥ उभाअसेव्यापकुपंढरिरावो ॥ १ ॥ पंढरीचाराणाविटेवरीजाणा ॥ जीवींचीया खुणाभक्तासांगे ॥ २ ॥ गुंतलोंसंसारींभरलोंकर्मभांडारीं ॥ विषयामाझारींमोहियेलों ॥ ३ ॥ नामाह्मणेकेशवामाझेंउणेंनपाहीं ॥ चरणसेवादेईजन्मोजन्मीं ॥ ४ ॥ ॥ ५९८ ॥

आलासीआरतेंधरिलासीचित्तें ॥ आतांतुजमागुतेंजाऊंनेदीं ॥ १ ॥ शरीरप्राणाचादेईनमीबळी ॥ तुजहृदयकमळींसांठवीन ॥ २ ॥ धरिलासीतूंयेकवैकुंठनायक ॥ ह्मणे पुंडलीकपांडुरंगा ॥ ३ ॥ इयेलोकींचेंसुखनमगेसकाळिकां ॥ आणीकपरलोकाचाडनाहीं ॥ ४ ॥ पंढरीराहीरुक्माईसमवेत ॥ तेणेंमनोरथपूर्णहोती ॥ ५ ॥ तुझेंरूपदृष्टींनामश्रवणपुटीं ॥ मनाचरणींमिठीपडोनीगेली ॥ ६ ॥ तुझेचरणींआर्तहृदईनामामृत ॥ तेणेंमीसमर्थमिरवेजगीं ॥ ७ ॥ संतासोयरियायावयासभेटी ॥ ह्मणोनिवाळुवंटींवस्तीकेली ॥ ८ ॥ परब्रह्मपुतळादेखिलासांडोळा ॥ समाधिसु-

खसोहळापांडुरंगा ॥ ९ ॥ कटींठेउनीहातआपणपंढरिना-थ ॥ भक्ताचायेकांतश्रवणकरी ॥ १० ॥ उभारेह्मणोनि-दिधलेंआपणातें॥संबोखोनीनामयातेंप्रेमदिलें१ १। ॥६०७॥

भक्तपुंडलीकदेखोनीनयनीं ॥ आलासीवैकुंठाहुनीआजी देवा॥१॥नारदवचनऐकुनीयामनीं ॥ सुखेंचक्रपाणीसुखाव-ला ॥ २ ॥ सुखरूपसदादेवदूरीठेला ॥ मुनीश्वरत्यालास्वयें दावी ॥ ३ ॥ नामाह्मणेतुजभाक्तिपिसेंफार ॥ साधिलेंनगर क्षणमात्रें ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥५९९॥

कायसांगोंतुझीकरणीनारायणा ॥ वेदपारायणाकेशी-राजा ॥ १ ॥ पृथ्वीवरीतीर्थेंआहेतीअपार ॥ तरीपंढरीची सरयेकानाहीं ॥२॥ जन्मोजन्मींचीयापातकादरारा॥चुकती येरझारायेकेखेपें ॥ ३ ॥ ब्रह्मज्ञानेंविणमोक्षआहेभूतीं ॥ वाचेसीह्मणतीविठ्ठलनाम ॥ ४ ॥ बेताळिसांसहितजाती-लवैकुंठा ॥ नामाह्मणेभेटाविठ्ठलासी ५ ॥ ॥६००॥

ध्याननधारणानलगेटाळी ॥ विठुपहावाउघडाडोळीं ॥१॥ विठुसमाधीचेंसुख ॥ पहातांहारपेताहानभूक ॥ २ ॥ ना-माह्मणेनलगेकांहीं ॥ चित्तरंगलेंहरीचेपाईं ॥ ३ ॥ ६०१॥

उदाराचाराजाउभायाचीकाजा ॥ उभारुनीभुजावाट पाहे ॥ १ ॥ ह्मणेघ्यारेसुखप्रेमेंआलोलिक ॥ साधनआ-णीकनलगेकांहीं ॥ २ ॥ मनाचेनिमनेंमजह्रदईंधरा ॥ वा-चेसींउच्चारानाममाझें ॥ ३ ॥ जेणेंक्रमेंमजसाधिलेंपुंडलि-कें ॥ तेंचितुह्मांनिकेंसांगतसें ॥ ४ ॥ ह्मणोनिपांडुरंगउ-भाभीमातीरीं ॥ नामानिरंतरींबोळंगेचरणीं ॥५॥ ॥६०२॥

ब्रह्मांडनायकविश्वाचागोसावी ॥ तोकेलापांडवींह्मणि

यारा ॥ १ ॥ भावाचालंपटभक्तपराधीन ॥ साधीअभिमानअनाथाचा॥२॥ भाजीचीयापानेंतृप्तझालेहरि॥जयाचेउदरींचौदाभुवनें ॥३॥ जनकशृतिदेवंधरिलादोहींकरीं॥ दोघांचीयाघरींघेतोपूजा ॥ ४ ॥ पुंडलिकेंविटबैसावयानिट ॥ तेथेंभूवैकुंठवसतेंकेलें ॥ ५ ॥ नामाह्मणेशरणारिघतांयेक्या भावें ॥ कैवल्यभोगावेंनाममंत्रें ॥ ६ ॥ ॥ ॥६०३॥

अवघेंतीर्थतीर्थरूप ॥ परितेंविठ्ठलचरणींचेंस्वरूप ॥ विठ्ठलदेखिल्यानिष्पाप ॥ जीवजंतहोताति ॥ १ ॥ येंठ्हढेंक्षेत्रपांडुरंग ॥ सर्वतीर्थांमाजींअभंग ॥ धरलियासंतसंग ॥ महादोषहारताति ॥ २ ॥ हरिकीर्तनकरीवेगीं ॥ हेंचिउद्धारजगालागीं ॥ जेजेअनुसरलेपांडुरंगीं ॥ तेतेगेलेवैकुंठीं ॥ ३ ॥ नामाजपेसदाकाळीं ॥ रामकृष्णनामावळी ॥ विठ्ठल विठ्ठलहृदयकमळीं ॥ जपतसेसर्वदां ॥ ४ ॥ ॥ ६०४ ॥

अनिर्वाच्यब्रह्मनिगमह्मणती ॥ शिणलेवेदांतीआठरा साही ॥ १ ॥ तेंहेंपुंडलिकेंचोहटाउभेंकेलें ॥ भावेंभुलविलें पंढरिये ॥ २ ॥ घ्यारेघ्यारेतुह्मींकैवल्याचेंपिक ॥ देतोपुंडलीकसकळजीवां ॥ ३ ॥ जेंउपनिषधार्थाचेंमथितजेंसंसारीं यथार्थ ॥ तोहापंढरीनाथप्रगटजगीं ॥ ४ ॥ हरिहरविरंची त्रिमूर्तिहाची ॥ माउलीदीनाचीलोभापर ॥ ५ ॥ जोश्रवणाचेंश्रवणनयनाचेनयन ॥ ज्ञानाचादर्पणद्रष्टाहाय ॥६ ॥ आदिमध्यअंतींव्यापकसर्वांभूतीं ॥ तोआलासेव्यक्तिभक्तिभावें ॥ ७ ॥ सच्चिदानंदघनपरिपूर्ण ॥ कारणमहाकारण प्रभाहाची ॥ ८ ॥ चित्ताचेतविताबुद्धीतेंपाळिता ॥ मनादिकांचाळिताइंद्रियांसी ॥ ९ ॥ तोयाचराचराजीवलगसो-

यरा ॥ ह्मणोनिअनुसरापांडुरंगा ॥ १० ॥ नामाह्मणेकायावाचामनेंत्याचें ॥ नामजपाकैंचेंजन्ममरण॥११॥ ६०५ ॥

धन्यपंढरीचेसकळहीजन ॥ जींहींसख्यकेलेंजाणविठ्ठलपाईं ॥१॥ विठ्ठलचिध्यानींविठ्ठलचिमनीं॥विठ्ठलचिंतनींरात्रंदिवस ॥२॥विठ्ठलाविणजयानगमेयेकघडी ॥ सर्वस्वेंआवडी विठ्ठलाची॥ ३ ॥ विठ्ठलचिमाताविठ्ठलचिपिता॥भगिनीआणिभ्राताविठ्ठलजया ॥ ४ ॥ विठ्ठलचिक्रियाविठ्ठलचिकर्म ॥ विठ्ठलसकळधर्मकुळगोत॥५॥विठ्ठलचिमित्रविठ्ठलकुळगोत्र॥ विठ्ठलहासर्वत्रकेलाजींहीं ॥६॥ गुजगौप्यजीवींचेंविठ्ठलासांगावें ॥ विठ्ठलेंपुरवावेंकोडत्याचें ॥ ७ ॥ सर्वकाळकरणेंविठ्ठलाचीकथा ॥ विठ्ठलजडलाचित्ताजयाचिया ॥ ८ ॥ विठ्ठल जाग्रतीस्वप्नहेंशुषुप्ति ॥ अखंडवोसणतीविठ्ठलविठ्ठल ॥९॥ ऐसासर्वस्वेंशींविठ्ठलभजतां ॥ सुखेंआलींहातांविठ्ठलची ॥ ॥ १० ॥ नामाह्मणेत्याचेचरणरेणुहोऊन ॥ झालोंसेंपावन ह्मणेआतां ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ६०६ ॥

फेडोनीपीतांबरउभादिगंबर ॥ कटींठेउनीकरवाळुवंटीं ॥ १ ॥ मोतियाचेहारसांडोनिरत्नकिळा ॥ तुळसीच्यामाळागळाघाली ॥ २ ॥ पर्यंकींशयनशेषाचेंआसन ॥ सांडुनीनिजभुवनउभेंयेथें ॥ ३ ॥ सनकादिकाभक्तिसोडोनीयाप्रेमा ॥ कलयुगींनामाआवडला ॥ ४ ॥ ॥६०७॥

विठ्ठलविसावासकळिकां ॥ विठ्ठलआधारतिहीलोकां ॥ विठ्ठलनकळेब्रह्मादिकां ॥ विठ्ठलदेखापंढरीये ॥ १ ॥ विठ्ठल अनाथाकैवारी ॥ विठ्ठलबुडतियातारी ॥ विठ्ठलउभाभीमातीरीं ॥ विठ्ठलहरीमहादोषां ॥ २ ॥ विठ्ठलडोळससांवळा

॥ विठ्ठलपाहातीअबलाबाळा ॥ विठ्ठलध्यारेवेळोवेळां ॥ विठ्ठलकमळावल्लभ ॥ ३ ॥ विठ्ठलहामहानिधी ॥ विठ्ठलयेकलियामांदी ॥ विठ्ठलेंहरतीमहाव्याधी ॥ विठ्ठलेंसर्वसिद्धी होईल ॥ ४ ॥ विठ्ठलधरारेमानसीं ॥ विठ्ठलेंविणमुक्तिकैंची ॥ विठ्ठलसोडवीलअहर्निशीं ॥ विठ्ठलेंगणिकेसीउद्धारिलें ॥ ॥ ५ ॥ श्रीविठ्ठलेंधन्यादिवस ॥ श्रीविठ्ठलपरमहंस ॥ श्रीविठ्ठलमुक्तिरस ॥ श्रीविठ्ठलह्मणेनामा ॥६॥ ॥६०८॥

त्रिभुवनींचेंसुखआलेंभक्तिमुसें ॥ तेंहेंविठ्ठलवेषेंअवतरलें ॥ १ ॥ वरव्याचेंबरवेंपहातांनित्यनवें ॥ हृदईंधरितां निवेत्रिविधताप ॥ २ ॥ चोविसांवेगळेंसहस्त्रनामांहूनिआगळें ॥ निर्गुणनिराळेंशुद्धबुद्ध ॥ ३ ॥ जेथेंवेदांमौनपडेश्रुतींसीसांकडें ॥ वर्णितांकुवाडेंपुराणांसी ॥ ४ ॥ तेंभावाचेंआळुकेंभुललेंभक्तिसुखें ॥ दिधलेंपुंडलिकेंसाधोनिया ॥ ५ ॥ नामाह्मणेआह्माअनाथालागून ॥ निडारलानयन वाटपाहे ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ६०९ ॥

सत्यानित्यमुक्तशुद्धबुद्धयुक्त ॥ कारणरहितनिरंजन ॥१॥ तेंआह्मींरेखिलेंचर्मचक्षुदृष्टीं ॥ उभेंवाळुवंटींपंढरीये ॥ २ ॥ वेदांअगोचरतयासहस्त्रमुखा ॥ तेंझालेंपुंडलिकालोभापर ॥ ३ ॥ परतल्याश्रुतिह्मणतीनेतिनेति ॥ आह्मागातांगीतींसांपडलें ॥ ४ ॥ स्वरूपाचानिर्धारनेणतीपुराणें ॥ शिणलींदरुशनेंवेवादती ॥ ५ ॥ नामाह्मणेयासीभावाचिकारण ॥ पावावयाचरणकेशवाचे ॥ ६ ॥ ॥ ६१० ॥

पावावयाआत्मसुख ॥ तेंहेंविटेवरीदेख ॥ १ ॥ नको जाऊंपरदेशीं ॥ वासकरीपंढरीसी ॥ २ ॥ भावधरूनिबळ-

कट ॥ मुखींनामयेकनिष्ठ ॥ ३ ॥ नामाह्मणेगोणाबाई ॥ सर्वसुखयाचेपाईं ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ६११ ॥

वैकुंठींह्मणोंतरीचतुर्भुजादिसे ॥ सुंदररूपतेथेंनाहींनाहीं ॥ १ ॥ क्षीरसागरींनिद्रिस्ताचिदिसे ॥ सुंदर०॥२॥ लंकेसीह्मणोतरीवानराचेसंगें ॥ सुंदररू० ॥ ३ ॥ गोकुळीं ह्मणोंतरीगौळियाचेबुद्धी ॥ सुंदररू० ॥ ४ ॥ वेदुयासीह्मणोंतरीनाहींकरचरण ॥ सुंदररू० ॥ ५ ॥ हृदईंह्मणोंतरी अव्यक्तादिसे ॥ सुंदररू० ॥६॥ नामाह्मणेसर्वगुणींसंपन्न ॥ येकउभापरिपूर्णशोभतसे ॥ ७ ॥ ॥ ॥ ६१२ ॥

अनंतरूपाचेंहेंसार ॥ अनंततीर्थांचेंमाहेर अनंतींअनंतअपार ॥ तोहाकटींकरविटेउभा ॥ १ ॥ धन्यधन्यपांडुरंग ॥ सकळदोषांहोयभंग ॥ पूर्वजउद्धरतीसांग ॥ पंढरपुरदेखिलिया ॥ २ ॥ नीराभिवरापडतांदृष्टीं ॥ स्नानकरितांसुलभसृष्टी॥अंतींवासत्यावैकुंठीं ॥ ऐसापरमेष्ठीबोलिला॥ ॥ ३ ॥ तेथेंयेकशीतदिधल्याअन्न ॥ कोटिकुळ्याउद्धरण ॥ कोटियागघडलेजाण ॥ ऐसेंमहिमानतेथींचें ॥ ४ ॥ नामा ह्मणेधन्यजन्म ॥ ज्यासीपंढरीचानेम ॥ तयाअंतींपुरुषोत्तम ॥ जीवेंभावेंनविसंबे ॥ ५ ॥ ॥ ॥ ६१३॥

धन्यतोचिजगींजाणाराजयोगी ॥ जेणेंपांडुरंगींधरिला भाव॥१॥ संकल्पविकल्पशून्यकरुनीमन ॥ हृदईंधरिलेंध्यान विठोबाचें ॥ २ ॥ महापापरासीत्याचीझालीहोळी ॥ वाजवितांटाळीविठ्ठलनामें ॥ ३ ॥ कोटिकुळेंहोतीक्षणोंचिपावन॥ करितांयेकस्नानचंद्रभागे ॥ ४ ॥ शोकमोहदुःखविध्वंसिले हेळा ॥ अवलोकितांडोळापांडुरंग ॥ ५ ॥ नामाह्मणेधन्य

धन्यतेसंसारीं ॥ चालवितीवारीपंढरीची ॥ ६ ॥ ६१४ ॥

प्रल्हादादिकांचेंअंतरींचेंध्येय ॥ तेंहेंपंढरियेउभेंअसे॥१॥ जाणोनिनेणतेझालेकवण्यासुखें ॥ कायपुंडलिकेंदाखविलें॥ ॥ २ ॥ जेंवेदाचेंसारश्रुतीचेंजिव्हार तेंचिकटींकरठेउनीउभें ॥ ३ ॥ जेंज्ञानाचेंजीवनवेदाचेंभूषण ॥ तेंसुखनिधान विटेवरी ॥ ४ ॥ शुद्धबुद्धमुक्तसमाधींचेंसुख ॥ तेंउभेंप्रत्यक्ष वाळुवंटीं ॥ ५ ॥ हृदईंधरीनामानिजबोधेंनिवाला ॥ शीण विसरलासंसारींचा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ६१५ ॥

योगियाचेंब्रह्मशून्यव्योमाकार ॥ आमुचेंसाकारविटेवरी ॥ १ ॥ दाटुगेंनागरकटींठेउनीकर ॥ सर्वस्वेंउदारभक्तालागीं ॥ २ ॥ ज्ञानियासिद्धालक्षापरीनये ॥ आमुची वाटपाहेअनाथाची ॥ ३ ॥ पुंडलिकाभावेंवोळलेंवोरसें ॥ नेणोंकायकैसेंप्रेमत्याचें ॥ ४ ॥ नामाह्मणेजीवेंकरीनवोवाळणी ॥ ह्मणींचक्रपाणीदिठावसी ॥ ५ ॥ ॥ ६१६ ॥

भक्ताचीयाकाजाअवतारधरी ॥ कृपाळुश्रीहरिसाचोकारें ॥१ ॥ तोहामहाराजचंद्रभागेतीरीं ॥ उभाविटेवरीपांडुरंग ॥ २ ॥ वेदनेलेह्मणोनिमत्स्यझालाहरी ॥ शंखासुरामारी आफळोनि ॥ ३ ॥ सागरमंथनींमंद्राचळबुडाला ॥ कांसव तोझालातयातळीं ॥ ४ ॥ हिरण्याक्षेंधरानेतारसातळां ॥ वराहरूपेंत्यालावाधियेलें ॥ ५ ॥ प्रल्हाददासीपितागांजी नानापरी ॥ स्तंभींनरहरिप्रगटला ॥ ६ ॥ देवकाजींझाला वामनभूतळीं ॥ बळीसीपाताळींठेवियेलें ॥ ७ ॥ भूमीभार झालाक्षत्रियाचेकुळीं ॥ परशुरामेंकेलीनिक्षत्रिय ॥ ८ ॥ सीतेचीयाकाजेंरावणमर्दिला॥सूर्यवंशींझालारामचंद्र॥ ९ ॥

गोकुळींजन्मलाश्रीकृष्णआठवा ॥ होउनीपांडवांसा-
हाकारी ॥ १० ॥ व्रतभंगासाठींबौध्यअवतार ॥ झाला
दिगंबरआपसया ॥ ११ ॥ कलंकीअवतारहोणारश्रीहरी
॥ तेव्हांपृथ्वीवरीतृणनुरे ॥ १२ ॥ नामाह्मणेज्याचेअनंत
अवतार ॥ कायमीपामरबोलूंवाचें ॥ १३ ॥ ॥ ६१७ ॥

आपुलीपदवीसेवकासीद्यावी ॥ तोयेकगोसांवीपांडुरंग
॥ १ ॥ भावाचाआळुकाभुललाभक्तिसुखा ॥ सांपडलाफुका
नामासाठीं ॥ २ ॥ प्रेमाचाजिव्हाळानामाचीआवडी ॥
क्षणयेकनसोडीसंगत्याचा ॥ ३ ॥ नामाह्मणेआह्लादीनांचें
माहेर ॥ तोयेकउदारपांडुरंग ॥ ४ ॥ ॥ ६१८ ॥

ज्ञानियाचेंज्ञेयध्यानियाचेंध्येय ॥ पुंडलिकाचींप्रियसुख
वस्तु ॥ १ ॥ तेंहेंसमचरणसाजिरेंविटेवरी ॥ पहातांभी-
मातीरींविठ्ठलरूप ॥ २ ॥ जेंतपस्वीयाचेंतपजापकाचेंजा-
प्य ॥ योगियाचेंगोप्यपरमधाम ॥ ३ ॥ जेंतेजकाचेंतेजगु-
रुमंत्राचेंगुज ॥ पूजकाचेंपूज्यकुळदैवत ॥ ४ ॥ जेंजीव-
नातेंजीवविंतेंपवनातेंनिववितें ॥ जेंभक्ताचेंउगवतेंमायाजा-
ळ ॥ ५ ॥ नामाह्मणेतेंसुखाचेंआइतें ॥ जोडलेंपुंडलिकातें
भाग्ययोगें ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६१९ ॥

अठ्ठाविसयुगेंउभाठेलाद्वारीं ॥ पुंडलिकाचेवरीठेउनी
लक्ष ॥ १ ॥ कृपेचासागरभक्तजनवत्सल ॥ तोआमुचा
विठ्ठलमायबाप ॥ २ ॥ भक्तासीभाळलाअरूपरूपासीआ-
ला ॥ वेळाईतजालाभक्तालागीं ॥ ३ ॥ भक्तिचेनीरूपेंन
घडेतेंकेलें ॥ वैकुंठआणिलेंभूमंडळीं ॥ ४ ॥ भुक्तिमुक्ति
सिद्धीत्यापाईंलागती ॥ उद्धटगर्जतीविठ्ठलनाम ॥ ५ ॥

नामाह्मणेकेशवउदाराचाराव ॥ सेवाचरणठावदेईलआ-
ह्मा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६२० ॥

विठ्ठलकानडाबोलूंजाणे ॥ त्याचीभाषापुंडलिकनेणे॥१॥ युगेंअठ्ठाविसजालीं ॥ दोघांनाहींबोलाबोली ॥२॥ करठे-उनीकटावरी ॥ उभाभीवरेच्यातीरीं ॥ ३ ॥ नामाह्मणे स्वामीमाझा ॥ उभाभक्ताचीयाकाजा ॥ ४ ॥ ॥ ६२१ ॥

दीनाचीमाउली ॥ आजीआह्मींदेखियेली ॥ १ ॥ कटीं ठेऊनियाकर ॥ उभाराहेविटेवर ॥ २ ॥ भक्तावरकेली ॥ जेणेंकृपेचीसाउली ॥ ३ ॥ मुगुटरत्नांचासाजिरा ॥ वरी मोतियांचातुरा ॥ ४ ॥ रूपलावण्यगोजिरें ॥ कासेपिंव-ळापीतांबर ॥ ५ ॥ चरणींब्रीदाचातोडर ॥ नामावंदीजो-डोनीकर ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६२२ ॥

आषाढीकार्तिकीनित्यआह्मासुगी ॥ शोभापांडुरंगींवन-वट ॥ १ ॥ संताचेंदरुशनहेंचिपिकजाण ॥ वृत्तिआलिंगन देतांनिवे ॥ २ ॥ देहनिवेतेथेंनवलसांगावें ॥ चित्तहेंदुणा-वेंब्रह्मानंदें ॥ ३ ॥ नामाह्मणेयासीमूळपांडुरंग ॥ त्याचे चरणींअव्यंगसुखआह्मा ॥ ४ ॥ ॥ ॥ ६२३ ॥

आह्माजतनकरावयाउभाविटेवरी ॥ तळवटींपंढरीवो-ढवली ॥ १ ॥ तिहीलोकींजगाजगत्रजीवन ॥ प्राप्ति पाहूनदानदेतुअसे ॥ २॥ चातकाचेंचिंतनींजळधरगगनीं ॥ पुढारदेउनीपुंडलीक ॥ ३ ॥ विष्णुदासनामाविनवीवेळोवे-ळां ॥ विठ्ठलींजीवनकळामुरालीसे ॥ ४ ॥ ॥ ६२४ ॥

कमळगर्भांमनींथोरचिंताकरी ॥ पद्मठसेवरीउमटता-ति ॥ १ ॥ चरणवानूंकैसेसुकुमारराजस ॥ शोभतीसौरस

विठ्ठलाचें ॥२॥ लावण्यसागररूपपाहोंठेली ॥ दृष्टिपैंखुंट-लीरुक्मिणीची ॥ ३ ॥ नामाह्मणेविठूचेचरणसुकुमार ॥ तेथेंवाहेधारगंगादेवी ॥ ४ ॥ ॥ ॥ ६२५ ॥

उभाविटेवरीअसेतोकैवारी ॥ भेटावयाउभारीदोनीबाह्या ॥ १ ॥ गुणदोषत्याचेनपाहेचिडोळा ॥ भेटेवेळोवेळां केशीराज ॥ २ ॥ ऐसादयावंतुघेतुसमाचारु ॥ लहान आणिथोरुसांभाळितो ॥ ३ ॥ सर्वांलागींदेतोसमानदर्शन॥ उभातोआपणसमाचारी ॥ ४ ॥ नामाह्मणेतयाभक्ताचीआवडी ॥ भेटावयाकडाकडींउभाठेला ॥ ५ ॥ ॥ ६२६ ॥

जायजायपरतोनीपाहे ॥ लाजावलाजीवपरतेनागेमाये ॥ १ ॥ नायकविठ्ठलपाहूंद्यासाजणी ॥ नपुरेगेधणीडोळियांची ॥ २ ॥ देखिलागेमायलावण्यसुंदर ॥ नामयादातार केशवराज ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ६२७ ॥

देखदेखपैलविलासे ॥ उभाअसेविटेवरीगेबाई ॥ १ ॥ खोळबुंथीचाआकारुझळकेपीतांबरु ॥ सौभाग्यसुंदरुविठ्ठल देव ॥ २ ॥ दानदीक्षागुरुनामयादातारु ॥ धरावयानागरुकेशीराज ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ६२८ ॥

तीर्थविठ्ठलक्षेत्रविठ्ठल ॥ देवविठ्ठलदेवपूजाविठ्ठल ॥ १ ॥ माताविठ्ठलपिताविठ्ठल॥ बंधुविठ्ठलगोत्रविठ्ठल ॥२॥ गुरुविठ्ठलगुरुदेवविठ्ठल ॥ निधानविठ्ठलनिरंतर ॥ ३ ॥ नामाह्मणेमजाविठ्ठलसांपडलाह्मणोनिकळिकाळापाडनाहीं ४॥६२९

जीवविठ्ठलशिवविठ्ठल ॥ आत्माविठ्ठलअखंडित ॥ १ ॥ जनकविठ्ठलजननीविठ्ठल ॥ सोयराविठ्ठलसांगाते ॥ २ ॥ आहिक्यविठ्ठलपरत्रविठ्ठल॥निरंतरविठ्ठलनामयातें ३॥६३०

विठ्ठलआमुचेंसुखाचेंजीवन ॥ विठ्ठलस्मरणप्रेमपान्हा॥१
विठ्ठलचिध्यावोविठ्ठलचिगावो ॥ विठ्ठलचिपाहोंसर्वांभूतीं ॥२
विठ्ठलापरतेंनदिसेसर्वथा॥कल्पयेतांजातांगर्भवास॥३॥ नामाह्मणेचित्तींआहेसुखरूप॥संकल्पविकल्पमावळती॥४॥६३१

उभाभीमातीरींकरकटावरी ॥ राहेनिरंतरींभक्तापुढें॥१॥
भक्ताभाग्यथोरनव्हेकथींप्राप्ती ॥ जाणोनिश्रीपतीकायबोले ॥ २ ॥ गणीकागजेंद्रउद्धवनारद ॥ आपणगोविंदमिळोनीया ॥ ३ ॥ समुद्रमंथनींउभाकरूनिया ॥ लागतसेपाया नामाह्मणे ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६३२ ॥

खोळंबुंथीचातोचोबारा ॥ उभादेखिलातोगेबाई ॥ १ ॥
नंदनंदनसंताचेंजीवन॥उभादेखिलातोगेबाई ॥ २ ॥ कामिनीमनोहर ॥ नामयादातारतोगेबाई ॥ ३ ॥ ६३३ ॥

आनंदअद्वयनित्यनिरामय॥जेंकांनित्यध्येययोगियांचें॥ ॥ १ ॥ तेंहेंसमचरणसाजिरेंविटेवरी ॥ पहाभीमातीरींविठ्ठलरूप ॥ २ ॥ जेंपुराणांसीवाडश्रुतिनेणतीपार ॥ तेंजाहलेंसाकारपुंडलिका ॥ ३ ॥ नामाह्मणेज्यातेंसनकादिकध्यात ॥ तेंमाझेंकुळदैवतपंढरिये ॥ ४ ॥ ॥ ॥ ६३४॥

उभाविटेवरीकरकटावरी॥ पुंडलिकाद्वारींउभादेखिला ॥ ॥ १ ॥ देहुडापाउलींवहातोमोहरी ॥ गळागुंजाहारदेखियेला ॥ २ ॥ मृगनाभीलल्लाटींमयूरपत्रवेठी ॥ खेळतांयमुनातटींदेखियेला ॥ ३ ॥ पुष्पभीमासंगमींगोपाळआश्रमीं ॥ कालाकरितांआह्मींदेखियेला ॥ ४ ॥ नामाह्मणेकेशवातुज देखिलेंहृदयीं ॥ स्थिरहोउनीराहीजन्मवरी ॥ ५ ॥ ६३५ ॥

अहोत्रिभुवनामाझारीं ॥ भूवैकुंठपंढरी ॥ चंद्रभागास-

रीवरीं ॥ विटेवरीनीटउभा ॥ १ ॥ उभाकैवल्यनायक ॥ दृष्टिसन्मुखपुंडलिक ॥ ज्याचेब्रह्मादिकसेवक ॥ इतरांचा कवणपाड ॥ २ ॥ सुरंगचरणतळें ॥ रातलींरातोत्पलें ॥ जिं-किलींमाणिकाकिळें ॥ मजपहातां ॥ ३ ॥ पदअंकुशपताका ॥ ध्वजवज्रांकितरेखा ॥ तेथेंलक्ष्मीरातलीदेखा ॥ सिंधुत-नया ॥ ४ ॥ अनुपम्यगेमायअनुपम्यसार ॥ परब्रह्मसा-कार ॥ मंत्रमयत्रिअक्षर ॥ विठ्ठलनाम ॥ ५ ॥ तेंगाप्र-त्यक्षध्यान ॥ सर्वसुखाचेंनिधान ॥ दृष्टींपहातांचिमन ॥ माझेंपरतेना ॥ ६ ॥ नलगेपातयापातें ॥ लक्षलागलें निरुतें ॥ सुखझालेंवोमनातें ॥ कायसांगूंवोमाये ॥ ७ ॥ मनइंद्रियेंवेधिलीं ॥ घरवृत्तीचेंरिघालीं ॥ कायस्वानंदा मुकलीं ॥ वेगळेपण ॥ ८ ॥ पदद्वयाचीठेवणी ॥ इंद्रनीळ गुल्फदोनी॥मिरवेगंगाचरणीं ॥ वाकीतोडरपाईं ॥ ९ ॥ स-रळअंगोळियावरी ॥ नखेंवर्तुळसाजिरीं ॥ चंद्रदेखो-निअंबरीं ॥ झालाकळाहीन ॥ १० ॥ पोटरियाजानुजघन॥ मर्गजमणिस्तंभ ॥ कैसेवोतिलेस्वयंभ॥वोघकालिंदीचे॥ ११॥ पीतांबरमाळगाठीं ॥ रत्नकिळाबरवंटी ॥ विद्युल्लतेचीया थाटी॥ जैशामेघमंडळीं ॥ १२ ॥ वीरकंकणेंमणगटीं ॥ कां-डोकांडींमुद्रिकादाटी ॥ माजसामावेजोमुष्टी ॥ कटितटींसू-त्र ॥ १३ ॥ नाभीसरोजगहन ॥ ब्रह्मीयाचेंजन्मस्थान ॥ वरीत्रिवळीलक्षण ॥ कैसेंरामराया ॥ १४ ॥ कायवानूंतें उदर ॥ सांठवलेंचराचर ॥ ब्रह्मगोळनिरंतर ॥ जयारोम रंध्रीं ॥ १५ ॥ तनुमृदुशामळनिर्मळ ॥ प्रभादिसतीसोज्व-ळ ॥ जेवींवोळलेंसेजळ ॥ घनमंडळीं ॥ १६ ॥ शुद्धचंदन

पातळ ॥ अंगींचर्चिलानिर्मळ ॥ जेवींइंद्रनीळकिळ ॥ गुल्फमोतियाचे ॥ १७ ॥ पदकबाहुभूषण ॥ नवरत्नांचेंखेवण ॥ कैसेंसर्वांगींझालेपण ॥ लेणेंलेणियासी ॥ १८ ॥ कौस्तुभमिरवेकंठीं ॥ मूर्तिदिसतीगोमटी ॥ सुरवरांचीयादृष्टी॥भाळलिया ॥ १९ ॥ श्रवणींकुंडलेंझळकती ॥ जैशाविजूतळपती ॥ कंठींमाळावैजयंती ॥ सहतुळशीदळ ॥ २० ॥ विशाळनयनदृष्टी ॥ ठेवुनीयानासापुटीं ॥दावीयोगकसवटीं॥ योगियासीगेमाये ॥ २१ ॥ लिंगस्वयंभशिरस्थळीं ॥ रश्मीमुगुटझळाळी ॥ वेटीमोरविसातळीं॥मृगनाभीतिलक ॥२२॥ मंदस्मितअधरसुरेख ॥ कैसेंनिमासुरमुख ॥ तेथेंमदनमयंक ॥ कोटिकुर्वंडीया ॥ २३ ॥ विष्णुदासनामाजीवें ॥ वोवाळीसर्वभावें ॥ अनुभवीअनुभवें ॥ अनुभविजे सदां ॥ २४ ॥ ॥ ॥ ॥ ६३६ ॥

केशवेंपैंमुक्ति केशवेंपैंभक्ति ॥ केशवेंचिशांतिनिर्विकल्प ॥ १ ॥ केशवपैंदेणेंकेशवपैंघेणें ॥ केशवकरणेंधंदाआह्मा ॥ ॥ २ ॥ केशवलौकिककेशववेव्हारीं ॥ केशवनिर्धारींनामतुझें ॥ ३ ॥ नामाह्मणेआह्माकेशवबोळला ॥ भावासीभुललावाळुवंटीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ६३७ ॥

बाहेरींभीतरींपाहतेंयेकातें ॥ उभेंअसेव्याप्तपंढरिये ॥ ॥ १ ॥ पंढरीचाराणाविटेवरीजाणा ॥ जीवींचियाखुणाभक्तासांगे ॥ २ ॥ येकाह्मणेगुणएकारमाझे ॥ उच्चारितां सहजमीचिव्हाल ॥ ३ ॥ कटींठेवुनीहातनलावीपात्यातें ॥ ऐसेंपहानित्यह्मणतसे ॥ ४ ॥ हामजकडेआवघेंहेंलटिकें ॥ देखतांतितुकेंमीचिअसें ॥ ५ ॥ नामाह्मणेमजसांगादेवरा-

या ॥ नसोडींमीपायाजन्मोजन्मीं ॥ ६ ॥ ॥ ६३८ ॥

नामाचागजरगर्जेभीमातीरीं ॥ महिमाजेथोरीतुजयेका॥ ॥ १ ॥ सिद्धिरिद्धिदासीअंगणझाडिती ॥ उचिष्टकाढिती मुक्तिचारी ॥ २ ॥ चारीवेदभाटहोउनीगर्जती ॥ सनकादिकगातीकीर्तितुझी ॥ ३ ॥ सुरवरांचाभारअंगणींलोळती ॥ चरणरजाक्षितिशिववंदी ॥ ४ ॥ नामाह्मणेदेवऐसाहाकृपाळ ॥ करितोसांभाळअनाथनाथ ॥ ५ ॥ ॥ ६३९ ॥

---

# गोकुळप्रकरणीं अभंग.

देहुडाचरणुवाजवितोवेणु ॥ गोपिकारमणुस्वामीमाझा॥ ॥ १ ॥ देखिलागेमाययमुनेचेतीरीं ॥ हातखांद्यावरीराधिकेच्या ॥ २ ॥ गुंजावर्णडोळेशिरींबावरझोटी ॥ मयोरपिच्छवेटीशोभतसे ॥ ३ ॥ सगुणमेघशामलावण्यसुंदर ॥ नामयादातारकेशवराज ॥ ४ ॥ ॥ ॥ ६४० ॥

मोरविसावेटीगुंजाहारकंठीं ॥ तिलकल्लाटींचंदनाचा ॥ ॥ १ ॥ रत्नजडितमाथाघोंगडेंगोमटें ॥ परब्रह्मधाकुटेंगाई चारी ॥ २ ॥ यशोदाह्मणेकान्हानकोजाऊंरानां ॥ चित्ताचीवासनाझुरतीमाझ्या ॥ ३ ॥ मार्गींयेतांजातांझळयाझेपावती ॥ खडतरतावतीसूर्यकिरण ॥ ४ ॥ आसनींशयनींजीवेंजतनकरा॥नामयादाताराकेशवराजा॥५॥ ॥६४१

दुःखाचीनिवृत्तिसुखाचेंतेंसुख ॥ पहातांश्रीमुखगोविं-
दाचें ॥ १ ॥ रंगणींरांतगगुलगुलाबोलत ॥ असुररूळत
चरणातळीं ॥ २ ॥ नामाह्मणेहातींलोणियाचाउंडा ॥ गो-
ळणीत्याच्यातोंडाभुललिया ॥ ३ ॥ ॥ ॥ ६४२ ॥

दोंदिलदोंदिलठमकतचाले॥ गोजिरींपाउलेंघालूनिया॥
॥ १ ॥ पाईंरुणझुणरुणझुणतीवाळे ॥ पहातांतेडोळेमननि-
वे ॥ २ ॥ सांवळेंसगुणमानसमोहन ॥ घोपीमनरंजनह्म-
णेनामा ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६४३ ॥

गडेनोराजाकींरेजाला ॥ कृष्णसिंव्हासनींबसला॥ध्रु०॥
पावामोहरीघोंगडी॥आह्मीखेळोंयमुनेथडीं॥नाचूंपाउलादेहु-
डीं॥कृष्णआमुचाकींरेगडी॥१॥खेळूंहुतुतुहुंवरी ॥थडकाहाणूं
टिरीवरी॥आतांचालिलादळभारीं ॥आमुचेयशोदेचाहरि ॥
॥ २ ॥ कुस्तिखेळतांकासाविसी ॥ शेंबुडखरकटेंनाकासी॥
कडेघेऊंसावकाशीं॥आतांबहुभीतोंत्यासी ॥ ३ ॥ आह्मींतु-
ह्मीसवेंजेऊं ॥ गाईवळावयाजाऊं ॥ त्याचेमानेंतबुक्यादे-
ऊं ॥ जवळींभेऊंजावयासी ॥ ४ ॥ नामाह्मणेचलाजाऊं ॥
हातजोडोनीरेउभेराहूं ॥ पायापडोनमागूनघेऊं ॥ जनींव-
नींतोचिकृष्णजीध्याऊं ॥ ५ ॥ ॥ ॥ ६४४ ॥

जेथेंनाहींकांहींनामरूपगुण ॥ बोलतीनिर्गुणतयालागीं
॥ १ ॥ तोचिगोकुळांतहोउनीगोपाळ ॥ ह्मणवितोबाळय-
शोदेचा ॥ २ ॥ चिन्मयचिद्रूपअक्षयअपार ॥ परेहुनीपर
ह्मणतीज्यातें ॥ ३ ॥ सर्वभूतांचीतेंफुटलियाखोळ ॥ भरलें
तेंनगळेआत्मपण ॥ ४ ॥ आनंदींआनंदमातलाअपार ॥
वेदासीतोपारनाहींज्याचा ॥ ५ ॥ नामाह्मणेसर्वरूपजो-

रूपस ॥ गोकुळींविलासमांडियेला ॥ ६ ॥ ॥ ६४५॥

अवतरलेहरिनंदाचेंमंदिरीं ॥ जाणोनियासुरींपुजिजेतें ॥ १ ॥ आतांगेलीसर्वआमुचीभियाचिंता ॥ भूभारसर्वथाउतरला ॥ २ ॥ यज्ञदानेंतपेंचाललीं अपार ॥ आमुचाआहारआह्मालागीं ॥ ३ ॥ दुष्टदुराचारीमातलेराक्षस ॥ त्यांचाकरीलनाशक्षणामाजीं ॥ ४ ॥ धर्मनीतिन्यायेंवाढेलअपार ॥ भाविकांसीपारउतरील ॥ ५ ॥ नामाह्मणेऐसेआनंदोनीसुर ॥ वर्षतातीभारसुमनांचे ॥ ६ ॥ ॥ ६४६ ॥

वाढोंलागलेहरिनंदाचेमंदिरीं ॥ रासक्रीडाकरीनित्यनवी ॥ १ ॥ देखोनियाचोजभुलल्यानरनारी ॥ देहभाववरी वोवाळिती ॥ २ ॥ सांवळेंगोजिरेंदिसेनेत्रालागीं ॥ ह्मणोनिवोसंगींसदाघेती ॥ ३ ॥ नाचेउडेबोलेमंजुळबोबडें ॥ तेथेंवेदापडेमौन्यसदा ॥ ४ ॥ नीचनवीलीळादाखवीअपार ॥ मनतेथेंस्थिरलावियेलें ॥ ५ ॥ नामाह्मणेगोपत्याचेसंगें रातले ॥ प्रेमानेंमातलेयेकसरा ॥ ६ ॥ ॥ ६४७ ॥

येकेकाळींमोठाआनंददाटला ॥ नभींउगवलापूर्णचंद्र ॥ ॥ १ ॥ तेव्हांगोपआलेविनवितीगोपाळा ॥ आतांचिजाऊंचलाचोरीलागीं ॥ २ ॥ कोठेंकायआहेतेंआह्माठाउकें ॥ जाऊंमिळोनीयायेकमेकें ॥ ३ ॥ तुझीयेसंगतीवाटतोआनंद ॥ दाविसीआनंदब्रह्मादिकां ॥ ४ ॥ नामाह्मणेऐसेगोपाळबोलिले ॥ ऐकोनियाझालेदेवांगोड ॥ ५ ॥ ॥६४८॥

देवसांगेतुह्मींसामोग्रीहेकरा ॥ सांगेनप्रकाराजाणोनियां ॥ १ ॥ तेणेंसर्वकार्यहोईलतुमचें ॥ ठेविलेंठाईंचेठाईं पडे ॥ २ ॥ घ्यारेआतांबरीमृत्तिकाशोधोनि ॥ सराटेवें-

चोनिवोटींभरा ॥ ३ ॥ डांगायेकआणावेंचोनियांखडे ॥ निघारेरोकडेयेकसरां ॥ ४ ॥ नामाह्मणेऐसेंऐकतांगोपाळ ॥ नाचतीसकळकृष्णापुढें ॥ ५ ॥ ॥ ६४९ ॥

मोरविसाकुंचेढाळितीअपार ॥ येतातीकुमरयशोदेचे ॥ ॥ १ ॥ शिंकींपावेमोहरेवाजतीकुसरीं ॥ हुंबलियासरी गर्जतीगगन ॥ २ ॥ मोतियांचेघोंसचांदवेझळकती ॥ कनकदंडहातींरामकृष्णां ॥ ३ ॥ गोरजेंडौरलापीतांवर भिजला ॥ स्वेदजोदाटलाहृदयकमळीं ॥ ४ ॥ रुळतीवनमाळाकंठींगुंजाहार ॥ तरुघोसअपारखोंवीवरी ॥ ५ ॥ गजगतिपाउलेंटाकीभूमीवरी ॥ धन्यतेसंसारींडोलदेती ॥ ६ ॥ कुंकुमकेशररातलींरातोत्पलें ॥ ध्वजवज्रांकुशकमळेंऊर्ध्वरेखा ॥ ७ ॥ विमानवत्आकाशझालेंसकळ ॥ धन्यतेंगोकुळह्मणतीदेव ॥ ८ ॥ देवपुष्पवृष्टिकरितीकृष्णावरी ॥ अंबरींजयजयकारींगर्जताती ॥ ९ ॥ माडीयागोपुरींपहातीसुंदरी ॥ यशोदेचेकरींनिंबलोण ॥ १० ॥ वोवाळिलाशिंपीनामयाचादातार ॥ रखुमादेवीवरश्रीविठ्ठल ॥ ११ ॥ ६५० ॥

माथामोरविसावेठी ॥ श्रवणींकुंडलेंगोमटीं ॥ हातींघेउनीवेताटी ॥ गोधनापाठींलागला ॥ १ ॥ तुझींपाउलें अनंता ॥ नविसंवेंगासर्वथा ॥ गोविंदामाधवाअच्युता ॥ श्रीविठ्ठला ॥ २ ॥ गाईगोकुळींपावला ॥ येकह्मणती वळावळा ॥ विष्णुदासनामाचरणाजवळा ॥ अखंडवळत्या देतुसे ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६५१ ॥

कृष्णाप्रतीगोपाळ ॥ ह्मणतातीसकळ ॥ नकळसीअकळ ॥ अताताता ॥ १ ॥ कान्होबाचीसंगती ॥ ब्रह्मा-

दिकइच्छिती ॥ धन्यआम्हींह्मणती ॥ आलालाला ॥२॥ अजगरमारिला ॥ वणवातोगिळिला ॥ गिरिथोरउचलिला ॥ अबाबाबा ॥ ३ ॥ केशीयासीभंगिलें ॥ दैत्यकुळ मारिलें ॥ दोन्हीवृक्षउन्मळिले ॥ आमामामा ॥ ४ ॥ मामामारूंगेलासी ॥ उपटीगजदंतासी ॥ मल्लयुद्धखेळसी ॥ हुतुतुतु ॥ ५ ॥ गोपाळाचेसंगती ॥ रांडापोरेंइच्छिती ॥ सोजीखाऊंह्मणती ॥ कुलुलूलु ॥ ६ ॥ सद्गुरुकृपेंआपण ॥ वस्तुझालीपरिपूर्ण ॥ जनाहोईसावधान ॥ अरेरेरेरे ॥ ७ ॥ ऐसेतुझेपोवाडे ॥ वर्णितातीवाडेंकोडें ॥ विष्णुदासनामावेडें ॥ आयुयुयु ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ६५२ ॥

वेदांअगोचरपरब्रह्मकारण ॥ योगियाहृदइंचेंप्रेमतत्त्व निर्वाण ॥ अकळुनकळोचिशेखींधारियेलेंमौन ॥ तेंरूपपंढरींविटेसमचरण ॥ १ ॥ कानडावोविठ्ठलुउभाभिवरातीरीं ॥ भेटीचेंआर्तजिवालागलेंवोभारी ॥ ध्रु० ॥ वैकुंठपंढरीहेदेवेंरचिलीपैंगा ॥ शिवेंतेंवंदियेलीचरणींचीगंगा ॥ सदाचारनामघोषुकलिमळजायभंगा ॥ कायसुखवानूंतेथीचेंभेटलियापांडुरंगा ॥ २ ॥ विठ्ठलनामवाचेजनाहाचिउपचारु ॥ ह्मणऊनिदावितसेकटींठेउनीकरु ॥ येरासीमायानदीकामक्रोधमगरु ॥ ठेवानामयाचास्वामीविठ्ठल वीरु ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ६५३ ॥

येतुयेतुदेखिलाराजबिदीं ॥ सर्वेचालेगोपाळांचीमांदी ॥ येकीनारीपाहोंउभ्याठेल्याबिदीं ॥ येकीयेकीबांधितीसांधी ॥ ॥ १ ॥ हरिहरवचनसदृशलोचना ॥ डोळियावेगळान्हेसिकान्हा ॥ अरेअरेकान्हयामनमोहना ॥ गोपिकाभा-

ळल्यातुझियागुणा ॥ २ ॥ पीतांबरशेलाकासियेला ॥ माणिक्यमेखळावरीगांठियेला ॥ कस्तूरीचामळवटुरेखिये-ला ॥ परिमळुबाहाळसाजेगोपाळा ॥ ३ ॥ येतुयेतुउभा-राहातु ॥ सुदाम्याच्याखांदांठेवीहातु ॥ समदृष्टींगोपिकातें न्याहाळितु ॥ आनंदभरेंचैतन्यडुल्लतु ॥ ४ ॥ चतुर्वेद भाटसांगाते ॥ उभयावर्णितीरामकृष्णातें॥ श्रुतिस्मृतिवि-द्यावंते ॥जयजयवर्णितीकृपानिधीतें ॥ ५ ॥ ऐसागेमायसौ-भाग्यसुंदरु ॥ नंदरायाचाकुमरु ॥ विष्णुदासनामयादा-तारु ॥ खेळुखेळेशारंगधरु ॥ ६ ॥ ॥ ॥ ६५४॥

अव्यक्तपरब्रह्मकैसेंआलेंव्यक्तीं ॥ अकळुनकळेचितोहा अमूर्तमूर्ति ॥ पुंडलिकाचेभक्तियेउनीवाळुवंटीं ॥ उभाराहे विटेवरीकरठेउनीकटीं ॥ १ ॥ जीवींचाजीवनुमजभेटवाहं-री ॥ लागलेंप्रेमापिसेंहोईनदासीकामारी ॥ ध्रु० ॥ कासे कासिलापीतांवरतयावरीमेखळा ॥ उटीचंदनाचीशोभतीव-नमाळा ॥ बाहुबाहुवटेतेंरूपखुंतलेंडोळां ॥ २ ॥ अधरजे पौळियांचेदंतहिऱ्याचीज्योती ॥ विशाळनयनवोभोवयाव्यं-कटाअति ॥ टिळकजोरेखिलामृगनाभीलल्लाटीं ॥ उपमा नयेव्यक्तिचंद्रापडियेलीतुटी ॥ ३ ॥ माथांमुगुटजोरत्नेंज-डियेलींवरी ॥ त्याखालींमयूरपत्रेंवेटीसाजेमुरारी ॥ मागा त्याविरगुंठीपुष्पेंतुरांबिलींवरी ॥ तेणेंमीभाळलेंभेटवाझडक-री ॥ ४ ॥ इंद्रनीळकिळउभाघनशामुहादिसे ॥ पहातो येकदृष्टींचकितकेलेंवोहास्य ॥ तेचितेकामबाणजीवालागलें पिसें ॥ नामयाविष्णुदासाव्यापिलेंहृषीकेशें ॥५॥ ६५५ ॥

गरुवावोगुणगंभीरवो ॥ चैतन्यप्रकाशुयोगीसहजसुका-

मिनीविलासु ॥ ध्रु० ॥ चिदानंदघनुतनुसांवळावो ॥ ह-रिपाहतांनिवतीलोचन ॥ तनुमनुचरणोंधोविगुंतलें ॥ ना-मगोपाळाचेंअमृतसमान ॥ १ ॥ पीतांबरशेलामालगा-ठीयावोगोपाळासी ॥ मुगुटींझळाळसर्वांगीं ॥ कस्तूरीविले-पनकंठींवनमाळा ॥ २ ॥ येणेंजन्मेंपाविजेगोपाळासीआ-नुनाहींसार ॥ श्रीवत्सलांछनहीचिखूणविष्णुदासनामयादा-तार ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६५६ ॥

आजीचादिवसआह्मासोनियाचा ॥ गोवळुभेटलाका-न्हानंदरायाचा ॥ १ ॥ कान्होबापेंढारियोयेईलयमुने ॥ तयाविणमजघडेनिगमेमनें ॥ २ ॥ सोळासहस्त्रगोपीह्म-णतीअगाजगजीवना ॥ येकवेळांदेईभेटीनंदनंदना ॥ ॥ ३ ॥ उजळूंआरतीकरूंकुंवडीया ॥ शेजभरूंनाम्यास्वामी वनमाळिया ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६५७ ॥

गेलेंवृंदावनांतेथेंदेखिलाकान्हा ॥ संवगड्यांमाजींउभा ध्यानलागलेंमना ॥ १ ॥ हरिनामगोडझालेंकायसांगूंगे माये ॥ गोपाळबहातीपावेमनकोठेंनराहे ॥ २ ॥ त्याचें श्रीमुखसाजिरेंवोकुंडलेंचित्तचोरें ॥ सांडुनीअमृतधणीवेध-लेंचकोरें ॥ ३ ॥ सांडुनीयांध्रुवमंडळआलीनक्षत्रमाळा ॥ कौस्तुभातळवटींवैजयंतीशोभेगुळां ॥ ४ ॥ सांडुनीमेघ-राजुकटींसूत्रतळपेविजु ॥ भुललाचतुराननुतयानोहेउपजु ॥ ॥ ५ ॥ सांडुनीलक्ष्मीनिजगोपाळासीबोलेगुज ॥ अचोज हाचोजवेनाब्रह्मादिकांसहज ॥ ६ ॥ वाजटधीटमोठीऐ-सीकवणअसेखिळू ॥ भेदलीहरिचरणींपाईंमुरडीववाकीसो-ज्वळु ॥७॥ त्याचियापायींचींनूपुरेंवोवाजतीगंभीर ॥ लुब्ध-

लियापक्षीयातिधेनुपाचारीस्वरें ॥ ८ ॥ आणीकयेकनवलकैसेंस्वर्गींदेवझालेपिसे ॥ ब्रह्मादिकउच्छिष्टालागींदेखाजळींझालेमासे ॥ ९ ॥ आणीकयेकनवलपरिकरींघेउनीशिदोरी॥संवगडीयावांटीतसेनामयास्वामीमुरारि ॥१०॥६५८

काळागेदादुलापहातांअकळु ॥ तोझालागोवळुनंदाचागे ॥ १ ॥ काळागेदादुलाकाळागेदादुला ॥ पंढरींपहाचला विठ्ठलागा ॥ २ ॥ काळाह्मणोनिपाहोंगेलियेंजवळा ॥ मुनीकुसांवळादिसतसे ॥ ३ ॥ नामाह्मणेसर्वभक्षितोहा काळु ॥ भक्ताचाकृपाळुश्रीविठ्ठलु ॥ ४ ॥ ॥ ६५९ ॥

साधुसंतजनाकरितोंप्रार्थना ॥ भेटवादेवराणाद्वारकेचा ॥ १ ॥ तनमनप्राणवेधलेत्याचेपायीं ॥ येउनीमाझ्याराहीहृदयकमळीं ॥ २ ॥ गोपाळाचेमेळींखेळेवनमाळी ॥ यमुनेपावळीवेणुवाहे ॥ ३ ॥ शंखचक्रकरींमोरपिच्छेंशिरीं ॥ कानींमकराकारकुंडलेंतीं ॥ ४ ॥ गळांवनमाळाकासेसोनसळा ॥ देखोनिव्रजबाळातन्मयझाल्या ॥ ५ ॥ नंदाच्यानंदनेंमोहियेलेंमन ॥ लागलेंसेध्यानगोविंदाचें ॥ ॥ ६ ॥ विठानामयाचाचरणींचारज ॥ भेटवायादवराज द्वारकेचा ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ६६० ॥

हुंबरीचेमिसेंहुतुतुखेळती ॥ गडियासींश्रीपतिसर्वकाळ ॥ १ ॥ कळंबाचेखालींकुंकुमाचेसडे ॥ गोपाळपोवाडे दावितसे ॥ २ ॥ कायकायसोंगघेसीनानापरी ॥ गोपिकाचेघरींकामसारी ॥ ३ ॥ नामाह्मणेऐशीआगाधजेकीर्ति ॥ भोळ्याभक्तांप्रतिदावितसे ॥ ४ ॥ ॥ ॥६६१॥

परब्रह्मनिष्कामतोहागोळियाघरीं ॥ वाळेवाक्याअंदु

कृष्णनवनीतचोरी ॥ १ ॥ ह्मणतीगौळणीहरीचींपाउलेंध-
रा ॥ रांगतरांगतयेतोंहरिहाराजमंदिरां ॥ २ ॥ लपतछ-
पतयेतोहरिहाराजभुवनीं ॥ नंदातेंटाकूनिआपणबैसे
सिंहासनीं ॥ ३ ॥ सांपडलादेव्हारींयासीबांधादाव्यानें ॥
शंखचक्रगदापद्मशारंगपाणी ॥ ४ ॥ थोरापुण्येंबहुताकष्टें
जोडिलेंदेवा ॥ अनंतपोवाडेतुमच्यानकळतीमावा ॥ ५ ॥
नामाह्मणेअहोजीदाताराकेशवा ॥ जन्मोजन्मींद्यावीआ-
ह्माचरणसेवा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ६६२ ॥

आकाशगडगडीविद्युल्लतातळपती ॥ अनिवारमेघस-
णाणावर्षती ॥ १ ॥ राखियेलेंयेणेंदेवकीनंदनें ॥ गोपाळ
ह्मणतीआमुचेंकान्हें ॥ २ ॥ गोवर्धनगिरीउचलोनीनिज
करीं ॥ राखिलेंयापरीह्मणेनामा ॥ ३ ॥ ॥ ६६३ ॥

बाराहातधोंगडेएकाचिनारी ॥ पालऊघातिलाखांदिया
वरी ॥ १ ॥ जाईनत्यागोकुळापाहीनत्यागोपाळा ॥ तया-
लागींमाझेंमनउताविळा ॥ २ ॥ येकेहातींघातलातांब्या-
चावाळा ॥ हाळदोलीवांटुनीसुदलीडोळां ॥ ३ ॥ एकलीजातां
नोळखेमातें ॥ विष्णुदासनामयानेईनसांगातें ॥ ४ ॥ ६६४

रात्रीकाळीघागरकाळी ॥ यमुनाजळेंबहुकाळीवोमाय ॥
॥ १ ॥ बुंथीकाळीबिलगीरकाळी ॥ गळामोतियेंकाळींगेमाये
॥ २ ॥ मीकाळीकंचुकीकाळी ॥ कासेकसलीतीकाळीवोमाये
॥ ३ ॥ एकलीपाणियानवजायसाजणी ॥ सवेंपाठवामूर्ति
सांवळीवोमाये ॥ ४ ॥ विष्णुदासनामयाचीस्वामिणकाळी ॥
कृष्णमूर्तिबहुकाळीवोमाये ॥ ५ ॥ ॥ ॥ ६६५ ॥

यमुनेपाबळींदेखियेलीमूर्ति ॥ तळपतीदीप्तितेजोमय ॥

॥ १ ॥ सांवळेंसुंदरवोंकारवर्तुळ ॥ मध्येंघननळिपाचारि-
तो ॥ २ ॥ सुरंगवोतिलीप्रेमतनुछाया ॥ तेणेंतुझीमाया
कायवानूं ॥ ३ ॥ नामाह्मणेविठ्ठलकरुणाचातुर्या ॥ गुणा-
गुणींक्रियाप्रभादिसे ॥ ४ ॥ ॥ ॥ ६६६ ॥

रूपेंशामसुंदरनीलोत्पलगाभा ॥ सखीयेस्वप्नींशोभादे-
खियेला ॥ १ ॥ नेत्रविशालकमलदंतहिरयाज्योति ॥ स्व-
प्नींमदनमूर्तिदेखियेला ॥ २ ॥ पीतांबरकटितटींचंदनाची
उटी ॥ स्वप्नींजगजेठीदेखियेला ॥ ३ ॥ शंखचक्रगदापद्म
मिरवेकरीं ॥ स्वप्नींगरुडावरीदेखियेला ॥ ४ ॥ शयनशे-
षापृष्ठींनाभींपरमेष्ठी ॥ गंगाशोभेअंगुष्ठींतोम्यांदेखियेला ॥
॥ ५ ॥ विचारितांमानसींनातुडेअहर्निशीं ॥ मनलुब्धलें
त्यासीह्मणेनामा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ६६७ ॥

कोकिळाचित्कळारत्नाचीतेकिळा ॥ माणिकींसोज्वळा
वेणुहरीचा ॥ १ ॥ वृंदावनींवेणुवाजेरुणझुणु ॥ वेधिलात-
नुमनुगोपिकांचा ॥ २ ॥ देहुडापाउलींहरिगोपाळगजरीं ॥
वाहातीतळालोरिहरिछंदें ॥ ३ ॥ वेधलींवनचरेंगोधनेंअ-
पारें ॥ पक्षीकुळेंसाचारेंतल्लीनझालीं ॥ ४ ॥ यमुनेचेंउदक
जळचरेंसम्यक ॥ पाताळींपन्नगेंएकोंठेलीं ॥ ५ ॥
ऐसोंकृष्णवेधेंतल्लीनजहालींबोधें ॥ नामाह्मणेवेणुछंदेंस्थिथ-
रजहालीं ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥६६८॥

लाचावलेंब्रह्मभक्तिचेनीसुखें ॥ तेंगोकुळींगोपाळवेषेंगा-
ईचारी ॥ १ ॥ त्रिभुवनींनसमायब्रह्मादिकांलक्षानये ॥
तेंदास्यकरिताहेगौळियाचें ॥ २ ॥ नवलावगेमायनवलसां-
गूंकैसें ॥ तेंयागोकुळींगोपवेषेंगाईराखी ॥ ३ ॥ शुद्धचैत-

न्यतरीसांवळेंकवण्यासुखेंनाकळे ॥ रजागोकुळींरुळेसांग चतुरानन ॥ ४ ॥ भक्तीच्यानियोगेंभ्रमलेंतेंयागोकुळीं विश्रांतिपावलें॥ तेणंप्रेमसुखदिधलेंनामयासी ॥५॥६६९॥

कंसाहातींविडापाहेचहूंकडा ॥ पूतनात्यापुढाकायबोले ॥ १ ॥ जाईनगोकुळावधीनतयाबाळा ॥ ऐशीत्याचांडाळा बोलियेली ॥ २ ॥ विषेंभरूनिस्तननिघालीपूतना ॥ ती-तेंदेखोनीकान्हादूधमागे ॥ ३ ॥ येउनीयांद्वारींथोकली तंवयशोदादेखिली ॥ कृष्णामाउशीआलीराहेउगा ॥ ४ ॥ तंवअधिकचिआळीकरीवनमाळी ॥ येरीह्मणेदेजवळीपाजी-नदूध ॥ ५ ॥ पूतनेचेवोसंगादिधलासेकान्हा ॥ घट-घटास्तनपानाकरीतसे ॥६॥ सोसियेलेंविषनधायचिभूक ॥ नामयास्वामीराखेप्राणतिचा ॥ ७ ॥ ॥ ६७० ॥

घोंगडेंनोहेधडुतेंमाझें ॥ पांघुरतांवोझेंहोतअसे ॥ १ ॥ घेआपुलेंघोंगडेंदेईमाझापावा ॥ आजुनीकांचाळविसीकेश-वदेवा ॥ २ ॥ विष्णुदासनामाकेशवाविनवी ॥ आहिक्यप-रत्रींनाहींचाडमज ॥ ३ ॥ ॥ ॥ ६७१ ॥

गोंवळेह्मणतीकांहोआह्मांभितो ॥ ब्रह्मादिवंदितोपाय-धुळी ॥ १ ॥ गाईत्रमकरीकळंबाचेतळीं ॥ सिदोरीसोडि-लीदावितसे ॥ २ ॥ हमामाघालितांनयेतीमाघारे ॥ ना-हींभीतपोरेंयेतसंगें ॥ ३ ॥ नामाह्मणेकायभिउनीराहिले ॥ निवांतचिठेलेब्रह्मादिक ॥ ४ ॥ ॥ ॥ ६७२ ॥

बरवेंबरवेंबाळगोजिरवाणें ॥ यशोदाह्मणेदृष्टिहोईलझ-णीं ॥ १ ॥ बरवेंबरवेंडोळससांवळें ॥ लोणउतराहरीचीं पाउलें ॥ २ ॥ चंदनपाटोळाकासेसोनसळा ॥ विष्णुदास

नामाचरणाजवळा ॥ ३ ॥ ॥ ॥ ६७३ ॥

त्रिभुवनींचेंजीवनकींअमरांचेंठेवणें ॥ कैसेंभाग्यलाहाणेंलक्ष्मीचेंतें ॥१॥ धन्यधन्यगौळियांचोंजिणें ॥ ज्याघरींखेवणेंपरब्रह्म ॥ २ ॥ अंगेंखेळवणेंपरब्रह्मगोवळजेणें ॥ लीलासामावणेंरोमरध्रीं ॥ ३ ॥ नामाह्मणेगौळियांदैवेंतेंकारण ॥ झालेंसेखेळवणपरब्रह्म ॥ ४ ॥ ॥ ॥ ६७४ ॥

चंद्रबिंबाचीसरीजरीदेऊंमुखा ॥ कोटिचंद्रप्रभादेखाकृष्णमुखीं ॥ १ ॥ ढवळेंचांदिणेंरांगतांरंगणीं ॥ धन्यवो गौळणीकुशीतुझी ॥ २ ॥ कानींचींकुंडलेंगुरुशुक्रबिंबलें॥ शिरींतेंशोभलेंपिंपळपान ॥ ३ ॥ कंठींवाघनखेंसाजिरींते सरी ॥ कटींकडदोरीशोभतसे ॥ ४ ॥ सुकुमारदोंदिल किंकिणीकटितटीं ॥ चरणींनादउठीनूपुरांचा ॥ ५ ॥ श्रुतिसमागमेंनादऐकेकानीं ॥ संतोषोनीमनींडोलेहरि ॥६॥ देखोनियांमातेहोयसमाधान॥उतरीनिंबलोणमुखावरुनी ॥ ॥ ७ ॥ सच्चिदानंदघनतान्हुलेंआपण ॥ विष्णुदासनामा वंदीचरण ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६७५ ॥

घागरियाछंदेंचरणघवघवी ॥ अरुणदाखवीचरणातळीं ॥ १ ॥ आरुतायेईकान्हादेईआलिंगन ॥ उतरीनिंबलोण मुखावरुनी ॥ २ ॥ वाघनखेंकडदोराकंठींघालुनीसरी ॥ झणींतुजमुरारिदृष्टिलागे ॥ ३ ॥ अंबुलेलोलियाकंठीं रिठेगांठीं ॥ छंदेंजगजेठीहालवीमान ॥ ४ ॥ भाळींचंदनवरीमसीचाटिकला ॥ झणींतुजगोपाळादृष्टिलागे ॥ ॥ ५ ॥ नामयाचास्वामीहरिमाझेंचित्त ॥ सर्वछंदेंगाऊंगीत नाचूंरंगीं ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ६७६

वारीवोदसवंतीआपुलाबाळ ॥ विकटुहाखेळुखेळतसे ॥ ॥ १ ॥धाकुटियामुलाघेतोहाचिमुरे ॥ कायकरावेंधुरेभीत असों ॥ २ ॥ घरींचाह्मातारात्माणितलायेणें ॥ कायसांगूं उणेंतुजपाशीं ॥ ३ ॥ मीलटिकीतरीनामयासीपुसा ॥ तुझाबाळकैसाआसंदत ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ६७७॥

जन्मगेलेंयाचेंराखतांगाई ॥ याचीयाबोलाविश्वासूंकाई ॥ १ ॥ गोधनेंराखितोआपणपेंढारा ॥ तुझेनीमिळती पाणियाचारा ॥ २ ॥ हातींडांगाखांदींकांबळा ॥ तुझ्यागाईआह्मींराखोंगोपाळा ॥ ३ ॥ आठकोटनववहात्तरीगाई ॥ गोधनेंवैसलींआपुलेठाईं ॥ ४ ॥ घालीगोधनेंबैसलींवाडा ॥ संतपाहोआलेतंवझोंपाउघडा ॥ ५ ॥ गोधनेंचरलींवाराही रानें ॥ माझेंमनतुझेंवांसरूंतान्हें ॥६॥ गोधनेंचारितांकृष्ण सांगाती ॥ विष्णुदासनामादेतसेवळती ॥ ७ ॥ ॥६७८॥

संसारपरजनी ॥ दूरदिधलेंमजसाजणी ॥ द्वारकापुरपाटणीं ॥ माझेंमाहियेर ॥ १ ॥ थोरउत्कंठामनीं ॥ वाट पाहेप्रतिदिनीं ॥ मजनेतुकांकोण्ही ॥ तयामाहियेरा ॥ २ ॥ चित्तींनलगतीव्यापार ॥ मनींहेंचिवारंवार ॥ आडठाकले गिरिडोंगर ॥ तयामाहियेरा ॥ ३ ॥ माझियासासुरेंनिष्ठुरें ॥ दुरळबोलतीउत्तरें ॥ तंवतंवमीस्मरे ॥ विठुमाहियेरा ॥४॥ येथेंकोणीनाहींमाझेंएक ॥ जेंत्यासीबोलोंसुखदुःख ॥ हेंमन उतावळदेख ॥ तयामाहियेरा ॥ ५ ॥ कामक्रोधभावेदीर ॥ बोलतीअतिनिष्ठुर ॥ तेवेळींसंसार ॥ त्यजिजेऐसेंहोयमनातें ॥ ६ ॥ येवोसंसारनासिजे ॥ संगुआवघाचिसांडिजे॥ निःसंगहोउनीयाराहिजे ॥ तयामाहियेरा ॥ ७ ॥ यावो-

प्राणाचेसंकटीं ॥ आत्माठेउनीयाकंठीं ॥ मगचालवीघररा-
हाटी ॥ कामह्मणियेरात्रंदिवस ॥ ८ ॥ याचेंक्रूरबोलणेंरा-
हाती ॥ तेणेंमीअसेंनिर्बुजलेंचित्तीं ॥ निरोपधाडूंकवणाहा-
तीं ॥ तयामाहियेरा ॥ ९ ॥ तंवाचिशिणिजे ॥ जंवयातेंन
वोळंगिजे ॥ याचेनिपाविजे ॥ नामयेकें ॥ १० ॥ आतां
बहुकायबोलिजे ॥ यासीसविळानपुसिजे ॥ पुण्यमार्गेंजाई-
जे ॥ तयामाहियेरा ॥ ११ ॥ माझ्रासिखभिक्ति ॥ मजतेचि
संवोखिती ॥ तयालाविलेंशुद्धमति ॥ साहेतेंमजचुकोंनेदी
॥ १२ ॥ सत्यभावोसांगाती ॥ येरलटिकीयाविल्पात्ति ॥
मीवोजाईनहरिखेजती ॥ तयामाहियेरा ॥ १३ ॥ कृष्णमा-
उलीभेटेल॥शिणुआवघाचिहारेल ॥ सुखआनंदुनमायील ॥
त्रिभुवनीं ॥ १४ ॥ याबहुजन्मांचाशीणहोजाईल ॥ विठो-
दर्शनेंदुःखहारेल ॥ नामासुखीयाहोईल ॥ केशवच-
रणीं ॥ १५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६७९ ॥

अरेअरेकान्हयावेल्हाळा ॥ तूंरेबरावियागोपाळा ॥ तुज
देखतांचिडोळा ॥ धेनुवाहंवरती ॥ १ ॥ मातेदेवोमजशि-
दोरी ॥ ऐसेंह्मणतसेमुरारि ॥ मीजाईनवोदूरी ॥ धेनुचा-
रावयालागीं ॥ २ ॥ आलेंबेलेंचिलेंनिकें ॥ सुरणमीरेगोडी
पैंतिखें ॥ दह्यावांचुनीन्हेनिकें ॥ शिदोरीताकेंकालवूनि-
कें ॥ ३ ॥ वडजावाकुडापेंधासुदामा ॥ हेचिपांथीकरतेथेंआ-
ह्मा ॥ तेथेंविष्णुदासनामा ॥ उच्छिष्टशितेंवेंचितो ॥४॥६८०

ब्रह्मादिकांपहातांठकपडियलें ॥ पाहतांकैवल्यगोळि-
याजोडलें ॥१॥ कोण्याऋणेंहाकेलानकळे ॥ परब्रह्मआमुचें
आहेसांवळें ॥ २ ॥ यागोकुळाचेनीपाडेंपहातां ॥ सुखवैकुं-

ठींनदिसेसर्वथा ॥ ३ ॥ ऐसाअभिनवआनंदजाणतो ॥
गोकुळींचेंतृणतरुतरीहोतो ॥४॥ कामलोभलावियेलायेणेंनि
वे ॥ तेणेंसुखशुद्धिलागलीतेसवे ॥५॥ नामयाचास्वामीहृदईं-
चाविसावा ॥ आमुचेंसर्वस्वदेऊनीजोडावा ॥६॥ ॥६८१॥

वेणुवाहूनिचित्तदुहिलें ॥ रूपदाउनीमजमोहिलें ॥ १ ॥
वेधींवेधकगोपाळलाघवी ॥ जीवालावियेलीआवडीनिच
नवी ॥ २ ॥ दृष्टीपुढेंमाझ्याध्यानठेविलें ॥ वृत्तिसहितम-
नतेथेंगोविलें ॥ ३ ॥ शुद्धशामकमलदललोचनु ॥ पावा-
वाहतुसेदेहुडारुणुझुणु ॥ ४ ॥ तयाप्रभादिसतीनिर्मळ ॥
कृष्णपाहतांजगझालेंआपण ॥ ५ ॥ नामयास्वामीचेंअनु-
पम्यरूपडें ॥ पहातांमनमुरडेनामागारें ॥ ६ ॥ ॥६८२॥

चिदानंददोंदिलबाळसांवळें ॥ कृष्णपाहतांनयनींमन
मावळे ॥ १ ॥ तेंसुखकवणेंवाचेंबोलिजे ॥ चित्तसमरसें
भोगिजे ॥२॥ परापरतलीपश्यंतीतन्मये ॥ मध्यमावैख-
रीपावलिये ॥३॥ आलिंगनालागुनीबाह्यास्फुरती ॥ देहन
दिसेपहातांकृष्णमूर्ति ॥४॥ तेथेंआरतीचाआनंदलोटला ॥
तोहाकृष्णरूपेंआनंदगोठला ॥ ५ ॥ नामयाचास्वामीस-
बाह्याभ्यंतरीं ॥ गेलेरसरंगगोकुळाभीतरीं ॥ ६ ॥ ६८३॥

पैलपहाहोपरब्रह्मभुललें ॥ जगदीशकांपरतंत्रझालें ॥
॥ १ ॥ कायसुखकेलेंयेणेंनेणिजे ॥ कोणभाग्यगौळियाचें
नवर्णिजे ॥ २ ॥ आदिअंतुनाहींजयाव्यापका ॥ मायाउ-
खळींबांधिलादेखा ॥ ३ ॥ सर्वसुखाचेंसुखनिर्मळ ॥ कैसें
दिसताहेश्रीमुखकमळ ॥ ४ ॥ योगीहृदयकमळींचेंहेंनिधा-
न ॥ दृष्टिलागेलगेउतरानिंबलोण ॥५॥ नामयास्वामीपर-

ब्रह्मपुतळा ॥ तनुमनाचीकुर्वंडीवोवाळा ॥ ६ ॥ ॥६८४॥
चिदानंददोंदिलबाळडोळस ॥ कृष्णखेळवितांनिवेमानस ॥ १ ॥ सयेआनकांहींयाजीवानावडे ॥ चित्तविगुंतलें यासुखींतेंनानिवडे ॥ २ ॥ देहागेहाआठवणनाहींसर्वथा ॥ स्थितिबाणलीसहजरूपपाहतां ॥३॥ तेजसांवळेंदृष्टीसकोंदलें ॥ तेणेंप्रकाशेंसबाह्यवेधलें॥४॥नामयाचास्वामीआदिपरंपरा ॥ आवडतांआपणासोयरा ॥ ५ ॥ ॥ ॥६८५॥
यशोदेचाबाळआलगट ॥ रूपेंराजसवरवियाबरवंट॥१॥ वेधलाउनीवेधिलेंयेणेंमानस ॥ आडघालुनीआपुलास्वयंप्रकाश ॥२॥ आपणाशींचखेळेविनोदें ॥ विश्वनिववीतेणेंसुखेंनिजबोधें ॥ ३ ॥ दृष्टियाचेपावेदेखोनीया ॥ आडरिघोनि तेजसांवळेंभरलेंडोळया ॥४॥ मनमुरोनीआर्तपुरविलें ॥ रूपदाउनीचित्तभुलविलें ॥५॥ नामयाचास्वामीआसनींशयनीं ॥ दूरीनवजेडोळियांपासोनी ॥ ६ ॥ ॥ ॥६८६॥
कृष्णअनुरागेंरंगलीकामिनी ॥ कामधामगेलीविसरुनी ॥ १ ॥ होतीबहुतजन्मींशिणली ॥ आपनाठवेपरसुखेंमिनली ॥ २ ॥ मनींकरूनीजायविषयसंकल्प ॥ तंवतेंआवघें होयकृष्णरूप ॥ ३ ॥ दृष्टिदेखणेंजेंजेंआवडे ॥ वेणुवाहेतेथेंउभेंदेहुडें ॥ ४ ॥ सुखशयनींस्वप्नींदेखेसांवळा ॥ कंठीं कौस्तुभवरीरुळेवनमाळा ॥ ५ ॥ जीवेंधाउनीआलिंगीप्रीतीं ॥ तंवतीआरतीहोयकृष्णमूर्ती ॥६॥ देहपरतोनिमागुतींसांभाळी ॥ तंवस्वयंसिद्धआपणचिवनमाळी ॥ ७ ॥ नामयाचास्वामीजिवींचाजीवलग ॥ कृष्णसुखाचासुखबोध अनुराग ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥६८७॥

चिदानंदघनचिन्मयबाळकृष्ण ॥ खेळवितांमनहोयउन्मन ॥१॥ सुखअनुभवींअनुवादखुंटला ॥ विश्वंभरतोचिअनुवादगोठला ॥२॥ दुर्जनदिसेउपमेसीद्यावया॥ मननामिळे आनसुखघ्यावया॥३॥ज्ञाताज्ञानज्ञेयहेंचिअद्वय॥ध्याताध्यानध्येयहेंचिनिरामय॥४॥ जन्मोजन्मींचेंपुण्यसांचित ॥ झालें गौळियाचेंकार्यमूर्तिमंत ॥ ५ ॥ नामयास्वामीचीअनुपम्य आवडी ॥ चित्तेंदिलीप्रेमरसींबुडी ॥६॥ ॥ ६८८ ॥

चिदानंदचिद्रूपचित्ततन्मय ॥ बाळयशोदेचेंआनंदअद्वय ॥ १ ॥ सत्यअभिनवसुखयाच्यादर्शनीं ॥ मिठीपडलीपह्यातांरूपनयनीं ॥ २ ॥ दृष्टीचियाआडडोळियारिघोनी ॥ तनुमनासीकेलीभुलवणी ॥ ३ ॥ अंतरबाहेरींनिज सुखवावरे ॥ नित्यनूतनजीवजीवपणाविसरे ॥ ४ ॥ अरूपींरूपसकळोंआलें ॥ गोपीगोपाळाधेनुवत्साभुलविलें॥ ॥५॥ नामयाचास्वामीआनंदउदधि ॥ माजींबुडोनीगेलीदेहबुद्धि ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६८९ ॥

धन्यगोकुळमहीतळींमंडन ॥ सुखावलेंब्रह्मझालेंतेथेंसगुण ॥ १ ॥ कायनकळेआवडीत्याचाभाव ॥ सुखनेलेंरे गोवळियेंह्मणतीदेव ॥ २ ॥ ध्रु० ॥ आलेवैकुंठभुवनींविकृति ॥ तेहींपह्यावीगोकुळींचीविश्रांति ॥ ३ ॥ योगियाचे ध्यानींउबगलें ॥ तेंयागौळियाचेअनुरागीरंगलें ॥ ४ ॥ वेदश्रुतीसींपारूनकळे ॥ कोणसुखसर्वांहुनीआगळें ॥ ॥ ५ ॥ नामयाचास्वामीआमुचेंकुळदैवत ॥ शरणजाउनी गौळियामागुंउचित ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥६९०॥

कृष्णडोलतुरांगतुरंगणीं ॥ इडापिडाधाउनीघेतगौळ-

णी ॥ १ ॥ जीवापरिसहेंवाल्हेंबाळक ॥ शिणलियाविसा-
वायाचेंश्रीमुख ॥ २ ॥ सर्वसुखयाचेनिमनोहरें ॥ तेंचि
खेळवितांधणीमनानपुरे ॥ ३ ॥ देहगेहनाठवेसर्वथा ॥ सु-
तपतीचीमावळलीवार्ता ॥ ४ ॥ सुखनसांगवेवैखरीकोंद-
ली॥रूपींरमतांमनेंबुडीदिधली ॥५॥ नामयाचास्वामीसुखा-
चासागरु ॥ कृष्णखेळवितांसुफळसंसारु ॥ ६ ॥ ६९१ ॥

चालसखेवेगुकरीवाहिला ॥ दिनसरलाकाळुथोडाउर-
ला ॥ १ ॥ आवडींघेऊंगेहरिसुखधणीचें ॥ आर्तपुरवुनी
जेंउरलेंमनींचें ॥ २ ॥ कृष्णमुखपाहेंदृष्टीभरुनी ॥ चित्त
सांडूंकुर्वंडीकरुनी ॥३॥ झणींविसरसीहेंसुखानिरुतें ॥ मग
अंतरेलसर्वसुखपुढतें ॥ ४ ॥ हाचिनिर्धारकरुनीमानसीं ॥
आंतबाहेरींहरिरूपदेखसी ॥ ५ ॥ नामयाचास्वामीराजीव-
लोचनु ॥ रमारमणुतोचिजीवींचाजीवनु ६ ॥ ॥६९२॥

श्रीमुखसुंदरवाटोळें ॥ कैसेंनीलोत्पलसांवळें ॥ १ ॥
पैलसंधींगडीधाकुटा ॥ होयघोंगडेंखांदामोठा ॥ २ ॥ थी-
खांसुरेंहोकरी ॥ पुढेंवाहतीपोवामोहरी ॥३॥ हातींघेउनी
वेताटी ॥ कैसालागेवांसुरांपाठीं ॥ ४ ॥ बाळगोपाळसहित
मुरारि ॥ खेळुखेळेनानापरी ॥५॥ विष्णुदासनामयाचादा-
तारु ॥ ब्रह्मादिकानकळेत्याचापारु ॥ ६ ॥ ॥६९३॥

मल्हारमेहुडेंगगनींदाटलें ॥ विजुमेळेंगाजिन्नलेंगेमाय॥
॥ १ ॥ गोविंदपावयालोरि ॥ कैसेंवरुषताहेमधुरधारींगे
माये ॥ २ ॥ आनंदेंमयोरेंनाचतीअपैसे ॥ प्रेमेंनीळकंठ
झालेकैसे ॥३॥ नामयाचास्वामीदृष्टिसोज्वळ ॥ जीवींरात-
लागोपाळगेमाये ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥६९४॥

अमराचेंठेवणेंविश्वाचेंजीवन ॥ सौभाग्यलावण्यरुक्माईचें ॥ १ ॥ धन्यगौळियांचेंजिणेंकृष्णबाळपणें ॥ यशोदानंदनक्रीडाकरी ॥ २ ॥ अंगेंस्थूळपणेंब्रह्मगोळायेणें ॥ लीलासामावणेंरोमरंध्रीं ॥३॥ विष्णुदासनामादैवेंचिलाहाणें॥ ज्याघरींखेळवणेंपरब्रह्म ॥ ४ ॥ ॥ ॥ ६९५ ॥

परब्रह्मविश्वाकारेंअवतरलेंभक्तिकाजा ॥ मूर्तिसांवळीसुनिळकेशीराजस्वामीमाझा ॥ १ ॥ गोविंदारेंतुझेंध्यानलागोमना ॥ पाविजेपदनिर्मळहोईजेध्याना ॥ २ ॥ मनहेंवोवरीअसेसुमनाचेंचित्रसाळीं ॥ दोन्हीचरणसुकुमारअसेअष्टकमळीं ॥ ३ ॥ संध्यारागरातलेसुनिळदिशातळवटीं ॥ ध्वजवज्रांकुशचिन्हेंसाजतीगोमटीं ॥ ४ ॥ इंद्रादिकथोकलेजिच्यासुखानाहींपारु ॥ तेचरणींस्थिरझालीह्मणोनह्मणतीलक्ष्मीवरु ॥ ५ ॥ घवघवितवांकीचरणींब्रिदाचातोडरु ॥ नखप्रभाफांकलीतेणेंलोपलादिनकरु ॥ ६ ॥ सृष्टिघडीमोडीतउत्पत्तिस्थिति ॥ नयेतोचतुर्मुखब्रह्माचरणवंदिती ॥ ॥ ७ ॥ देवाधिदेवशंभुकैलासींचाराणा ॥ गंगामुगुटींधारिलीतिचाजन्मअंगुष्ठींजाणा ॥ ८ ॥ दैत्यकुळींजन्मलादेवपळतीज्याचेधाकें ॥ पावोपाठीसीलागलाह्मणोनिदारवंटाराखे॥ ॥ ९ ॥ शेषवर्णितांश्रमलावेदपरतलामाघारीं ॥ नामाह्मणेअरेजनाचरणधराझडकरी ॥ १० ॥ ॥ ॥ ६९६ ॥

विटेवरीसमचरणसुंदर ॥ बाळसुकुमारयशोदेचें ॥१॥ वाळेवाकीगर्जतीतोडरचरणीं ॥ नादझणझणींवाजताती ॥ ॥ २ ॥ कासेकासिलापीतांबर ॥ लोपलादिनकरतेणेंप्रभा॥

॥ ३ ॥ नामाह्मणेनाहींतुझ्यारूपापार ॥ तेथेंमीर्किंकरका-
यवानूं ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥६९७॥

डोहामीजीवासहोतोंबहुतदिवस ॥ आतांकासाविस
कायसांगूं ॥ १ ॥ त्रिकाळहोउनीआलाचक्रपाणी ॥ का-
ळियानिर्वाणीध्यानकरी ॥ २ ॥ नकाकरूंमजउदकाबाहे-
री ॥ दंडवतकरीकाळियातो ॥ ३ ॥ नामाह्मणेऐसाकाढि-
लाविखारी ॥ कीर्तिवानूंतरीकितीदेवा ॥ ४ ॥ ॥६९८॥

तिन्हीदेवजैसेपरब्रह्मींचेठसे ॥ जगींसूर्यजैसेप्रकाशले ॥
॥ १ ॥ धन्यतोनिवृत्तिधन्यतोसोपान ॥ धन्यहानिधान
ज्ञानदेव ॥२॥ उपजतांचिज्ञानीहेंवर्मजाणोनी ॥ आलेलो-
टांगणींचांगदेव ॥ ३ ॥ संस्कृताचीगांठीउघडोनीज्ञानदृ-
ष्टीं ॥ केलीसमराठींगीतादेवी ॥ ४ ॥ प्रत्यक्षपैठणींभेटीं
केलावाद ॥ रेड्यामुखींवेदबोलविला ॥ ५ ॥ नामाह्मणे
सर्वसुकृतेंलाहिजे ॥ एकवेळांजाईजेआलकापुरां॥६॥६९९॥

आळंदीहेंगांवपुण्यभूमिठाव ॥ दैवताचेंनांवसिद्धेश्वर ॥
॥ १ ॥ चौऱ्याशींसिद्धांचासिद्धभेटीमेळा ॥ तोसुखसोहळा
कायवानूं ॥ २ ॥ विमानांचीदाटीपुष्पांचावरुषाव ॥ स्व-
र्गींहूनिदेवकारिताती ॥३॥ नामाह्मणेदेवाचलातयाठाया ॥
विश्रांतिध्यावयाकल्पवरी ॥ ४ ॥ ॥ ॥७००॥

वेदाचेंपैंसारानीमिलीपैंगीता ॥ तिचाअर्थचित्ताअसों
द्यावा ॥ १ ॥ संस्कृतभाषाजगासीकळेना॥ह्मणोनिनाराय-
णासंकटपडलें ॥ २ ॥ देवाजीनेंत्वरेंघेतलाअवतार ॥ ह्म-
णतीज्ञानेश्वरतयालागीं ॥ ३ ॥ गीताशोधोनियांअर्थतो
काढिला ॥ ग्रंथआरंभिलाज्ञानेश्वरी ॥ ४ ॥ ज्ञानेश्वरीग्रंथ

साराहुनीसार ॥ फोडिलेंभांडारवैकुंठींचें ॥ ५ ॥ नामाह्मणेमाझाज्ञानराजप्राण ॥ तयाचेचरणवंदीनमी ॥६॥७०१॥

पंढरीचेंप्रेमआहेज्याचेजीवीं॥ त्याचीनित्यनवीकरीनआशा ॥१॥ तेमाझेसोइरेसुखाचेसद्गुरु ॥ भवसिंधुपारुउतरिते ॥२॥ माझ्याविठोबाच्यानामींज्याविश्वास ॥ होईनत्याचा दासआवडीचा ॥३॥ माझ्याविठोबाच्याचरणींज्याचाभाव ॥ दारवंटापावधरीनत्याचे ॥४॥ माझ्याविठोबाचेंध्यानज्याचे मनीं ॥ सांडोवाअंगणींहोईनत्याचे ॥५॥ ऐसेंसर्वभावेंविठोबासीशरण ॥ वंदीनत्यांचेचरणह्मणेनामा ॥६॥ ॥७०२॥

पंढरीच्यासुखापारनाहींलेखा ॥ शेषासहस्त्रमुखानवर्णवे ॥१॥ पंढरीच्यासुखानाहींअधिकारी ॥ जन्मोजन्मींवारीघडलीजया॥२॥ पंढरीसीजातांप्रेमउचंबळत ॥ आनंदेंगर्जतनामघोष ॥३॥ विश्वंभरविठोविश्वमूर्तिदेखे ॥ विसरलादुःखेंदेहभाव ॥४॥ नामाह्मणेत्याचेहोईनचरणरज ॥ मगनुपेक्षील मजपांडुरंग ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ७०३ ॥

पंढरीचीवारीजयाचीयेकुळीं ॥ त्याचीपायधुळीलागो मज ॥ १ ॥ तेणेंत्रिभुवनींहोईनसरता ॥ नलगेपुरुषार्था मुक्तिचारी ॥ २ ॥ नामाचीआवडीप्रेमाचाजिव्हाळा ॥ क्षणेंजीवावेगळानकरीत्यासी ॥ ३ ॥ नामाह्मणेमाझासोयराजीवलग ॥ सदापांडुरंगतयाजवळी ॥ ४ ॥ ७०४ ॥

भक्तआवडताभेटला ॥ बोलूंचालूंविसरला ॥ १ ॥ वरें सांपडलेंवर्म ॥ कराभागवतधर्म ॥ २ ॥ हरिहाभावाचालंपट ॥ सांडोनीआलासेवैकुंठ ॥ ३ ॥ संतसंगतींसाधावा ॥ धरुनीहृदयींबांधावा ॥ ४ ॥ चरणधरावेनिकट ॥ उ-

गाचनकरावाबोभाट ॥ ५ ॥ नामाह्मणेकेउताजाय ॥ आ-सुचेगळांत्याचेपाय ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥७०५॥

होईनसंतांचावोळंगणा ॥ दासाडिंगरपोसणा ॥ १ ॥ प्रेमदेईनारायणा ॥ भूतदयापरिपूर्णा ॥ २ ॥ संतचरणींचें रज ॥ तेंचिसर्वतीर्थबिज ॥ ३ ॥ सेवीसंतउष्टावळी ॥ ते-णेंपवित्रआमुचीकुळि ॥ ४ ॥ राखेंसंतांचेंमीद्वार ॥ तेंमज वैकुंठाहूनिथोर ॥ ५ ॥ नामाह्मणेपंढरीनाथा ॥ आणीक नमगेंगासर्वथा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥७०६॥

आह्मावैष्णवांचाकुळधर्मकुळींचा ॥ विश्वासनामाचास-र्वभावें ॥ १ ॥ तरींचहरिदासह्मणवितांश्लाघिजे ॥ निर्वा-सनाकिजेचित्तआधीं ॥ २ ॥ गाऊंनाचूंप्रेमेंआनंदेंकीर्तनीं ॥ भुक्तिमुक्तिदोनीनमगोंदेवा ॥ ३ ॥ वृत्तिसाहितमनबुडेप्रेम-डोहीं ॥ नाठवतीदेहींदेहभाव ॥ ४ ॥ सगुणनिर्गुणएकचि आवडी ॥ मनेंदिलीबुडीचिदानंदीं ॥५॥ नामाह्मणेदेवाऐशी-याचीसेवा ॥ द्यावीजीकेशवाजन्मोजन्मीं ॥६॥ ॥७०७॥

संताचेचरणींद्यावेंआलिंगन ॥ जीवेंनिंबलोणउतरावें ॥ ॥१॥ तेथेंतूंनिश्चळराहेमाझेमना ॥ मगतुजयातनानहोती-ल ॥ २ ॥ संताचेद्वारींचेंहोयद्वारपाळ ॥ तुटेमायाजाळमो-हपाश ॥ ३ ॥ संताचेप्रसादसेवेसीउरले ॥ आयुष्यसरलें दुणावलें ॥ ४ ॥ नामाह्मणेसंतआहेतकृपासिंधु ॥ देतीभ-क्तिबोधुप्रेमसुखें ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥७०८॥

वैष्णवाचेघरींमांडिलापाहुणेर ॥ नामाचावोगरमांडियेला ॥ १ ॥ घ्यारेताटभरीजेवाधणीवरी ॥ आनंदगजरीं

राममनाम ॥ २ ॥ होईलपायरवदुर्जनानसांगावें ॥ येकां-
तींसेवावेंनामाह्मणे ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥७०९॥

निंदीलहेंजनसुखेंनिंदूंद्यावें ॥ सज्जनींक्षोभूंनयेबापा ॥
॥ १ ॥ निंदास्तुतिज्यालासमानपैंझाली॥भावेंत्याचीस्थिति
आलीसमाधीसी ॥ २ ॥ शत्रुमित्रज्यालाहोतीसमानत्वें ॥
तोचिपैंदेवातेंआवडला ॥ ३ ॥ मातीआणिसोनेंज्याभासे
समान ॥ तोयेकनिधानयोगीराज ॥ ४ ॥ नामाह्मणेभक्त
ऐसेजेअसती ॥ तेणेंपावनहोतीतिन्हीलोकीं ॥ ५ ॥७१०॥

क्रियाकर्मधर्मतिहींकेलेंसांग ॥ जिहींपांडुरंगधरियेला ॥
॥ १ ॥ वोळखोनीमनेंधरिलामानसीं ॥ उभाअहर्निशींहृद-
यकमळीं ॥ २ ॥ निजानंदबोधेंनामाचेनीछंदें ॥ डोलती
आनंदेंवोसंडत ॥ ३ ॥ नाहींदेहस्मृतिदेहाचीवासना ॥
मावळलीकल्पनाभावाभाव ॥ ४ ॥ अखंडविदेहीरजतमा-
वेगळे ॥ भोगतीसोहळेप्रेमसुख ॥ ५ ॥ त्याचियादारींचा
होईनसांडोवा ॥ ह्मणोनिकेशवापाढियेनामा ॥ ६ ॥७११॥

निवृत्तिज्ञानदेवसोपानमुक्ताबाई ॥ ह्मणतीज्ञानकाईक-
थोनियां ॥१॥ भक्तिबळेंयेणेंदेवपैंजिंकिला ॥ ऋणाईतकेला
सेवाऋणें ॥ २ ॥ धन्यतेभाविकनामाआणिकबीर ॥ रोहि-
दासचांभारबहिरापिसा ॥ ३ ॥ त्याचीपायधुळीवंदितांक-
पाळीं ॥ वंशवोसमुळींउद्धरती ॥ ४ ॥ नामाह्मणेमुक्ताबाई
ऐकवोस्पष्ट ॥ भक्तिविणश्रेष्ठआणिकनाहीं ॥ ५ ॥ ७१२ ॥

जायाचेंसाउलेंजायाचीहेचोळी ॥ जायाचीगरसोळीतो-
डरजाणा ॥ १ ॥ जिणेंहेंजायाचेंनाहींपैंराहायाचें ॥ पैलहें
कोणाचेंदेणेंआहे ॥ २ ॥ जायाचाआचारजायाचाविचार ॥

जायाचाभ्रतारक्षणभरी ॥ ३ ॥ नामाह्मणेअवघोंजिणेंतेंजा-
याचें ॥ संतसंगतीचेंसुखघ्यावें ॥ ४ ॥ ॥ ७१३ ॥

आलावैष्णवांचामेळ ॥ पळोंलागलेकळिकाळ ॥ १ ॥
कल्मषासीपाडियेलाधाक ॥ तेंहीदेऊंनशकेहाक ॥ २ ॥
ज्यांच्यादर्शनेंमुक्तहोती ॥ जन्ममरणातेंचुकती ॥ ३ ॥
पैलनामाकेशवाचा ॥ संगेंभारवैष्णवांचा ॥ ४ ॥ ७१४ ॥

सांडोनीनित्यकर्म ॥ बोलतीकळिकाळाचेंवर्म ॥ १ ॥
नामधारकनामाचें ॥ आलेडिंगरकेशवाचे ॥ २ ॥ टाळमृ-
दंगवाजती ॥ गरुडटकेपताकाशोभती॥३॥ कंठींतुळसीच्या
माळा ॥ वज्रपंजराचाटिळा ॥ ४ ॥ संतरजउधळले ॥
तेणेंसर्वांगडौरलें ॥ ५ ॥ शंखचक्रमुद्रांचेंधारण ॥ अंगीं
मिरवतीभूषण ॥ ६ ॥ सहस्त्रनामेंगर्जत ॥ तेणेंपळाले
यमदूत ॥ ७ ॥ नामाह्मणेतेमाझेसखे ॥ स्वामीविठोबा-
सारिखे ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ७१५ ॥

धन्यनरदेहसंतसंगकरीं ॥ त्रैलोक्यउद्धरीहेळामात्रें ॥
॥ १ ॥ नेणेंसुखदुःखशरीराचेंभान ॥ अखंडभजनकेशवा-
चें ॥ २ ॥ कर्मकरुनीयाहोयशुचिष्मंत ॥ नामामृतपीत
सर्वकाळ ॥ ३ ॥ नामाह्मणेऐसेवर्ततेंदेहभावीं ॥ मूढजना
दावीभक्तिमार्ग ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ७१६ ॥

येतांजातांथोरकष्टलोंगर्भवासीं ॥ पडिलोंगाउपवासीप्रे-
मेंविण ॥ १ ॥ बहुतांचासेवकझालोंकाकुलती ॥ नपवती
विश्रांतितयाचोनि ॥ २ ॥ ऐसेंमाझेंमनासिणलेंनानापरी ॥
वालीनआभारींसंताचिया ॥ ३ ॥ वियोगेंसंताच्याव्याकु-
ळचिंतातुर ॥ हिंडेदारोदारदीनरूपें ॥ ४ ॥ परिकोणीसं-

ताच्यानघालितीचरणीं ॥ तळमळीअनुदिनींश्रांतसदां ॥ ॥ ५ ॥ माझेंमाझेंह्मणोनिजयाघालीमिठी ॥ दिसेतेंचिदिठींनाहींहोय ॥ ६ ॥ तयाशोकानळेंसंतप्तआंदोळे ॥ गेलेंतें नमिळेकदांकाळीं ॥ ७ ॥ नदेखतठायींदेखावयाधांवे॥भ्रांतिभुललेभावेंनानामार्गीं ॥ ८ ॥ तुझास्वरूपानंदुनाहीं वोळखिला ॥ झालीतेविठ्ठलाहानीथोर ॥ ९ ॥ लोहाचाकवकुलागलापरिसातें ॥ पढियेसर्वांतेंहोयजेवीं ॥ १० ॥ नामाह्मणेतैशीभेटीसंतचरणीं ॥ करुनीत्रिभुवनींहोईनस रता ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ७१७ ॥

कृपेचाकोंवळारघुनाथदास ॥ धरीत्याचीकाससर्वभावें ॥ १ ॥ सांडुनीसर्वसंगहोईनशरणांगतु ॥ करीतूंमनोरथु पूर्णमाझे ॥२॥ भवसिंधूचापारउतरुनीनिर्धारीं ॥ त्यापरतींसोयरींनाहींसृष्टीं ॥ ३ ॥ अंतरींचेंगुजसांगतीश्रवणीं ॥ अमृतसंजीवनीरामनाम ॥ ४ ॥ तेणेंत्रिविधतापहरतीमनींचे ॥ जाणतीजिवींचेझालेकष्ट ॥ ५ ॥ तोजिवलगजननीपरिसलोभापरू ॥ सर्वस्वउदारुप्राणसखा॥६॥नामत्याचेबळेंझुंजेलयमाशीं ॥ रिघोनिपाठीसीकेशवाच्या॥७॥७१८

भक्ताचेंलक्षणवोळखावीखुण ॥ जोदिसेउदासीनदेहभावा ॥ १ ॥ सततअंतरींप्रेमाचाजिव्हाळा ॥ वाचावसेचाळा रामकृष्ण ॥ २ ॥ त्यासंताचेचरणदेखिलियादृष्टीं ॥ जळतीकल्पकोटीपापराशी ॥ ३ ॥ जयाचेहृदयींप्रेमाचाजिव्हाळा ॥ जीवेंत्यागोपाळानविसंबती ॥ ४ ॥ त्याचेअंगणींचाहोईनसांडोवा ॥ मगतूंकेशवानुपेक्षिसी ॥ ५ ॥ तुझे ध्यानींसदाज्याचेंभरलेंमन ॥ विश्वतूंचिह्मणोनभजतीभा-

वें ॥ ६ ॥ त्याचेउच्छिष्टाचाहोईनमागता ॥ तरीचपंढरी-
नाथाभेटदेसी ॥ ७ ॥ ऐसेनित्यानंदेंनिजबोधेंनिवाले ॥
त्यासीभेटवीवाहिलेंनामाह्मणे ॥ ८ ॥ ॥ ॥७१९॥

धन्यतोचिदेशजेथेंसंतवास ॥ तापत्रयदोषजातीसत्य॥
॥ १ ॥ धन्यमातापिताउभयकुळशुद्धता ॥ तोचिभजेसंतां
निर्धारेंशीं ॥ २ ॥ तीर्थरूपजळविलेंबेंकरीनिर्मळ ॥ संत-
दरुशनेंतात्काळशुद्धहोती ॥ ३ ॥ धातुमयमूर्तिचिरकाळें
फळती ॥ संतांचेसंगतींनिजस्वार्थ ॥ ४ ॥ नामाह्मणेमुक्ति
जेनरइच्छिती ॥ तेसंताचेसंगतींधरितीभाव ॥ ५ ॥७२०॥

तोचिपुराणीकजोहोयकृतार्थ ॥ विषयींविरक्तविधिपा-
ळी ॥ १ ॥ मानींतोहरिदासज्यानामींविश्वास ॥ सर्वस्वें
उदासदेहभावीं ॥ २ ॥ नामाह्मणेऐसेसंतभेटावेगादेवा ॥
त्यालागींकेशवाहृदयफुटे ॥ ३ ॥ ॥ ॥७२१॥

सकळसंतजनदेखोनीनयनीं ॥ टाळियापिटूनीगाती
नाम ॥ १ ॥ ह्मणतीधन्यहानिधडावैष्णव ॥ ब्रह्मादिकांमा-
वनकळेयाची ॥ २ ॥ कैसाऋणियायेणेंकेलापंढरीनाथ ॥
आहेसदोदिततयाचेजवळीं ॥ ३ ॥ पूर्वीप्रल्हादश्रवणींऐ-
किला ॥ किंवाहादेखिलासंतांमध्यें ॥४॥ नामायेऊनियांच-
रणासीलागला ॥ हृदयींआलिंगिलाभक्तराज ॥५॥ ७२२॥

संतसमागमेंचालेदळभारु ॥ आशातृष्णादेशधडीअहं-
कारु ॥ १ ॥ दुमदुमीतनिशाणवाजे ॥ आलेश्रीरघुनाथ
अयोध्याराजे ॥ २ ॥ भक्तभद्रजातिदोहींबाहींचालती ॥वि-
ष्णुदासनामाकीर्तिवाखाणीत ॥ ३ ॥ ॥ ॥७२३॥

माझेमायबापसाधुसंतजन ॥ माझेजीवप्राणअंतरींचे

॥ १ ॥ भवभयाहूनीतारियेलेंमज ॥ भाळेभोळेगुजप्रेमदावी ॥ २ ॥ रंकाहुनीरंकझालोंमीसेवक ॥ देवब्रह्मादिकइच्छितीसुख ॥ ३ ॥ नामाह्मणेसंतभाग्यअलोलिक ॥ शुद्ध निष्कलंकपुण्यरूप ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥७२४॥

गौतमवसिष्ठआणिविश्वामित्र ॥ भारद्वाजअत्रीकश्यपादि ॥ १ ॥ बळिहनुमंतबिभीषणनळ ॥ दुष्टअजामेळवाल्हाश्रेष्ठ ॥ ३ ॥ उद्धवअर्जुनअंगदअगस्ती ॥ सर्वांभूतीं भक्तिभावऐक्य ॥ ३ ॥ नामाह्मणेसदासाधुसंतजन ॥ जनींजनार्दनआत्मायेक ॥ ४ ॥ ॥ ॥ ७२५ ॥

वैष्णवाघरींसर्वकाळ ॥ सदांझणझणितीटाळ ॥ १ ॥ कण्याभाकरीचेंखाणें ॥ गातीरामनामनाणें ॥ २ ॥ वैसावयासीकांबळा ॥ द्वारींतुळशीरंगमाळा ॥ ३ ॥ घरींदुभे कामधेनु ॥ तुपावरीतुळसीपानु ॥ ४ ॥ फराळासीपीठलाह्या ॥ वेळोवेळांपडतीपाया ॥ ५ ॥ नामाह्मणेनलगेकांहीं ॥ चित्तरंगलेंहरीचेपायीं ॥ ६ ॥ ॥ ॥७२६॥

सुखाचासुखतरूसद्गुरुखेंचरू ॥ स्वरूपसाक्षात्कारुदाखविला ॥ १ ॥ विठ्ठलपहातांमावळलेंमन ॥ ध्यानेंभरलेंतनतन्मयझालें ॥ २ ॥ मीमाझेंहोतेंतेंमजमाजीनिमालें ॥ जळींजळगिळिलेंजयापरी ॥ ३ ॥ जेथुनीआनंदुवोळला परमानंदु ॥ नाम्याझालाबोधुविठ्ठलनामें ॥ ४ ॥ ७२७ ॥

देवासन्मुखदीपमाळा ॥ दोन्हीभक्तवोउजळा ॥ १ ॥ तेलघालारेफारसें ॥ नामह्मणारेउल्हासें ॥ २ ॥ नामादीपमाळउजळी ॥ तेणेंभक्तित्याचीझाली ॥ ३ ॥ ॥७२८॥

बोलूंऐसेबोल ॥ जेणेंबोलेंविठ्ठलडोले ॥ १ ॥ प्रेमसवां-

गाचेठाईं ॥ वाचेंविठ्ठलरखुमाई ॥ २ ॥ परेहूनिपरतेंघर ॥ तेथेंराहूंनिरंतर ॥ ३ ॥ नाचोंकीर्तनाचेरंगीं ॥ ज्ञानदीप लावूंजगीं ॥ ४ ॥ सर्वसत्ताआलीहातां ॥ नामयाचाखेचर- दाता ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ७२९ ॥

ध्वजांकुंचेगरुडटके ॥ वैष्णवचालिलेनेटके ॥ १ ॥ आ- लेंवैष्णवाचेंदळ ॥ भेणेंपळेकळीकाळ ॥ २ ॥ तुळशीमंजु- रीचेभाले ॥ देखोनीयमदूतपळाले ॥ ३ ॥ ऐकोनीनामा- चागजर ॥ प्रेमेंडुल्लतसेशंकर ॥ ४ ॥ नामाह्मणेभक्तिगा- ढी ॥ सेवानसोडींअर्धघडी ॥ ५ ॥ ॥ ॥७३०॥

धिक्धिक्तोग्रामधिक्धिक्तोआश्रम ॥ संतसमागमजे- थेंनाहीं ॥ १॥ धिक्धिक्तेंगाणेंधिक्धिक्तेंपठन ॥ रामना- मनाणेंजेथेंनाहीं ॥२॥ धिक्धिक्तोश्रोताधिक्धिक्तोवक्ता ॥ पांडुरंगकथाजेथेंनाहीं ॥ ३ ॥ नामाह्मणेअसावेंभलतेंव्या- पारीं ॥ परीतेंलक्षपरमेश्वरींअसोंद्यावें ॥ ५ ॥ ७३१ ॥

साधावयास्वरूपासिद्धि ॥ सिद्धसाधकांसमाधी॥वैसोनि- यांध्यानसिद्धि ॥ परितोहारिन्नसांपडे ॥ १ ॥ धन्यधन्यवै- ष्णवसंग ॥ अखंडजेथेंपांडुरंग ॥ कीर्तनींनाचतसेअ- भंग ॥ अखंडकाळसर्वदां ॥ २ ॥ नामघेतांधांवेविठ्ठल ॥ नलगेतपनलगेमोल ॥ कष्टनलगतीवहुसाल ॥ हाकृपाळु दीनाचा ॥ ३ ॥ नामाह्मणेभक्तिकारण ॥ भक्तीनेंतुष्टेना- रायण॥ त्याचेंकरितांकीर्तन ॥ आपेआपतुष्टेल ॥४॥७३२॥

देहधर्मविहितकरी ॥ अद्वैतबोधचित्तींधरी ॥ सर्वांभूतीं नमस्कारी ॥ एकआत्माह्मणोनिया ॥ १ ॥ एकतत्त्वएकह- रि ॥ एकचितानमस्कारी ॥ आदिअंतींचानरहारि ॥ सक-

ळकुळासीतारील ॥२॥पावित्र्यत्याचोंचिकुळ॥ आचारत्याचा-चिसुशील ॥ अखंडजपसर्वकाळ ॥ रामकृष्णनरहरि ॥३॥ नामाजपेनाममंत्र ॥ अखंडहरिनामसत्र ॥ हाचिआमुचा आचार ॥ रामकृष्णगोविंद ॥ ४ ॥ ॥ ॥७३३॥

नित्यसर्वकाळपुण्याचीयारासी ॥ हरिनामआलीयाजि-व्हेसी ॥ नित्यतपअनुष्ठानाच्यारासी ॥ कोटियज्ञासीलाभ झाला ॥ १ ॥ धन्यधन्यत्यांचावंश ॥ जेजेरातलेनामास ॥ रामनामींनित्यसौरस ॥ तेविष्णुदासपवित्राजाणावे ॥ २ ॥ पवित्रतेस्वधर्मी ॥ ज्यासीसर्वकाळनामीं ॥ तयाचेंनामपूर्ण कामीं ॥ मनोरथपुरतील ॥ ३ ॥ नामाजपेनामहरीचें ॥ सार्थककेलेंसंसाराचें ॥ वोझेंफेडिलेंपूर्वजन्मीचें ॥ हरिस्मर-णकेलिया ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥७३४॥

प्रतिदिनींस्वधर्मकरी ॥ हरिमूर्तिनमस्कारी ॥ भावेंभजन वसेशरीरीं ॥ तोचिभक्तहरीचा ॥१॥ अनंतजन्मींचानिक-ट ॥ स्वधर्मकरुनीयानिट ॥ तेणेंमागीलसरसपाट ॥ पुढें शुद्धपक्षहरीचा ॥ २ ॥ हेंचितापत्रयासमर्थ ॥ तेणेंचिजो-डियलेंतीर्थ ॥ त्याचेधरूनियामनोरथ ॥ हरिभजनपंथला-गला ॥ ३ ॥ देवोत्याचाअंकिला ॥ सत्वानढळेतोचिभला॥ सत्कर्मींचांगला ॥ त्याचेंधन्यजीवित्व ॥ ४ ॥ तोचिसफळ सकळीं ॥ सदांनिर्मळसर्वकाळीं ॥जोहरिनामेंवाजवीटाळी॥ तोचिसमर्थत्रिभुवनीं ॥ ५ ॥ नामाहरिरंगीरंगला ॥ संत-चरणींअनुरंगला ॥ तेणेंविठ्ठलसंतोषला ॥ येउनीराहिला हृदयकमळीं ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ७३५ ॥

जपतपअनुष्ठानहरि ॥ एकचितोनमस्कारी ॥ भूतद्वेष

कदानकरी ॥ हेंचितपसामोग्रीतुझी ॥ १ ॥ हरिमाधवया-
दवा ॥ कृष्णगोविंदाकेशवा ॥ येणेंकरूनियाजीवा ॥ सर्व-
काळरंजवी ॥ २ ॥ स्मरतांहरीचेंनाम ॥ पळोनिजातीकाळ
यम ॥ तुटोनीनानायोनिजन्म ॥ गर्भवासामगनये ॥ ३ ॥
नामाजपेनामावळी ॥ अखंडतपहेंसदाकाळीं ॥ हरिनामें
पिटोंनिटाळी ॥ हाचितरणोपावसर्वांचा ॥ ४ ॥ ॥७३६॥

नामवाचेउच्चारितां ॥ हरेसंसाराचिव्यथा ॥ जातिदो-
षांचीयाचळथा ॥ रामकृष्णउच्चारणीं ॥ १ ॥ हरिमाधव
गोविंदा ॥ यानामाचाजयाधंदा ॥ तोचिपावेलपरमपदा ॥
निजभुवनवैकुंठीं ॥ २ ॥ जन्मोजन्मींच्यातपरासी ॥ तेणें
नामआलेंमुखासी ॥ स्मरतांहरिहृषीकेशी ॥ सकळपूर्वजा-
सीउद्धार ॥ ३ ॥ नामाजपेध्यानींमनीं ॥ अखंडविठ्ठलहरि-
कीर्तनीं ॥ जेणेंजपेंयेमेदनी ॥ कोटियज्ञघडेल ॥४॥ ७३७॥

माझेमनेंमजउपदेशकेला ॥ तोमजाविंबलाहृदयकमळीं ॥
॥१॥ निर्वाणींचीएकसांगितलीखुण ॥ कैवल्यचरणकेशवा-
चे ॥ २ ॥ वेदशास्त्रश्रुतिस्मृतिपुराणें ॥ पाहूनिजाणणेंहेंचि
सत्य ॥ ३ ॥ क्रियाकर्मकरणेंज्याहिताकारणें ॥ तंप्रत्यक्ष
निधाननामाह्मणे ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥७३८॥

संतचरणरजसेवितांसहज ॥ वासनेचेंबिजजळोनीजाये
॥१॥ मगरामनामींउपजेआवडी ॥ सुखघडोघडींवाढोंलागे ॥
॥ २ ॥ भेदभ्रमआटेआशापाशतुटे ॥ प्रत्यक्षदेवभेटेसंत
संगें ॥ ३ ॥ प्रेमेंकंठदाटेआनंदपुरलोटे ॥ हृदईंप्रगटेराम
रूप ॥ ४ ॥ नामाह्मणेसोपेंसाधनगोमटें ॥ परिउपातिष्ठेपूर्व-
पण्यें ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ७३९ ॥

एकतत्त्वएकाकारसर्वदेशीं ॥ एकतोप्रेमेंसीसकळजनीं ॥ ॥ १ ॥ ऐसेंब्रह्मपहाआहेसर्वएक ॥ नलगेविवेककरणेंकांहीं ॥ ॥२॥मिथ्याहेंडंबरमायामथितार्थ ॥ हरिहाचिस्वार्थवेगकरी॥ ॥ ३ ॥ नामाह्मणेसमर्थबोलिलातोवेद ॥ नाहींभेदाभेदब्रह्मपणीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ७४० ॥

केशवाचेंनाम्यालागलेंसेध्यान ॥ देखेत्रिभुवनतदाकार ॥ १ ॥ जयातयाह्मणेमाझाचक्रपाणी ॥ जायलोटांगणींसर्व भावें ॥ २ ॥ प्रेमेंवोसंडतनामाचेनीछंदें ॥ हृदइंप्रेमानंदेंवोसंडत ॥ ३ ॥ धाउनीयेउनीचरणाजवळीं ॥ वंदीपायधुळी सर्वभावें ॥ ४ ॥ घनशाममूर्तिसुंदरसांवळी ॥ ध्यानहृदयकमळींनित्यराहो ॥ ५ ॥ भाग्यवंतनामाभक्तशिरोमणी ॥ अखंडउन्मनीभोगितसे ॥ ६ ॥ ॥ ॥ ७४१ ॥

सद्गुरुनींमजउपकारकेला ॥ अभिमानघालविलासमूळ माझा ॥ १ ॥ फेडियेलामाझासर्वहीसंशय ॥ चित्तब्रह्ममय केलेंमाझें ॥ २ ॥ मजलागींअवलोकिलेंकृपादृष्टीं ॥ गुरुमयसृष्टिदिसेमज ॥ ३ ॥ नामाह्मणेमजसद्गुरुविणकांहीं ॥ प्रियऐसेंनाहींजगत्रयीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ७४२ ॥

सद्गुरुसारिखासोयराजीवलग ॥ तोडिलाउद्वेगसंसारींचा ॥ १ ॥ कायउतराईव्हावेंकवणेगुणें ॥ जन्मानाहींयेणेंऐसेंकेलें ॥ २ ॥ माझेंसुखमजदाखविलेंडोळां ॥ दिधलीप्रेमकळानाममुद्रा ॥ ३ ॥ डोळियाचाडोळाउघडिला जेणें ॥ लेवविलेंलेणेंआनंदाचें ॥ ४ ॥ नामाह्मणेनिकीसांपडलीसोय ॥ नविसंबेपायखेचराचे ॥ ५ ॥ ॥७४३॥

नामास्वयंपाककरूंबैसला ॥ तंवकेशवश्वानरूपेंआला ॥

चीनमानावीखंती॥ केशवाचाप्रसादआहेमाझेचित्तीं ॥ देवा कायकरसीतेंनकळे ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ९१२ ॥

मांजरेंकेलीयेकादशी ॥ इळवरीहोतेंउपवासी ॥ यत्न करितांपारण्यासी ॥ धाउनीगिवसीउंदीरु ॥ १ ॥ लांड-गाबैसलाध्यानस्थ ॥ तोंवरीअसेनिवांत ॥ जंवपेटसुटे जीवांत ॥ मगघातकरीवत्साचा ॥ २॥ श्वानगेलेंमलकार्जु-ना॥देहकर्वतींघातिलेंजाणा॥आलेंमनुष्यदेहपणा ॥ परिखो-डीनसंडीआपुली ॥ ३ ॥ श्वानेंदेखिलास्वयंपाक ॥ जोंवरी जागेहोतेलोक ॥ निजलीयानिःशंक ॥ चारीमडकींफोडि-लीं ॥ ४ ॥ वेश्याजालीपतिव्रता ॥ तिचाभावअसेदुश्चि-ता ॥ तिसीनाहींआणीकचिंता ॥ परद्वारावांचुनी ॥५॥ दात्यानेंकेलीसमाराधना ॥ बहुतलोकजेविलेजाणा ॥ प-रिनसंडीवोखटीवासना ॥ खटनटचाळितसे ॥ ६ ॥ ऐशा प्रकारच्याभक्ती॥असतीत्यानेणोंकिती॥ एकवोळंगालक्ष्मी-पाति ॥ म्हणेविष्णुदासनामा ॥ ७ ॥ ॥ ९१३ ॥

याहोक्षेत्रकेलेंजुंपिलेंआउतें ॥ अठराधान्येंतेथेंपेरिये-लीं ॥ १ ॥ मेघशाममेघवर्षेसर्वांधारीं ॥ बीजविटेवरीसा-सिनलें ॥ २ ॥ जगाचेंजीवनपंढरीपिकली ॥ चरायासोंक-लींभूतेंजाणा ॥ ३ ॥ घालुनीयामाळारक्षीकळिकाळा ॥ कायकळिमळासंसाराची ॥ ४ ॥ पापासोंकरणेंभक्तिहेगो-फण ॥ भूससांडीकणवेंचितातीं ॥ ५ ॥ वेदशास्त्रऐसेंबो-लबोलविता ॥ गूढवेगळीतालाभहोती ॥ ६ ॥ नामाम्हणे स्वामीविठ्ठलसुकाळ ॥ अन्नब्रह्मफळत्रिभुवनीं ॥ ७॥९१४॥

जडहेंचिखळेंआयुष्याचीरासी॥काळमापउसींमोजीतसे

॥१॥ मापतेंलागलेंमापतेंलागलें॥ मापतेंलागलेंझडझड॥२॥ नामाम्हणेजायशरणकेशवा ॥ सळेचाजोठेवानपावती ॥ ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥९१५॥

जायजायपरतोनियापाहे ॥ लाचावलाजीवपरिनलगे गेमाय ॥ १ ॥ नायकविठ्ठलपाहूंद्यासाजणी ॥ नपुरे धणी डोळियाची ॥ २ ॥ देखिलागेमायलावण्यसागर ॥ नामयादातारकेशीराज ॥ ३ ॥ ॥ ॥९१६॥

खोळवुंथीतो ॥ चौबारातोगेबाई॥१॥ नंदाचानंदनुतो ॥ संताचेंजीवनतोगेबाई ॥ २ ॥ कामिनीमनोहरुतो ॥ नामयादातारुतोगेबाई ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥९१७॥

आपुलेंहिततेंआपणनेणती ॥ सर्वांसीसांगतीज्ञानगोष्टी ॥ १ ॥ नेणोनीपरब्रह्मजाणतेजाहले ॥ अंहभावेंवेंचले केशवासी ॥ २ ॥ जीवशिवदोन्हीयेकरूपम्हणती ॥ शेखीं तेआटतींविठ्ठलासवें ॥ ३ ॥ नामाम्हणेतोचिकेशवींअनुसरतां ॥ सेवकम्हणतांमुक्तिहोय ॥ ४ ॥ ॥ ॥ ९१८ ॥

कपटाचेंकुपथ्यजालेंमाझेपोटीं ॥ धांवजगजेठीकृपाळुवा ॥ १ ॥ मजऔषधद्यावेंमजऔषधद्यावें ॥ संताच्यालावावेंसमागमें ॥ २ ॥ त्याजपाशींऔषधआहेनानाविध ॥ रामकृष्णगोविंदम्हणतीवाचें ॥ ३ ॥ पुत्रस्नेहेंकैसाआजामेळुस्मरला ॥ तेणेंतोउद्धरिलाक्षणमात्रें ॥ ४ ॥ रामनाम स्मरतांतरलीतीकुंटणी ॥ वैंकुठभुवनींतिचावासु ॥ ५ ॥ तेंचिहेंऔषधप्रह्लादेंघेतिलेंदेवप्रगटलेम्हणेनामा॥६॥९१९॥

अभंगाचीकळाकांहींचमीनेणत ॥ त्वराकेलीप्रीतकेशवराजें ॥ १ ॥ अक्षराचीराशीसंख्याबोलिलोंउदंड ॥

मेरुतोप्रचंडशरआधीं ॥ २॥ साहासाडेतिनचरणजाणावे ॥ अक्षरेंमोजावेचौकचारी ॥ ३ ॥ पहिलेपासुनीतिसरेपर्यंत ॥ आठरागणीतमेजआली ॥ ४ ॥ चौकचारीआधीं बोलिलोंमातृका ॥ साविसाचीसंख्याशेवटील ॥ ५ ॥ दीडचरणाचोंदीर्घतेंअक्षरें ॥ सूक्ष्मविचारेंबोधकेले ॥ ६ ॥ नामाम्हणेयेकशून्यादिलेंहरि ॥ प्रीतीनेंखेचरींआज्ञाकेली ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९२० ॥

कोळशासीदूधमर्दूपैंजातां ॥ नपवेशुद्धताकोणेकाळीं ॥ ॥१॥ दुर्जनासींतैसाबोधितांपरमार्थ ॥ नजायेचिस्वार्थजाणत्याचा ॥२॥ सूकराचेपरीनेणतीमिष्टान्न॥विष्ठातेभक्षणकरितांति ॥ ३ ॥ मोहीनलेप्राणिसर्वस्वअसतां ॥ कायसांगों आतांनवलाव ॥ ४ ॥ नामाम्हणेतयानहोयचिमोक्ष ॥ येउनीपद्माक्षदेवोभेटे ॥ ५ ॥ ॥ ॥ ९२१ ॥

फुटल्याघटाचीनाहींनागवण ॥ संसारभोगणेंतेणेंन्यायें ॥ १ ॥ स्वप्नींचीतीमातजागृतीसीसांगे ॥ तैसाभवरोगप्रारब्धाचा ॥ २ ॥ नामाम्हणेऐसाजाणेतोसंसार ॥ वाउगा पसाराजाइजणें ॥ ३ ॥ ॥ ॥ ९२२ ॥

कृष्णभक्तिविणतरलाआहेकोण॥ द्यावानिवडूनयेकतऱ्ही ॥ १ ॥ कार्येहेंकारणलटिकाचिश्रम ॥ नकळोनीवर्मवायागेले ॥ २ ॥ नामाम्हणेमाझीखेचरमाउली ॥ विठोनेंदाविलीवाटमज ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९२३ ॥

रविरश्मीधरूनगगनाजाऊंयेईल ॥ परीसाधुनभेटेलभावाविण ॥ १ ॥ व्रततपतीर्थगोविंदपैंभेटे ॥ परिसाधुनभेटेभावाविण ॥ २ ॥ मायबापबंधुमिळतीनानायोनी ॥ परिसा-

धुनिर्वाणींनभेटेकोठें ॥ ३ ॥ नामाम्हणेकेशवाबरवासंतसं-
ग ॥ त्याविणभवभंगनव्हेनव्हे ॥ ४ ॥ ॥ १२४ ॥
जाऊंपाण्यानिसुरवाण्या ॥ आळवितीगोडराण्या ॥१॥
गोविंदगीतींगाऊंआनंदेंपाण्याजाऊं ॥ ध्रु० ॥ २ ॥ खाऊं
कंदमुळेंआम्हीअसोंवनीं ॥ नदेखोंगोविंदनाइकोंकानीं ॥
॥ ३ ॥ आम्हीगौडभिल्लणीकायऐसीगोडी ॥ तुझीयानामा-
चीलागलीआवडी ॥ ४ ॥ आजीचादिवसआह्माजालासे
आनंदु ॥ विष्णुदासनामयानेंलावियेलाछंदु ॥ ५ ॥ १२५॥

---

अथ नामदेवकृत

# जनाबाईचे अभंग.

भजनकरीमहादेव ॥ रामपूजीमहादेव ॥ १ ॥ दोघेएक-
पणेंपाही ॥ एकत्वेंतेंदुजेंनाहीं ॥ २ ॥ शिवरामनाहींभेद ॥
ऐसेंवदतातीवेद ॥ ३ ॥ जनीह्मणेहोऐका ॥ सर्वांघटींतोचि
देखा ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १२६ ॥
भक्तजेंजेंकर्मकरिती ॥ तेंतूंसोसिसीकृपामूर्ति ॥ १ ॥ न-
वलनोहेजीदेवा ॥ तूंभुललासीभक्तिभावा ॥ २ ॥ वागदोर
धरुनीहातीं ॥ चारीघोडेचहूंहातीं ॥ ३ ॥ धुतांलाजनाहीं
तुला ॥ दासीजनीह्मणेभला ॥ ४ ॥ ॥ ॥ १२७ ॥
देवपांडवाचासखा ॥ द्रौपदीचापाठीराखा ॥ १ ॥ मा-
याजाळतेंतोडिलें ॥ आंतविवरकोरिलें ॥ २ ॥ भीष्मेंनि-

नुन्हांजन्मानाहींयेणें ॥ ३ ॥ दासीज-
नीतल्लीनझाली ॥ सोपानचरणींविनटली ॥ ४ ॥ ॥९४०॥

माझ्यानामयाचागुरु ॥ तोंहासोपानसद्गुरु ॥ १ ॥
माझ्याजीवींच्याजीवना ॥ त्हदईंराहेतूंसोपाना
॥ २ ॥ कऱ्हातीरींकरुनीवस्ती ॥ ब्रह्मपुरीजयाह्म-
णती ॥ ३ ॥ विश्वउद्भवेंज्याचीसत्ता ॥ जनीह्मणेमाझ्या
ताता ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९४१ ॥

सोपानाचीऐसीमूर्ति ॥ विश्वकर्ताब्रह्माह्मणती ॥ १ ॥
ऐसेंबोलेपुराणांत ॥ सृष्टिकर्ताजोभगवंत ॥ २ ॥ जनीह्म-
णेहासोपान ॥ ब्रह्माअवतरलापूर्ण ॥ ३ ॥ ॥ ९४२ ॥

खंतीवाटेमाझेमनीं ॥ राहेपंढरीसीयेवोनी ॥ १ ॥ आ-
ठवेस्वामीहासोपान ॥ तयाक्षेममीदेईन ॥ २ ॥ वैशाख
शुद्धएकादशी ॥ संतसमुदायासरसी ॥ ३ ॥ स्वामीसोपान
भेटला ॥ जनीह्मणेश्रमगेला ॥ ४ ॥ ॥ ९४३ ॥

सदाशिवाचाअवतार ॥ स्वामीनिवृत्तिदातार ॥ १ ॥
महाविष्णूचाअवतार ॥ सखामाझाज्ञानेश्वर॥२॥ ब्रह्मासो-
पानतोजाला ॥ भक्ताआनंदवर्तला ॥ ३ ॥ आदिशक्तिमु-
क्ताबाई ॥ दासीजनीलागेपायीं ॥ ४ ॥ ॥ ॥९४४॥

यातिहीनचोखामेळा ॥ त्यासीभक्तीचाकळवळा ॥ १ ॥
त्याचाजालाह्मणीयारा ॥ राहेघरींधरूनिथारा ॥ २ ॥ देव
बाटविलातेणें ॥ हासेजनीगायगाणें ॥ ३ ॥ ॥९४५॥

माळियाचालेकजाला ॥ शेखींकुण्र्यालागींगेला ॥ १ ॥
चांभारानेंजानव्यासी ॥ काढूनिदाविलेंभटासी ॥ २ ॥
तुरकाघरींसेलेविणी ॥ ह्मणेनामयाचीजनी ॥ ३ ॥९४६॥

रुक्मिणीच्याकुंका ॥ सुराअसुराप्रियलोकां ॥ १ ॥ तूं धांवेमाझेआई ॥ सखेसाजणीविठाबाई ॥ २ ॥ शिवाचीयाजपा ॥ मदनतातायेनिष्पापा ॥ ३ ॥ भावधरामनीं ॥ ह्मणेनामयाचीजनी ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥९४७॥

ऐसापुत्रदेईसंता ॥ ज्याचीआवडीपंढरीनाथा ॥ १ ॥ गीतानित्यनेमें ॥ वाचीज्ञानेश्वरीप्रेमें ॥ २ ॥ संताच्याचरणा ॥ करीमस्तकठेंगणा ॥ ३ ॥ कन्याव्हावीभागीरथी ॥ तुझेंप्रेमजिच्याचित्तीं ॥ ४ ॥ ऐसेंकरीसंतजना ॥ ह्मणेजनीगानिधाना ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ९४८ ॥

चोखामेळाभक्तभला ॥ तेणेंदेवभुलविला ॥ १ ॥ भक्ति आहेज्याचेचित्तीं ॥ त्यालापावतोनिश्चितीं ॥ २ ॥ चोखामेळ्याचीशुद्धकरणी ॥ ह्मणेनामयाचीजनी ॥ ३ ॥॥९४९॥

जन्मायेवोनियादेख ॥ करीदेहाचेंसार्थक ॥ १ ॥ वाचें नामविठ्ठलाचें ॥ तेणेंसार्थकदेहाचें ॥ २ ॥ ऐसानामाचा महिमा ॥ शेषवर्णितांझालासीमा ॥ ३ ॥ नामतारकत्रिभुवनीं ॥ ह्मणेनामयाचीजनी ॥ ४ ॥ ॥ ९५० ॥

सेव्याझालाहरि ॥ द्रव्यगोणीलोटीद्वारीं ॥ १ ॥ बुद्धी सांगेराजाईसी ॥ तुह्मीनछळावेंनामयासी ॥ २ ॥ अवघ्या वित्तासीवेंचावें ॥ सरल्यामजलागींमागावें ॥ ३ ॥ विठ्ठल सेटीनाममाझें॥नामयासीसांगावोजें ॥ ४ ॥ आज्ञाउचित दासासी ॥ ऐसेंबोलेराजाईसी ॥ ५ ॥ ऐसेंबोलोनीयागेला ॥ ह्मणेजनीनामाआला ॥ ६ ॥ ॥ ॥ ९५१ ॥

नामायेवोनीयापाहे ॥ आजीकवतुकदिसताहे ॥ १ ॥ वृत्तांतनिवेदीराजाई ॥ लागेनामयाचेपाईं ॥ २ ॥ नामा

ह्मणेयाद्रव्यासी ॥ आह्मीनातळोंमानसीं ॥ ३ ॥ वेगींबोलवाब्राह्मण ॥ करूंआतासंतर्पण ॥ ४ ॥ हातींटाळदिंडीगाणें ॥ हेंचिआमुचेंसर्वधन ॥ ५ ॥ ऐसेंआश्चर्यदेखोनी ॥ जनीहांसतसेमनीं ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ९५२ ॥

नामदेवाचेंहेंथोर ॥ तरलाकोळीतोकुंभार ॥ १ ॥ ऐसी नामाचीआवडी ॥ तुटलीसंसाराचीबेडी ॥ २ ॥ नामगाय वेळोवेळां ॥ दासीजनीलानित्यचाळा ॥ ३ ॥ ९५३ ॥

बापरखुमादेवीवर ॥ माझेंनिजाचेंमाहेर ॥ १ ॥ तेणें जाणापंढरपुर ॥ जगामुक्तीचेंमाहेर ॥ २ ॥ तेथेंमुक्तिनाहीं ह्मणे ॥ जनीनपाहेत्याचेंवदन ॥ ३ ॥ ॥ ९५४ ॥

सख्यापंढरीच्याराया ॥ घडोदंडवतपाया ॥ १ ॥ ऐसें करीअखंडित ॥ शुद्धप्रेमशुद्धचित्त ॥ २ ॥ वेधमाझ्याचित्ता ॥ हाचिलागोपैंसर्वथा ॥ ३ ॥ जावेंवोवाळोनी ॥ जन्मोजन्मीं ह्मणेजनी ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ९५५ ॥

नामविठोबाचेंघ्यावें ॥ मगपाऊलटाकावें ॥ १ ॥ नाम तारकहेंथोर ॥ नामेंतरलेअपार ॥२॥ अजामेळउद्धरिला ॥ चोखामेळामुक्तीसनेला ॥ ३ ॥ नामदळणींकांडणीं ॥ गायेनामयाचीजनी ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ९५६ ॥

चरणविठोबाचेदेखिले ॥ साहीरिपुहारपले ॥ १ ॥ नाहींनाहींह्मणतीआह्मी ॥ सांगसीत्यालागुंकामीं ॥ २ ॥ नाहींतरीजाऊंदेशीं ॥ जनीनामयाचीदासी ॥ ३ ॥ ९५७ ॥

कांगाउशीरलाविला ॥ माझाविसरपडिला ॥ १ ॥ तुझवरीसंसार ॥ बोळविलेंघरदार ॥ २ ॥ तोतूंआपुल्यादासीसी ॥ जनीह्मणेविसंबसी ॥ ३ ॥ ॥ ॥ ९५८ ॥

घेतलेंपदरीं ॥ आतांनटाकावेंदुरी ॥ १ ॥ तुह्माथोराचें उचित ॥ हेंचिकायसांगूंतुतें ॥२॥ब्रह्मीयाच्याताता ॥ सख्यारुक्मिणीच्याकांता ॥ ३ ॥ आपुलीह्मणवोनी ॥ आपंगावीदासीजनी ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ९५९ ॥

कितीसांगूंतुतें ॥ बुद्धिशिकवणमाते ॥ १ ॥ सोमवंशींच्याभूषणा ॥ प्रतिपाळीआरुषजना ॥२॥ शिकवावेंतुतें ॥ हाचिअपराधमातें ॥ ३ ॥ स्वामीलागींधीटऐसी ॥ ह्मणतसेजनीदासी ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९६० ॥

मांडियेलाखेळ ॥ बुद्धिरंगाचींबुदबळें ॥ १ ॥ कैसाशह आला ॥ प्यादाफर्जीसवेंमेला ॥ २॥ शहाबाजीझाली ॥ जनीह्मणेमातकेली ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९६१ ॥

देसीगर्भवास ॥ तरीपुरवावीआस ॥ १ ॥ मृगपक्षी होकांसूकर॥श्वानश्वापदमार्जर॥२॥मजकरीहेपंढरी ॥अथवा नामयाचेघरीं ॥ ३ ॥ ऐसाहेतमाझेमनीं ॥ ह्मणेनामयाचीजनी ॥ ४॥ ॥ ॥ ॥ ॥ ९६२ ॥

शिणल्याबाह्याआतां ॥ येउनीयालावीहाता ॥ १ ॥ तूं माझेंमाहेर ॥ कायपहासीअंतर ॥ २ ॥ वोवाळुनीपाया ॥ जीवेंभावेंपंढरीराया ॥३॥ धर्मताताधर्मलेकी ॥ ह्मणेजनीहे वोळखी ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९६३ ॥

एकब्राह्मणाचेंपोर ॥ रडेदूधमागेफार ॥ १ ॥ माताह्मणेबाळकासी ॥ दूधमागेदेवापाशीं ॥ २ ॥ क्षीरसिंधुभरुनी वाटी ॥ जनीह्मणेलावीवोठीं ॥ ३ ॥ ॥ ॥ ९६४ ॥

योगन्यावासिद्धी ॥ सकळगुणांचातूंनिधी ॥ १ ॥ अरूपाच्यारूपा ॥ सामराज्याचीयाबापा ॥ २ ॥ ब्रह्मीयाच्याता-

ता ॥ ह्मणेजनीपंढरीनाथा ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ९६५ ॥

स्मरतांचिपावसी ॥ ह्मणोनीभक्तातेंलाभसी ॥ १ ॥ ऐसें कांहींनघडेदेवा ॥ वायाकोणकरीसेवा ॥ २ ॥ नपुसतां आस ॥ मगदेवाकोणपुसे ॥ ३ ॥ कोठेंचक्रपाणी ॥ तुज आधीननाहींजनी ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ९६६ ॥

भूतजालेंऋषीपोटीं ॥ लावियेलेंमृगापाठीं ॥ १ ॥ विश्वामित्राघालाघाली ॥ पोटींशकुंतलाआली ॥ २ ॥ भगांकितकेला ॥ इंद्रभूतानेंझडपिला ॥ ३ ॥ तेंचिजालेंहें भारत ॥ ह्मणेजनीकेलीमात ॥ ४ ॥ ॥ ॥९६७॥

वैष्णवतोएकइतरतेसोंग ॥ ठसेदेउनीअंगचितारिती ॥ १ ॥ जेथोनिजन्मलातिसीबोलूंलागला ॥ तीर्थरूपकेला देशोधडी ॥ २ ॥ नायकेब्रह्मज्ञानजोकांदुराचारी ॥ अखंडद्वेषकरीसज्जनाचा ॥ ३ ॥ विद्येचाअभिमाननायकेकीर्तन ॥ पाषांडीहेह्मणेकारितीकाय ॥ ४ ॥ पंचरसपात्राकांताहेबुडविती ॥ उद्धरलोंह्मणतीआह्मीसंत ॥ ५ ॥ कीर्तनाचाद्वेषकरितोचांडाळ ॥ तयाचाविटाळमातंगासी ॥६॥ वैष्णवतोएकचोखामेळामहार ॥ ह्मणेजनीनिर्धारकेला संतीं ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९६८ ॥

वैष्णवतोकबीरचोखामेळामहार ॥ गोरातोकुंभाररोहिदास ॥ १ ॥ सजनकसाईबयातोकसाब ॥ वैष्णवतोशुद्ध एकनिष्ठ ॥ २ ॥ कमालफुलारीमुकुंदजोहरी ॥ जींहींदेवद्वारींवस्तीकेली ॥ ३ ॥ राजाईगोणाईआणितोनामदेव ॥ वैष्णवाचारावह्मणवितसे ॥ ४ ॥ वैष्णवाचरणींकरीवोवाळणी ॥ तेथेंदासीजनीशरीराची ॥ ५ ॥ ॥ ९६९ ॥

पुंडलिकभक्तबळी ॥ विठुआणिलामहीतळीं ॥ १ ॥ आनंदअवतारकेवळ ॥ उभाविठेवरीसकळ ॥ २ ॥ वसुदेवानकळेपार ॥ नाम्यासंगेंजेवीफार ॥ ३ ॥ भक्ताभावार्थें विकला ॥ दासीजनीलाआनंदजाला ॥ ४ ॥ ॥९७०॥

जोडीजोडलीशिवाची ॥ भ्रांतिफिटलीमनाची ॥ १ ॥ आनंदाआनंदजाला ॥ बोधबोधेंचिबोधला ॥ २ ॥ आनंदाचीलहरीउठी ॥ ब्रह्मानंदेंगिळिलीपोटीं ॥ ३ ॥ एकपण जेथेंनाहीं ॥ दीपिउरलीतेमगकाई ॥ ४ ॥ ऐसीसद्गुरूची करणी ॥ ह्मणेनामयाचीजनी ॥ ५ ॥ ॥ ॥९७१॥

हिरण्यकश्यपाचेकुळींनामाप्रल्हाद ॥ पद्मिनीनाममाझें श्रेष्ठदासीजेंपद ॥१॥दुसरेजन्मींअंगदनामाराममभक्त॥ मंथरानाममाझेंभरतेंदिधलीलाथ ॥ २ ॥ गोकुळींकृष्णासवेंनामाउद्धवजन्मला ॥ कुब्जानाममाझेंदेवेंउद्धारकेला॥३॥कलींतनामदेवविठ्ठलचरणीं ॥ त्याचेसेवेलागींदासीजन्मली जनी ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९७२ ॥

देहभावपूर्णजाये ॥ तेंव्हांविदेहीसुखहोय ॥ १ ॥ तयानेंनिजींनिजलें ॥ भवजागृतिनाहींआलें ॥ २ ॥ ऐसीविश्रांतिलाधली ॥ आनंदकळासंचरली ॥ ३ ॥ तेथेंसर्वांग सुखीजालें ॥ लिंगदेहहारपलें ॥ ४ ॥ तोएकींएकहोता ॥ दासीजनीनाहींआतां ॥ ५ ॥ ॥ ॥ ९७३ ॥

विठूपंढरीच्यानाथा ॥ काळसाह्यनाहींआतां ॥ १ ॥ मजटाकिलेंपरदेशीं ॥ नाराविठातुजपाशीं ॥ २ ॥ मतिमंदतुझीदासी ॥ ठावद्यावापायापाशीं ॥ ३ ॥ तुजविणमज कोण ॥ करीलहेंसमाधान ॥ ४ ॥ हीनदीनतुझेपोटीं ॥ ज-

नीह्मणेदासीभेटी ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ९७४ ॥

आह्मीस्वर्गसुखमानूंजैसावोक ॥ देखोनियासुखपंढरी-चें ॥ १ ॥ नलगेवैकुंठनलगेकैलास ॥ सर्वस्वाचीआसवि-ठ्ठलपाईं ॥ २ ॥ नलगेसंततीधनआणिमान ॥ एकअसो ध्यानविठोबाचें ॥ ३ ॥ लटिकेंकींमाईकआमुचेंबोलणें ॥ तुमचीतुह्माआणसांगास्वामी ॥ ४ ॥ जीवभावआह्मीसांडूं वोवाळोनी ॥ ह्मणेदासीजनीनामयाची ॥ ५ ॥ ॥९७५॥

प्रपंचींजोरडे ॥ ब्रह्मींवनतयागाड ॥ १ ॥ ऐसाअखं-डितब्रह्मीं ॥ विठ्ठलींजोकर्माकर्मीं ॥ २ ॥ पुत्रदेहध्यायध्या-नीं ॥ कांताधनहेकामिनी ॥ ३ ॥ सिंधूसीसांडोवा ॥ ज-नीम्हणतसेदेवा ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ९७६ ॥

सर्वकाळकरानामाचेंचिंतन ॥ नित्यहेंवचनरामनाम ॥ ॥ १ ॥ खुंटतीलयोनितुटतिलयातना ॥ भक्तिनारायणापा-वेलतुझी ॥ २ ॥ स्मरेसदाकाळनलगतीपाल्हाळ ॥ सर्वत्र गोपाळवसिजेसदा ॥ ३ ॥ नामाह्मणेसर्वब्रह्ममयहरि ॥ ए-कचराचरींजनार्दन ॥ ४ ॥ ॥ ॥ ९७७ ॥

नित्यनेमआह्मांचिंतनश्रीरामा ॥आणिकात्यामानेघोंने-घों ॥ १ ॥ वळंघलोंहरिभूतींभावोनिर्धारीं ॥ दिसेचराचरीं हरिरूप ॥ २ ॥ जेंजेंपडेदृष्टींआणीकनाहींसृष्टीं ॥ हरिरू-पींभेटीहेचिदिसे ॥ ३ ॥ नामाह्मणेविठ्ठलसर्वांभूतींआहे ॥ आणीकउपायनलगती ॥ ४ ॥ ॥ ॥ ९७८ ॥

कांरेतूंशिणसीघरदारबांधणें ॥ वांयाचिवेतनेंआणित्या-ची ॥ १ ॥ भजेयादवरायालागेत्याच्यापाया ॥ आणीकउ-पायाकरूंनको ॥ २ ॥ सर्वभावेंहरिभजनतूंकरी ॥ भक्तिहे

पुढारीतारीलसत्य ॥३॥ नामाह्मणेदयासांडीतूंरेमाया ॥ भजनलवलाह्याहरीचेंकरी ॥ ४ ॥ ॥ ॥ ९७९ ॥

हरिनारायणजनींजनार्दन ॥ सर्वत्रभजनभूतदया ॥१॥ नलगतीकथाव्युत्पत्तिचळथा॥वाउगाचीउलथाग्रंथाचीया ॥ ॥ २ ॥ भावेंचिभजावेंहरितेंपूजावें ॥ नित्यहेंसेवावेंरामनाम ॥ ३ ॥ नामाम्हणेगोडगगनाहुनीवाड ॥ विठ्ठलहेंवेडअहर्निशीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९८० ॥

सर्वांभूतींहरिआहेआहेसाचें ॥ मायाजाळकैंचेंभाविकासीं ॥ १ ॥ सर्वब्रह्मऐसेंवेदबोलेगाढा ॥ ब्रह्मींचापवाडा अगम्यतो ॥ २ ॥ जाणतांनेणतांहरिनामोच्चार ॥ मार्गतो साचारसुफळसदा ॥ ३ ॥ नामाम्हणेकारणजीवाहोयस्मरण ॥ सर्वनारायणहरिदिसे ॥ ४ ॥ ॥ ॥९८१ ॥

निसंगनिदसुराह्मणेतूंबाहोसी ॥ नामहृषीकेशीघेईमुखीं ॥ १ ॥ रामगोविंदहरिकृष्णगोविंदहरि ॥ अच्युतनरहरि जनार्दना ॥ २ ॥ करितांनामपाठचुकतीभवजाळ ॥ तुटेलजंजाळमायामोह ॥ ३ ॥ नामाम्हणेऐसाउपायसुगम ॥ दिनानिशींनेमरामम्हणे ॥ ४ ॥ ॥ ॥ ९८२ ॥

सारपाहेनामविठ्ठलाचेंआहे ॥ दिनानिशींसोयलावीमना ॥ १ ॥ गुंतयलेंमनजोडतीलपाउलें ॥ तुटतीघेतलेंमायाजाळ ॥ २ ॥ नामचिकारणजपपैंसकळ ॥ उद्धारनिर्मळसकळजीवां ॥ ३ ॥ नामाम्हणेतोहाविठ्ठलपंढरी ॥ नामचराचरींअमृतमय ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥९८३ ॥

चिंतातुरदेहोनसाहेकाजळी ॥ मनाचीपाजळीउभयदीवीं ॥ १ ॥ प्रकाशपडेलब्रह्महेंदिसेल॥ वैकुंठजोडेलएकाना-

में ॥ २ ॥ नाहींवर्णधर्मनाहींभेदयाति ॥ नामेंचिसर्वतृप्ति होतअसे ॥ ३ ॥ नामाम्हणेनामहेंचिबीजसार ॥ तुटेलवेरझारप्रपंचाची ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ९८४ ॥

सांडीसांडीपसाराविषयाचासारा ॥ विठ्ठलमाहेरावोळंगेवेगीं ॥ १ ॥ होईलतुझेंहितहोसीपूर्णभरित ॥ सर्वांभूतीं उचितकरीदया ॥ २ ॥ वोळगेविठ्ठलरूपामार्गहाचिसोपा ॥ विषयाच्याखेपाखुंटतील ॥ ३ ॥ नामाम्हणेसुफळआह्मांनित्यकाळ ॥ दिनानिशींकेवळविठ्ठलदेव ॥ ४ ॥ ॥ ९८५ ॥

विसावाविश्वाचाजोप्राणभक्ताचा ॥ तोचिनित्यवाचाजपोंआह्मी ॥ १ ॥ गोविंदवामनभावयुक्तभजन ॥ सर्वजनार्दनहाचिभावो ॥ २ ॥ चैतन्यअचिंत्यनामहेंचिसत्य ॥ नित्यहोयकृतार्थविठ्ठलनामें ॥ ३ ॥ नामाम्हणेउद्धरणआणिक नाठवे ॥ केशवाचीसंवेपुरेआह्मा ॥ ४ ॥ ॥ ९८६ ॥

ह्मणतांरामवाचेंवैकुंठजवळी ॥ नित्यवनमाळीभक्तासंगें ॥ १ ॥ होईलसाधनाविठ्ठलींपरिपूर्ण ॥ निवतीनयनमूर्ति पहातां ॥ २ ॥ शंखचक्रगदाआयुधेंशोभती ॥ भाग्योदई दिसतीभावशीळ ॥ ३ ॥ नामाम्हणेतोदेवपढंरियेआहे ॥ नसांडीतूंसोयकेशवाची ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ९८७ ॥

मीतूंहेंचिकथासांगसीकांवाड ॥ विठ्ठलायेवढेंनसांगसी ॥ १ ॥ ऐसेंकांहींसांगजेणेंफिटेपांग ॥ नित्यपांडुरंगभजनसोपें ॥ २ ॥ मीआणितूंहेंवचनवोखटें ॥ विठ्ठलींविनटेदिनानिशीं ॥ ३ ॥ नामाम्हणभावऐसाधरीसकळ ॥ तुटेलगोपाळ जेणेंयोगें ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ९८८ ॥

दयाहेंचिदानमनकरीउदार ॥ सर्वहाश्रीधरऐसेंभावी

॥ १ ॥ तुटेलयातनाहोसीलवैकुंठ ॥ पंढरीमूळपीठसेवीकारे ॥ २ ॥ इच्छितीअमरनित्यकाळनेमें ॥ दाटतातीप्रेमेंसनकादिक ॥ ३ ॥ तेंहेंविठ्ठलनामपवित्रचोखडें ॥ अंतरींमाजिबडेंनित्यकरी ॥ ४ ॥ होतीलकामारीरिद्धीसिद्धीअपार ॥ आपणश्रीधरकुर्वाळील ॥ ५ ॥ नामाम्हणेयेथेंनलगेचिमोल ॥ विठ्ठलनिमोलसर्वांभूतीं ॥ ६ ॥ ॥ ९८९ ॥

माझियापितीयाचाहोईलनिद्राभंग ॥ नघडेप्रसंगबोलण्याचा ॥ १ ॥ क्षणएकमौन्यधरूनियारहा ॥ शरणांगता पहाकृपादृष्टीं ॥ २ ॥ करूनिनिर्धारआलेतीजेणेंभावें ॥ जतनकरावेंवचनदेवा ॥ ३ ॥ नवजावेंदेवामाझेगांवींहुनी ॥ मागतोंप्रार्थूनिहेंचितुम्हा ॥ ४ ॥ माझेंसुखपहावेंमागेनतें द्यावें ॥ माझेगांवींव्हावेंअधिपति ॥ ५ ॥ नामयाचास्वामी भक्तिसीभुलला ॥ पुंडलिकेंराहविलापंढरिये॥ ६ ॥ ९९० ॥

पायजोडोनीविटेवरी ॥ करठेउनीकटावरी ॥ १ ॥ रूप सांवळेंसुंदर ॥ कानींकुंडलेंमकराकार ॥ २ ॥ गळांवैजयंतीमाळा ॥ तोहामदनाचापुतळा ॥ ३ ॥ गरुडसन्मुखउभा ॥ जनीम्हणेधन्यशोभा ॥ ४॥ ॥ ॥९९१॥

येगयेगविठाबाई ॥ माझेपंढरीचेआई ॥ १ ॥ भीमा आणिचंद्रभागा ॥ तुझेचरणींचीगंगा ॥ २ ॥ गरुडासहितवांबायावें ॥ माझेरंगणींनाचावें ॥ ३ ॥ माझारंगतुझे गुणीं ॥ ह्मणेनामयाचीजनी ॥ ४ ॥ ॥ ९९२ ॥

शरणशरणनारायणा ॥ मजतारीवोपावना ॥ १ ॥ शरणआलामारुतिराया ॥ त्याचीदिव्यजालीकाया ॥ २ ॥ शरणप्रल्हादतोआला ॥ हिरण्यकश्यपुमारिला ॥ ३ ॥ ज-

नीम्हणेहेचिखूण ॥ जावेंदेवालाशरण ॥ ४ ॥ ॥ ९९३ ॥

कांगाउसीरलाविला ॥ माझाविसरपाडिला ॥ १ ॥ तुजसाठींसंसार ॥ बोळविलेंघरदार ॥ २ ॥ तरीतूंआपुल्या दासीसी ॥ जनीह्मणेनविसंबसी ॥ ३ ॥ ॥ ९९४ ॥

तुझीकेलीनाहींसेवा ॥ दुःखवाटेमाझेजीवा ॥ १ ॥ नष्टपापिणहीनदीन ॥ नाहींकेलेंतुझेंध्यान ॥ २ ॥ जेंजेंदुःखजालेंमला ॥ तेंत्वांसोसिलेंविठ्ठला ॥ ३ ॥ क्षमाकरादेवराया ॥ दासीजनीलागेपाया ॥ ४ ॥ ॥ ९९५ ॥

बापश्रोतियाचाराजा ॥ कैशाउभारिल्याध्वजा ॥ १ ॥ येकजालापरिक्षीती ॥ ऐसेंपोवाडेगर्जती ॥ २ ॥ भगवंतीं रसमुखें ॥ द्रौपदीवाढितसेसुखें ॥३॥ ज्याचीऐकतांगर्जना॥ कंपकाळाचीयामना ॥ ४ ॥ सातदिवसदृष्टिजाली ॥ जनी ह्मणेमातकेली ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ९९६ ॥

माझीअंधळ्याचीकाठी ॥ कवणेआडकेलीबेटी ॥ १ ॥ आतांसांगूंमीकवणासी ॥ धांवधांवहृषीकेशी ॥ २ ॥ तुज वांचुनीविठ्ठला ॥ नाहींकोण्हीरेमजला ॥ ३ ॥ देवातुझीये चरणीं ॥ माथाठेवीदासीजनी ॥ ४ ॥ ॥ ९९७ ॥

मजदुःखनकोदेवा ॥ मजसुखदेकेशवा ॥ १ ॥ आह्मा सुखदेईदेवा ॥ चरणींठावमलाद्यावा ॥ २ ॥ चरणींअसे जोशरण ॥ त्यासीनाहींजन्ममरण ॥३॥ जनीह्मणेहेंचिमाझें ॥ धन्यदेणेंतूजसाजे ॥ ४ ॥ ॥ ॥ ९९८ ॥

मायमेलीबापमेला ॥ आतांसांभाळीविठ्ठला ॥ १ ॥ मीतुझेंगालेंकरूं ॥ नकोमाझीसांडीकरूं ॥ २ ॥ कोणसुखें तुजविण ॥ माझेंकरीसंरक्षण ॥ ३ ॥ अंतपाहूंनकोदेवा ॥

श्रमथोरजालाजीव ॥४॥ भक्तिदेखोनीनिकटी ॥ दासीजनीलाविठ्ठलींभेटी ॥ ५ ॥ ॥ ॥ ९९९ ॥

असोथोरथोराचीमात ॥ तूंचीखेळसीगोपाळांत ॥ १ ॥ त्याच्यासिदोऱ्याचोरिसी ॥ ग्रासोग्रासींउच्छिष्टखासी ॥२॥ नकोसोंवळेंवोंवळें ॥ प्रत्यक्षचित्ततेंसोंवळें ॥ ३ ॥ स्वानंदाचाआहासीपाहीं ॥ हातधुतलेंसर्वही ॥ ४ ॥ हातींकाठीपाईंजोडा ॥ दासीजनीलावाटसोडा ॥ ५ ॥ ॥ १०००॥

देवदेखिलादेखिला ॥ नानावोळखेविठ्ठला ॥१॥ तोहा विटेवरींदेव ॥ सर्वसुखांचाकेशव ॥ २ ॥ जनीह्मणेसाणी पाणी ॥ घालीमजचक्रपाणी ॥ ३ ॥ ॥ १००१ ॥

जनीडोईनेंगांजली ॥ विठाबाईधांविन्नली ॥ १ ॥ देव हातेंवुचडासोडी ॥ उवामारितसेतातडीं ॥ २ ॥ केशविंचरूनिमोकळेकेले ॥ जनीम्हणेनिर्मळजाले ॥ ३ ॥१००२॥

विठोबाचेंपदकगेलें ॥ ब्राह्मणम्हणतीजनीनेंनेलें ॥ १ ॥ नाहींनेलेंजनीनेंजाण ॥ सख्याविठ्ठलाचीआण ॥ २ ॥ जनीखोळझाडोनींदावी ॥ पदकपडिलेंजनीचेपाईं ॥ ३ ॥ दंडींलाविल्याकाढण्या ॥ धांवधांवतूंधांवण्या ॥ ४ ॥ माझे वेळेकोठेंगेला ॥ जनीह्मणेविठ्ठलमेला ॥ ५ ॥ ॥१००३॥

एकप्रहररात्रींयेउनीहरि ॥ धाउनीशेजारींबैसेबाजे॥१॥ ऊठजनाबाईघेईवोदळण ॥ आवडीचेंगाणेंगाऊंप्रेमें ॥ २ ॥ दळणाचीपाटीआणूनियादेतो ॥ शेजारींबैसतोदळावया ॥ ३ ॥ नेणोंपूर्वीम्यांतपकायकेलें ॥ निधानजोडिलेंपंढरीचें ॥ ४ ॥ तैसेंझाडलोटकरूनियाहरि ॥ येवोनीबाहेरीशेणी भरी ॥ ५ ॥ सर्वकाममाझेंकरीचक्रपाणी ॥ आतांकैंचीज-

नीनामयाची ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ १००४ ॥

सणदिवाळीचाआला ॥ नामाराउळासीगेला ॥ १ ॥ हातींधरूनीदेवासी ॥ चालआमुचेघरासी ॥ २ ॥ गोणाईनेंउटणेंकेलें ॥ दामशेटीनेंनाह्मणिलें ॥ ३ ॥ पदरमाथ्याचाकाढिला ॥ बाळनंदाचापुसिला ॥ ४ ॥ हातींघेउनीपंचारती ॥ चक्रपाणीवोवाळिती ॥ ५ ॥ अवघेजेउनीबैसले ॥ दासीजनीनेंविडेदिले ॥ ६ ॥ ॥ ॥१००५॥

मागेंकितीसंतजाले ॥ नाम्याऐसेंकोणबोले ॥ १ ॥ नामाजातांराउळासी ॥ देवबोलेआधींत्यासी ॥ २ ॥ केवढें नवलसांगावें ॥ दासीजनीच्याबोलाल्याहावें ॥३॥१००६॥

आषाढीचीएकादशी ॥ नामाहोताउपवासी ॥ १ ॥ देवेंगरुडाधाडिलें ॥ वेगेंत्यालाबोलाविलें ॥ २ ॥ राहीह्मणेपांडुरंगा ॥ कोणाबोलाविलेंसांगा ॥ ३ ॥ माझ्याजीवींचेंजीवन ॥ त्यासीबोलाविलेंजाण ॥ ४ ॥ ऐसाभक्तराजनिका ॥ दासीजनीचाआत्मसखा ॥ ५ ॥ ॥१००७॥

राजाईगोणाई ॥ अखंडिततुझेपाई ॥ १ ॥ मजठेवियेलेंदुरी ॥ नीचम्हणोनीबाहेरी ॥ २ ॥ नारामहादागोंदाविठा ॥ ठेवियेलेअग्रवाटा ॥ ३ ॥ देवाकधींभेटीदेसी ॥ आपुलीह्मणोनिजनीदासी ॥ ४ ॥ ॥ ॥ १००८ ॥

माझाहाविठ्ठलयेईलवोजेव्हां ॥ जेवीनमीतेव्हांगोणाबाई ॥ १ ॥ त्वरेंराउळासीजावोनीयापाहों ॥ लवकरीबाहों भोजनासी ॥ २ ॥ ज्ञानेश्वराघरींजाउनीबैसला ॥ जाउनी विठ्ठलापहातेथें ॥ ३ ॥ भरलियारागेंक्रोधत्याचासाहे ॥ लवकरीबाहेभोजनासी ॥ ४ ॥ जनीह्मणेदेवाचलापुरुषो-

त्तमा ॥ खोळंबलानामाभोजनासी ॥ ५ ॥ ॥१००९॥

ज्ञानेश्वरह्मणेनाम्यासवेंजेविलासी ॥ नाहींहृषीकेशीह्मणतसे ॥ १ ॥ सांगितलेंएकभलतेंचिबोलसी ॥ ऐसीभ्रांतिकैसीज्ञानेश्वरा ॥ २ ॥ निरोपसांगावामाझाहाएकांतीं ॥ ह्मणेजनीप्रतिपांडुरंग ॥ ३ ॥ देवम्हणेनाम्याहेंएकावें वचन ॥ त्वांयावेंसाधूनवेळपुरती ॥ ४ ॥ जनीम्हणेआतां समजलेंमज ॥ धरीनउमजयेथोनिया ॥ ५ ॥ ॥१०१०॥

सिंहाचेंतेंनखपतिव्रतेचेस्तन ॥ वेंचलियाप्राणहातांनये ॥ १ ॥ शूराचेंतेंशस्त्रकृपणाचेंधन ॥ वेंचलियाप्राणहातांनये ॥ २ ॥ गजमाथांमोतीसर्पाचातोमणी ॥ वेंचलियाप्राण हातांनये ॥ ३ ॥ विराल्यावांचूनदेहींदेहभाव ॥ जनीम्हणे देवहातांनये ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ १०११ ॥

सांवळेंश्रीमुखहृदयींबिंबलें ॥ तरीहेंपावलेंदेहभ्रांति ॥ १ ॥ धन्यमाझाजन्मधन्यमाझाभाव ॥ हृदयींपंढरीराव नांदतसे ॥ २ ॥ आशातृष्णादोन्हीमावळल्यादेहीं ॥ चित्तविठ्ठलपाईंजडोनीठेलें ॥ ३ ॥ नामयाचीजनीविश्रांति जाहली ॥ हृदयींवाइलीविठ्ठलमूर्ति ॥ ४ ॥ ॥ १०१२ ॥

गीतेवरीटीका ॥ जेणेंवाढविलीदेखा ॥ १ ॥ कनकताटामाजीं ॥ जेणेंवोगरिलीकांजी ॥ २ ॥ ज्ञानेश्वरावांचुनी ॥ टीकानव्हेम्हणेजनी ॥ ३ ॥ ॥ ॥ १०१३ ॥

पतंगसुखावलाभारी ॥ उडीघालीदीपावरी ॥ १ ॥ परितोदेहासीमुकला ॥ दोहीपदार्थीनाडिला ॥२॥ ऐसेअविद्येचेसंगतीं ॥ वायागेलेनेणोंकिती ॥ ३ ॥ ऐसेविषयानेंभुललें ॥ जनीह्मणेवायागेलें ॥ ४ ॥ ॥ १०१४ ॥

वैराग्यअभिमानेंफिरवितेंजातें ॥ ह्मणोनित्याचेहातेंखुंटलेंतें ॥ १ ॥ संचितमातृकावैरणघातिलें ॥ व्यक्ततेंबुडालें अव्यक्तेंसी ॥ २ ॥ नामतेंरूपादिदळियेलेंसर्व ॥ पीठभरी रावपंढरीचा ॥ ३ ॥ ऐसेंकार्यनकोकल्पनेचेमनीं ॥ नामयाचीजनीह्मणतसे ॥ ४ ॥ ॥ ॥ १०१५ ॥

गौळणपुसेगौळणींसी ॥ पुत्रजालायशोदेसी ॥ १ ॥ एकधांवतीयेकीपुढें ॥ वांटितातीसुंठवडे ॥ २ ॥ वाणभरूनीयाताटीं ॥ यशोदेचेघरींदाटी ॥ ३ ॥ ऐसीगलबलजाली ॥ दासीजनीहेलघाली ॥ ४ ॥ ॥१०१६ ॥

मगह्मणतीनंदाला ॥ पुत्रमुखपाहाचला ॥ १ ॥ स्नान घालुनीयात्यासी ॥ वस्त्रेंदिलींब्राह्मणांसी ॥२॥ परब्रह्मतेंपाहुनी ॥ ब्रह्मींमिळेदासीजनी ॥ ३ ॥ ॥१०१७ ॥

स्तनपानपाजायासी ॥ आलीपूतनामावसी ॥ १ ॥ तिचेहृदयावरीलोळे ॥ विठुमाझाक्रीडाखेळे ॥ २ ॥ मेलें मेलेंकृष्णनाथा ॥ तारीआतांमजअनंता ॥३॥ देहगेहेंहारविलें ॥ जनीह्मणेयाविठ्ठलें ॥ ४ ॥ ॥ ॥१०१८॥

आल्याब्राह्मणासीदान ॥ द्रव्यअपारदिलेंजाण ॥ १ ॥ गाईह्मशींचींखिल्लारें ॥ नेतांब्राह्मणभागले ॥ २ ॥ कृष्णजन्मलेनंदाघरीं ॥ रिद्धीसिद्धीकामकरी ॥ ३ ॥ कल्पवृक्षाची दाटणी ॥ कामधेनूचींदुभणीं ॥ ४ ॥ ऐसाआनंददेखोनी ॥ हारुषलीदासीजनी ॥ ५ ॥ ॥ ॥ १०१९ ॥

ब्रह्मावंदीज्याचेपाय ॥ त्यासीयशोदातीमाय ॥ १ ॥ ब्रह्मांडपाळकीं ॥ त्याचीहातेंटाळुमाखी ॥ २ ॥ क्षीरसिंधु ज्याचेचरणीं ॥ त्यासीपायांवरीनाहणी ॥ ३ ॥ शुकसनका-

दिकांससंगें ॥ तोजनीसीदळूंलागे॥ ४ ॥ ॥१०२०॥

अहोयशोदेचाहरी ॥ गोपिकासीक्रीडाकरी ॥ १ ॥ वेणुवाजवितोहरि ॥ सर्वदेवांसाहाकारी ॥ २ ॥ धांवेगाईचेतोपाठीं ॥ जनीह्मणेजगजेठी ॥ ३ ॥ ॥ १०२१ ॥

अरेविठ्याविठ्या ॥ मूळमायेच्याकारट्या ॥ १ ॥ तुझी रांडरंडकीझाली ॥ जन्मसावित्रीचुडाल्याली ॥ २ ॥ तुझें गेलेंमढें ॥ तुलापाहूनकाळरडे ॥३॥ उभीराहूनिअंगणीं ॥ शिव्यादेतदासीजनी ॥ ४ ॥ ॥ ॥ १०२२ ॥

पंढरीचावारकरी ॥ त्याचेपायमाझेशिरीं ॥ १ ॥ हो कांउत्तमचांडाळ ॥ पाईंठेवीनकपाळ ॥ २ ॥ वंद्यहोयहरिहरा ॥ सिद्धमुनिऋषीश्वरा ॥ ३ ॥ रामनामगर्जेवाणीं ॥ ह्मणेनामयाचीजनी ॥ ४ ॥ ॥ ॥ १०२३ ॥

स्वांदींऋषीनेंवाहिला ॥ बळीनेंद्वारपाळकेला ॥ १ ॥ ऐसाभक्ताधीनहोसी ॥ त्याचेवचनेंवर्तसी ॥ २ ॥ त्याचे गर्भवाससोसी ॥ कष्टहोतांअंबऋषी ॥ ३ ॥ सर्वदुःखांसी साहिलें ॥ जनीह्मणेदळणजालें ॥ ४ ॥ ॥ १०२४॥

कांगानिष्ठुरजालासी ॥ आपुलेबाळातेंसांडिसी ॥ १ ॥ तुजवांचूनियामाये॥जीवमाझाजाऊंपाहे ॥२॥ प्राणधरियला कंठीं ॥ जनीम्हणेद्यावीभेटी ॥ ३ ॥ ॥ ॥१०२५॥

आतांवाटपाहूंकिती ॥ बरवालक्ष्मीचापति ॥ १ ॥ आतांयेईपांडुरंगा ॥ भेटीदेईमजसांगा॥२॥ आतांबुडतेंभवजळीं ॥ सांभाळावीब्रिदावळी ॥ ३ ॥ आतांशरणआलेंतुज ॥ देवाधरूनकोदुजें ॥ ४॥ आतांरागसोडामनीं ॥ ह्मणेनामयाचीजनी ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ १०२६ ॥

हेंचिदेवाचेंभजन ॥ सदाराहेसमाधान ॥ १ ॥ येरअवघेसंसारिक ॥ इंद्रादिब्रह्मादिक ॥ २ ॥ वरकडाचापाडकिती ॥ जनीदेवासीबोलती ॥ ३ ॥ ॥ ॥१०२७॥

जिव्हालावीनस्मरणीं ॥ रितेमापेंनधरीगोणी ॥ १ ॥ नित्यनामाचीलाखोली ॥ गुरुआज्ञानेमेंपाळी ॥ २ ॥ मज भरंवसानामाचा ॥ गजरहादासीजनीचा ॥ ३ ॥१०२८॥

मनामागेंमनलाऊं ॥ तेथेंसर्वसुखपाहूं ॥ १ ॥ जाले नामासीबळकट ॥ तेथेंवैकुंठपायवाट ॥ २ ॥ आतांआम्हा कायउणें ॥ कृपाकेलीनारायणें ॥ ३ ॥ जनीह्मणेमन ॥ करूंदेवाचेआधीन ॥ ४ ॥ ॥ ॥ १०२९ ॥

आतांभीतनाहींदेवा ॥ आदिअंतआम्हाठावा ॥ १ ॥ जालेंनामासीबळकट ॥ तेणेंवैकुंठपायवाट ॥ २ ॥ ज्ञानवैराग्यविवेकबळें ॥ तेंतंवआम्हासवेंखेळे ॥ ३ ॥ दयाक्षमा आम्हापुढें ॥ जनीह्मणेजालेवेडे ॥ ४ ॥ ॥ १०३० ॥

आळवितांधांवघाली ॥ ऐसीप्रेमाचीभुकेली ॥ १ ॥ तें हेंयशोदेचेंबाळ ॥ नित्यपहातसेडोळा ॥ २ ॥ विठेवरीउभीनीट ॥ केलीपुंडलिकेंधीट ॥३॥ आनंदाचेंलेणेंल्याली ॥ पाहुनीदासीजनीधाली ॥ ४ ॥ ॥ ॥ १०३१ ॥

आतांआम्हीजातोंस्वामी ॥ दयाअसोंद्यावीतुम्हीं ॥१॥ बहुतदिवससांभाळकेला ॥ पुन्हांजन्मनाहींदिला ॥ २ ॥ थोरसुकृताचीरासी ॥ तुझेपायआम्हापाशीं ॥ ३ ॥ ऐसा नामदेवबोले ॥ ऐकोनीदासीजनीडोले ॥ ४ ॥ ॥१०३२॥

अनंतलावण्याचीशोभा ॥ तोहाविटेवरीउभा ॥ १ ॥ पीतांबरमाळकंठीं ॥ भाविकासीघालीमिठी ॥ २ ॥ त्याचे

चुरीहातपाय ॥ कष्टलीसमाझीमाय ॥ ३ ॥ आवडीनेंबोले
त्यासी ॥ चलाजाऊंएकांतासी ॥४॥ ऐसाप्रेमाचापुतळा ॥
दासीजनीपाहेडोळा ॥ ५ ॥ ॥ ॥ १०३३ ॥

विठ्ठलरुक्मिणी ॥ तुम्हीअखंडआणाध्यानीं ॥ १ ॥
मगसुखाकायउणें ॥ जालेंसोइरेंत्रिभुवन ॥ २ ॥ देवाकरा
धनी ॥ रिद्धीसिद्धीवाहेपाणी ॥ ३ ॥ लक्षलावावेंचरणीं ॥
म्हणेनामयाचीजनी ॥ ४ ॥ ॥ ॥ १०३४ ॥

घेतलेंपदरीं ॥ आतांनधरावेंदुरी ॥ १ ॥ तुम्हा
थोराचेंउचित्त ॥ हेंचिकायसांगूंतूतें ॥ २ ॥ ब्रह्मीयाच्या
ताता ॥ सखयारुक्मिणीच्याकांता ॥ ३ ॥ आपुलीम्हण-
वोनी ॥ आपंगावीदासीजनी ॥ ४ ॥ ॥ १०३५ ॥

विवेकसागर ॥ सखामाझाज्ञानेश्वर ॥ १ ॥ मरूनिया
जावें ॥ बामाझ्याच्यापोटायावें ॥ २ ॥ आतांमाझ्याभावा ॥
ऐसेंकरीज्ञानदेवा ॥ ३ ॥ जावेंवोवाळुनी ॥ जन्मोजन्मीं
म्हणेजनी ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ १०३६ ॥

पुंडलिकापाशीं ॥ नामाउभाकीर्तनासी ॥ १ ॥ येवोनि-
यापांडुरंग ॥ स्वयेंटाळधरीअंगें ॥२॥ गाऊंलागेबरोबरी ॥
नाहींबोलायाचीउरी ॥ ३ ॥ स्वरदेवाचाउमटला ॥ दासी
जनीनेंवोळखिला ॥ ४ ॥ ॥ ॥ १०३७ ॥

आलेवैष्णवांचेभार ॥ दिलेंहरिनामनगर ॥ १ ॥ अव-
घीदुमदुमलीपंढरी ॥ कडकडाटगरुडपारीं ॥ २ ॥ टाळ
मृदंगघुमाळी ॥ रंगींनाचेवनमाळी ॥ ३ ॥ ऐसाआनंदसो-
हळा ॥ दासीजनीपाहेडोळा ॥ ४ ॥ ॥ १०३८ ॥

चलापंढरीसीजाऊं ॥ रुक्मादेवीवरपाहूं ॥ १ ॥ डोळे

निवतीलकान ॥ मनातेथेंसमाधान ॥ २ ॥ स्नानकरूंभि-
वरेसी ॥ पुंडलिकापायापाशीं ॥ ३ ॥ डोळेभरोनीपाहूं
देवा ॥ तेणेंविसरूंदेहभावा ॥ ४ ॥ ऐसानिश्चयकरामनीं ॥
म्हणेनामयाचीजनी ॥ ५ ॥ ॥ ॥ १०३९ ॥

एकेदिवशींवाडियांत ॥ देवआलेअकस्मात ॥ १ ॥ अ-
वघीपायासींलागलीं ॥ देवेंत्यांवरीकृपाकेली ॥ २ ॥ जन
ऐसेंबोलती ॥ बाहेरमजळाहुडकिती ॥ ३ ॥ हातधुउनी
जवळआले ॥ कोठेंगेजनीहांसूनबोले ॥ ४ ॥ ॥१०४०॥

कोणीएकेदिवशीं ॥ विठूगेलाजनीपाशीं ॥ १ ॥ हळूच
मागतोखायाला ॥ ह्मणेकायदेऊंतुला ॥ २ ॥ हातधरूनी
नेलांआंत ॥ वाढीपंचामृतभात ॥ ३ ॥ प्रेमसुखाचाढेकर
दिला ॥ जनीह्मणेविठूधाला ॥ ४ ॥ ॥ १०४१ ॥

चोखामेळाभक्तभला ॥ देवतेणेंबाटविला ॥ १ ॥ चो-
खामेळ्याचीकरणी ॥ तेणेंदेवकेलाऋणी ॥ २ ॥ चोखामे-
ळाप्रियदेवा ॥ भुललासेत्याच्याभावा ॥ ३ ॥ चोखामे-
ळाविठ्ठलचरणीं ॥ ह्मणेनामयाचीजनी ॥ ४ ॥ ॥१०४२॥

लाहोलागलाआंबेचा ॥ विठाबाईमाउलीचा ॥ १ ॥
आदिठाणपंढरपुर ॥ नांदेकान्हाईसुंदर ॥ २ ॥ गोणाई-
नेंनवसकेला ॥ देवापुत्रदेईमला ॥ ३ ॥ शुद्धदेखोनिया
भाव ॥ पोटाआलेनामदेव ॥ ४ ॥ दामशेटीहारुषला ॥
दासीजनीलाआनंदजाला ॥ ५ ॥ ॥ ॥१०४३॥

नामदेवापुत्रजाला ॥ विठूबारशासीआला ॥ १ ॥ सा-
डीचोळीपेहरण ॥ शेलामुंडासंघेऊन ॥ २ ॥ सरीविंदलीं
माथलीं ॥ नानारत्नमुक्ताफळीं ॥ ३ ॥ ह्मणेयाचेंनांवका-

य ॥ दासीजनीलाआनंदहोय ॥ ४ ॥ ॥ १०४४ ॥

जात्यावरील्यागातासी ॥ दळणमिसेंगोविंदासो ॥ १ ॥ देहवुद्धीचेंवैरण ॥ वरवाकणतोनिसून ॥ २ ॥ ब्रह्मरसपीठसार ॥ घेणेंअवीटसाचार ॥ ३ ॥ विठ्ठलासीजेआवडी ॥ जनीह्मणेतेंचिगोडी ॥ ४ ॥ ॥ ॥ १०४५ ॥

येकलीचगाणेंगातां ॥ दुजासादउमटतां ॥ १ ॥ कोणगेतुझेबरोबरी ॥ गाणेंगातोतुझेघरीं ॥ २ ॥ अंतरींविचारितां ॥ देवादिसेतयाभक्ता ॥ ३ ॥ खूणकळलीनामदेवा ॥ विठ्ठलअसेजनीच्याभावा ॥ ४ ॥ ॥ ॥ १०४६ ॥

झाडलोटकरीजनी ॥ केरभरीचक्रपाणी ॥ १ ॥ पाटीभरुनीयाशिरीं ॥ केरनेउनीटाकीदुरी ॥ २ ॥ ऐसाभक्तीसीभुलला ॥ नीचकामकरूंलागला ॥ ३ ॥ जनीह्मणेबाविठ्ठला ॥ कायउतराईहोऊंतुला ॥ ४ ॥ ॥ १०४७ ॥

साळीकांडायासीकाढी ॥ पुढेंजाउनीउखळझाडी ॥ १ ॥ पाईंपैंजणहातींकडीं ॥ कोंडापाखडोनीकाढी ॥ २ ॥ सर्वा अंगींघामआला ॥ कासेपीतांबरभिजला ॥ ३ ॥ हाताआलेफोड ॥ जनीह्मणेमुसळसोड ॥ ४ ॥ ॥ १०४८ ॥

शेणीवेंचूंगेलेराणा ॥ पाठीमागेंउभाकान्हा ॥ १ ॥ जाईजाईराउळासी ॥ येथेंतूंकांबाआलासी ॥ २ ॥ पीतांबरींघालुनीकास ॥ शेणीवेंचीसावकाश ॥ ३ ॥ शेणीवेंचुनी भरलीमोट ॥ जनीह्मणेद्यावीगांठ ॥ ४ ॥ ॥ १०४९ ॥

माझेडोइचेकेसास ॥ नाहाणनव्हतेंबहुतदिवस ॥ १ ॥ तेणेंमुरकुंडीकेंसांस ॥ ह्मणेतुकावोउदास ॥ २ ॥ आपुले हातेंवेणीघाली ॥ जनीह्मणेमायजाली ॥ ३ ॥ ॥ १०५० ॥ समाप्त.

॥ श्रीः ॥

# नामदेवाची गाथा.

## नामदेवकृत बाळक्रीडेचे अभंग.

### अभंग पहिला.

श्रीगणेशायनमः ॥ ॥ लंबोदरातुझाशोभेशुंडादंड ॥ करीतसेखंडदुश्चिन्हांचा ॥ १ ॥ चतुर्भुजआयुधेंशोभतातीहातीं ॥ भक्तालारक्षितीनिरंतर ॥ २ ॥ भव्यरूपतुझेंउंदीरवहना ॥ नमनचरणाकरीतसें ॥ ३ ॥ नामघेतांतुझेंदोषजळताती ॥ कळिकाळकांपतीतुझ्यानामें ॥ ४ ॥ चौदाविद्यातुझ्याकृपेनेंयेतील ॥ मुकेबोलतीलवेदघोष ॥ ५ ॥ रुणझुणपायींवाजतातीवाळे ॥ देखोनीभुललेंमनमाझें ॥ ६ ॥ भक्तवत्सलातूंपार्वतीनंदना ॥ मस्तकचरणांठेवीतसें ॥ ७ ॥ नामाह्मणेआतांदेईंमजस्फूर्ति ॥ वर्णीतसेंकीर्तिकृष्णजींची ॥ ८ ॥ ७ ॥ ७ ॥ ७ ॥ ७ ॥ १ ॥

सरस्वतीमातेद्यावीमजस्फूर्ति ॥ येतोकाकुळतीतुजलागीं ॥ १ ॥ लाडकेंलडिवाळमागतसेंतुज ॥ वंदीतसेंरज चरणींचें ॥ २ ॥ त्वरेंयेउनीयांशिरींठेवीहात ॥ जाईलहे भ्रांततेव्हांमाझी ॥ ३ ॥ आपुल्याबाळासीधरींआतांहातीं ॥ नकरीफजितीजनांमध्यें ॥ ४ ॥ विश्वात्माजोहरित्याचीवर्णीकीर्ति ॥ आवडीचाओतीरसमाये ॥ ५ ॥ ऐकोनियांस्तवझालीसेप्रसन्न ॥ नाम्यातवअभिमानमजलागीं ॥ ६ ॥ २

प्रल्हादनारदपराशरपुंडरीक ॥ व्यासआणिवाल्मीकनमियेले ॥ १ ॥ दालभ्यतोभीष्मअंबरीषशौनक ॥ ब्रह्मनिष्ठशुकनमियेले ॥ २ ॥ रुक्मांगदअर्जुनवसिष्ठाविभीषण ॥ केलेंसेनमनतयांलागीं ॥ ३ ॥ टीकाकारश्रीधरबहिरंभट चतुर ॥ करानिरंतरकृपामज ॥ ४ ॥ साधुसंतासिद्धशिरींठेवाहात ॥ वर्णीनसमस्तकृष्णलीला ॥ ५ ॥ नामामनींआठवीखेचरचरण ॥ तयाच्याकृपेनेंसिद्धिजावो ॥ ६ ॥ ३ ॥

देवाआदिदेवासर्वत्रांच्याजीवा ॥ एकवासुदेवादयानिधे ॥ १ ॥ ब्रह्माआणिइंद्रावंद्यसदाशिवा ॥ एकवासुदेवा दीनबंधु ॥ २ ॥ चौदालोकपालकरितीतुझीसेवा ॥ एकवासुदेवाकृपासिंधु ॥ ३ ॥ योगियांचेध्यानींनातुडसीदेवा ॥ एकवासुदेवाजगद्गुरु ॥ ४ ॥ निर्गुणनिराकारनाहींतुजमाया ॥ एककृष्णरायाकानडीया ॥ ५ ॥ करुणेचापर्जन्याशींपीमजतोया ॥ एककृष्णरायागोजरीया ॥ ६ ॥ नामाह्मणे जरीदाखविसीपाया ॥ तरीवदावयास्फूर्तिचाले ॥ ७ ॥ ४

क्षीरसागरांतअससीबैसला ॥ धांवोनीमजलाभेटीदेई ॥ १ ॥ शेषावरीजरीअससीनिजला ॥ धांवोनीमजला भेटीदेई ॥२॥ कैलासींचाशिवपूजितोतुजला ॥ धांवोनिमजलाभेटीदेई ॥ ३ ॥ गहिवरोनीनामाबहातविठ्ठला ॥ धांवोनीमजलाभेटीदेई ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ५ ॥

चक्रवाकपक्षीवियोगेंबहाती ॥ झालेंमजप्रतीतैसेंआतां ॥ १ ॥ चुकलियामायबालकेंरडती ॥ झालेंमजप्रतीतैसेंआतां ॥ २ ॥ गाईनदेखतांवत्सेंहंबरती ॥ झालेंमजप्रती तैसेंआतां ॥ ३ ॥ जीवनावेगळेमत्स्यतळमळती ॥ झालें

मजप्रतीतैसेंआतां ॥ ४ ॥ नामाह्मणेमजऐसेंवाटेचित्तीं ॥ करीतसेखंतीफारतुझी ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ६ ॥

कायमाझाआतांपाहतोसीअंत ॥ येईबाधांवतदेवराया ॥ १ ॥ माझ्याजीवाहोयतुजवीणआकांत ॥ येईबाधांवतदेवराया ॥२॥ असेजरीकामभेटूनिजायमातें ॥ येईबाधांवत देवराया ॥ ३ ॥ येरेयेरेदेवानामातुजबहात ॥ येईबाधांवतदेवराया ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

नवर्णवेवाचेजन्ममरणदुःख ॥ दावींआतांमुखपांडुरंगा ॥ १ ॥ कुरळकेशभाळींशोभतोटिळक ॥ दावींआतांमुखपांडुरंगा ॥ २ ॥ भोंवयाव्यंकटाशोभतीसुरेख ॥ दावींआतांमुख पांडुरंगा ॥ ३ ॥ कमळाकारनेत्रसुंदरनासिक ॥ दावींआतां मुखपांडुरंगा ॥ ४ ॥ कर्णींचींकुंडलेंनवर्णवेहाटक ॥ दावीं आतांमुखपांडुरंगा ॥ ५ ॥ अधरारक्तदंतइंदुहूनिअधिक ॥ दावींआतांमुखपांडुरंगा ॥ ६ ॥ विष्णुदासनामातुझेंचिवाळक ॥ दावींआतांमुखपांडुरंगा ॥ ७ ॥ ॥ ॥ ८ ॥

बाहुबळेंतुवांकाढिलेंअमृत ॥ ठेवीबातोहातशिरावरी ॥ १ ॥ जननीमाझीजेव्हांज्याकडेपहात ॥ ठेवीबातोहातशिरावरी ॥ २ ॥ देवांबैसवोनीसुधेतेंवांटीत ॥ ठेवीबातोहात शिरावरी ॥ ३ ॥ क्षीराचासागरउपमन्यूसीदेत ॥ ठेवींबा तोहातशिरावरी ॥ ४ ॥ घेउनीयांचक्रपरीक्षितारक्षीत ॥ ठेवींबातोहातशिरावरी ॥ ५ ॥ कौटाळिलेंजेव्हांध्रुवासी वनांत ॥ ठेवीबातोहातशिरावरी ॥ ६ ॥ विदुराच्याघरीं कण्याजोभक्षीत ॥ ठेवींबातोहातशिरावरी ॥ ७ ॥ चिरंजीवकरुनीनगरीलंकादेत ॥ ठेवींबातोहातशिरावरी ॥ ८ ॥

नामाह्मणेयुद्धींरक्षियेलापार्थ ॥ ठेवींबातोहातशिरावरी ॥९

रुणझुणपायींवाजतातीवाळे ॥ दावींतींपाउलेंदयानिधी ॥ १ ॥ जनकश्रुतदेवयांच्याघरींगेलीं ॥ दावींतींपाउलेंदयानिधी ॥ २ ॥ धरीयेलेंनक्रातेव्हांजींधांवलीं ॥ दावींतींपाउलेंदयानिधी ॥ ३ ॥ वस्त्रहरणींजींद्रौपदीनेंचिंतिलीं ॥ दावींतींपाउलेंदयानिधी ॥ ४ ॥ देखोनियांज्यांतेंकौरवते भ्याले ॥ दावींतींपाउलेंदयानिधी ॥ ५ ॥ धर्मआणिभीष्म विदुरादिकधाले ॥ दावींतींपाउलेंदयानिधी ॥ ६ ॥ स्वयंवरासीजातांशिळेउद्धरिलें ॥ दावींतींपाउलेंदयानिधी ॥ ७ ॥ नामाह्मणेज्यांतेंबळीनेंपूजिलें ॥ दावींतींपाउलेंदयानिधी ॥ ८ ॥ । ॥ ॥ ॥ ॥ १० ॥

आडखळोनीपडसीघालूंनकोजोडा ॥ धांवतदुडदुडांयेईआतां ॥ १ ॥ बैसावयासाठींघेऊंनकोघोडा ॥ धांवतदुडदुडायेईआतां ॥२॥ भोजनावैससीयेथेंघेईंविडा ॥ धांवत दुडदुडायेईआतां ॥ ३ ॥ बाहुबळेंकाढिलादेवांचाजोखोडा ॥ धांवतदुडदुडायेईआतां ॥ ४ ॥ नामाम्हणेसुखीलक्ष्मीचा हाचुडा ॥ धांवतदुडदुडायेईआतां ॥ ५ ॥ ॥ ११ ॥

येरेयेरेदेवादेईनतुलापेढा ॥ त्यालाबाहेवेडानामदेव॥१॥ ज्याचेपायींअसेबिरुदाचातोडा ॥ त्यालाबाहेवेडानामदेव ॥ २ ॥ जनीपुसेसुखीरखुमाईचाजोडा ॥ त्यालाबाहेवेडा नामदेव ॥ ३ ॥ यावयासीयेथेंआळसतुम्हीसोडा ॥ घेईन इडापिडानामाह्मणे ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ १२

युगाऐसेंपळतुजवीणजाय ॥ पहातोसीकायअंतमाझा ॥ १ ॥ कोमळहृदयतुझेंपंढरीराया ॥ कठिणसखयाकैसेंकेलें

॥ २ ॥ विचारिसीचित्तींदुर्लभहरिहरा ॥ कैसाजाऊंघरारं-
काचिया ॥ ३ ॥ अंगीकारावरीअव्हेराचीमात ॥ नव्हेहें
उचितदेवराया ॥ ४ ॥ मागेंजीजीआळीकेलीवासुदेवा ॥
उदाराकेशवापुरविली ॥ ५ ॥ नुपेक्षिसीऐसाचित्तासीभरंव-
सा ॥ दिसोनीनिराशाआलीआतां ॥ ६ ॥ वांचोनियांदुःख
भोगावेंरेआतां ॥ प्राणांसीमुकतांतेंचिभलें ॥ ७ ॥ वर्णितां
तोनामाझालासमाधिस्थ ॥ जहालेंविदितपांडुरंगा ॥८॥ १३

त्वरें धांवोनियाआलासेगोविंद ॥ सावधसावधनामदेवा
॥ १ ॥ रुसलासेनामादेवासींनबोले ॥ करेंकुरवाळिलेंवदन
तेव्हां ॥२॥ समजावोनिदेवेंधरियेलापोटाशीं ॥ बोलरेमज-
शींनामदेवा ॥३॥ नामाह्मणेदेवाउशीरकांकेला ॥ किंवामा-
झाआलातुजराग ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ १४

वेळोवेळांतुजबाहेवेडाभक्त ॥ राहूंनेदीनिवांतक्षणभरी ॥
१ ॥ मागेंबहुतांनींकेलेरेप्रबंध ॥ पाहोनियांछंदवेडावलों ॥
२ ॥ माथांठेवीहातविश्वाचाजोबाप ॥ वर्णीरेप्रतापनाम-
देवा ॥ ३ ॥ नामाह्मणेतेव्हांजाहलासंतोष ॥ मगकवित्वा-
सआरंभिलें ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ १५

करीलजोप्रश्नसांगेलजोकथा ॥ श्रवणाकरितांउद्धर-
ती ॥ १ ॥ कथाभागीरथींस्नानजेकरिती ॥ त्यांचेउद्धर-
तीपूर्वजते ॥ २ भागीरथीस्नानाश्रमलागेफार ॥ करावेंए-
काग्रमनयेथें ॥ ३ ॥ नामाह्मणेऐसेंबोलेभागवत ॥ श्रीशु-
कसांगतपरीक्षिती ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ १६

पापीजेअभक्तदैत्यतेमातले ॥ धरणीसीझालेंओझेंत्यांचें
॥१॥ दिधलासेत्रासदेवमुनिसर्वां ॥ नपूजितीदेवाकोणीते-

व्हां ॥ २ ॥ राहियेलेयज्ञमोडिलींकीर्तनें ॥ पळालेब्राह्मण दैत्यांभेणें ॥ ३ ॥ धेनुरूपेपृथ्वीब्रह्मयापाशींजाय ॥ नेत्रींवाहेतोयसांगतसे ॥४॥ बुडविलाधर्मअधर्मझालाफार ॥ सोसवेनाभारमजआतां ॥ ५ ॥ ब्रह्माइंद्रआणिबरोबरीशिव ॥ चालियेलेसर्वक्षीराब्धीसी ॥ ६ ॥ नामाह्मणेआतां करितीलस्तुती ॥ सावधानाचित्तींपरिसावें ॥ ७ ॥ ॥ १७

वासुदेवाहृषीकेशामाधवामधुसूदना ॥ करितातीस्तवना पुरुषसूक्तें ॥ १ ॥ पद्मनाभात्रिलोकेशावामनाजलशायी ॥ आम्हांकोणीनाहींतुजवीण ॥२॥ जनार्दनाहरीश्रीवत्सलागरुडध्वजा ॥ पावअधोक्षजाआतांआम्हां ॥ ३ ॥ वराहा पुंडरीकानृसिंहानरकांतका ॥ वैकुंठनायकादेवराया ॥ ४ ॥ अच्युताशाश्वताअनंताअजाअव्यया ॥ कृपेच्याअभयादेईं आम्हां ॥ ५ ॥ नारायणाध्यक्षाकैटभभंजना ॥ करीरेमर्दनादुष्टांचिया ॥ ६ ॥ चक्रगदाशंखपाणीनरोत्तमा ॥ पावपुरुषोत्तमादासातुझ्या ॥ ७ ॥ रामाहयग्रीवाभीमारौद्रोद्भवा ॥ आश्रयभूतांसर्वांतुझाअसे ॥ ८ ॥ श्रीधराश्रीपतेचतुर्बाहो मेघश्यामा ॥ लेंकुरेंआह्मीआह्मांपावत्वरें ॥ ९ ॥ नामाह्मणे ऐसेंकरितांस्तवन ॥ तोषलाभगवानक्षीराब्धींत ॥१०॥ १८

आकाशींचीवाणीसांगेसकळांसी ॥ तळमळमानसींकरूं नका ॥ १ ॥ देवकीच्यागर्भायेईलभगवान ॥ रक्षीलब्राह्मणगायीभक्त ॥ २ ॥ उतरीलभारमारीलदैत्यांसी ॥ आनंदसर्वांसीकरीलतो ॥ ३ ॥ रोहिणीउदरींशेषबळीभद्र ॥ यादवसमग्रव्हारेतुह्मी ॥ ४ ॥ ऐकोनियांऐसेंआनंदमानसीं ॥ येतीस्वस्थळासीनामाह्मणे ॥ ५ ॥ ॥ १९

शेषाप्रतीबोलेलक्ष्मीचातोवर ॥ चलाअवतारघेऊंआ-
तां ॥ १ ॥ पृथ्वीवरीदैत्यमातलेतेफार ॥ गाऱ्हाणेंसुरवर
सांगूंआले ॥ २ ॥ शेषह्मणेमजश्रमझालेफार ॥ यालागीं
अवतारमीनघेंची ॥ ३ ॥ रामअवतारींझालोंमीलक्ष्मण ॥
सेविलेंअरण्यतुह्मांसवें ॥ ४ ॥ चौदावर्षेंवरीकेलेंउपोषण ॥
जाणतांआपणप्रत्यक्षहें ॥ ५ ॥ नामाह्मणेऐसेंवदेधरणीध-
र ॥ हांसोनिश्रीधरकायबोले ॥ ६ ॥ ॥ ॥ २० ॥

पूर्वींतूंअनुजझालासीकनिष्ठ ॥ सोसियेलेकष्टमजसवें ॥
१ ॥ आतांतूंवडीलहोईगासर्वज्ञा ॥ पाळीनमीआज्ञातुझी
बारे ॥ २ ॥ देवकीउदरींरहावेंजाउनी ॥ मायेसीमागुनी
पाठवितों ॥ ३ ॥ योगमायातूजकाढीलतेथून ॥ घालील
नेऊनगोकुळासी ॥ ४ ॥ लक्ष्मीसीसांगेतेव्हांहृषीकेशी ॥
कौंडिन्यपुरासींजावेंतुह्मीं ॥ ५ ॥ नामाह्मणेऐसाकरुनीवि-
चार ॥ घ्यावयाअवतारासिद्धअसे ॥ ६ ॥ ॥ २१ ॥

वसुदेवादेतदेवकीबहीण ॥ लग्नामध्येंविघ्नझालेंऐका ॥
१ ॥ आकाशींचीवाणीसांगतसेकंसा ॥ मानीहाभरंवसा
बोलण्याचा ॥ २ ॥ आठवाजोपुत्रवधीलतुजसी ॥ ऐको-
नीमानसींक्रोधावला ॥ ३ ॥ घेऊनियांखड्गमारायाधांवला ॥
हाततोधरिलावसुदेवें ॥ ४ ॥ देईनमीपुत्रसत्यमाझेंमानी ॥
ठेवाबंदीखानींदूतांसांगे ॥ ५ ॥ पुण्यसरावयाभेटेदेवऋषी
वधीबाळकांसीठेवूंनको ॥ ६ ॥ होतांचिप्रसूतनेऊनियांदे-
त ॥ साहाहीमारीतदुराचारी ॥ ७ ॥ धन्यत्याचेंज्ञाननक-
रीचशोक ॥ वधितांबाळकनामाह्मणे ॥ ८ ॥ ॥२२॥

सातवाजोगर्भयोगमायानेंत ॥ आश्चर्यकरीतमनामाजीं ॥ १ ॥ रोहिणीउदरींनेवोनीघातला ॥ नकळेकोणालादेवावीण ॥ २ ॥ कंसाचियाभेणेंयादवपळाले ॥ ब्राह्मणराहिलेअरण्यांत ॥ ३ ॥ नाहींकोणासुखतळमळमानसीं ॥ वधीलदुष्टांसीकोणआतां ॥ ४ ॥ विश्वाचाजोआत्माकळलेंतयाला ॥ दावितसेलीलासंभूतीची ॥ ५ ॥ अहर्निशींध्यानभक्तांचेंमानसीं ॥ स्थापीलधर्मासीनामाह्मणे ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥२३

देवकीचेंतेजदिसेजैसासूर्य ॥ कंसाचेंहृदयजळतसे ॥१॥ हरणेंपळतीदेखोनियांव्याघ्र ॥ कांपेथरथरतयापरी ॥ २ ॥ अजासर्पन्यायेंकीटकभ्रमर ॥ दिसेनारीनरकृष्णरूप ॥ ३ जेवितांबोलतांसेजेसीनिजे ॥ आलाआलामजमारावया ॥ ४ ॥ नाशीलहाआतांदैत्यांचेंतेंबंड ॥ फाटलीसेगांडतेव्हांत्याची ॥ ५ ॥ नामाह्मणेभयेंलागलेंसेंध्यान ॥ चराचरींकृष्णदिसतसे ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥२४

विमानांचीदाटीअंतरिक्षींदेव ॥ करितातीसर्वगर्भस्तुति ॥ १ ॥ सत्राअक्षरांतअसेतुझीमूर्ती ॥ यज्ञेशातुजप्रतीनमोनमो ॥ २ ॥ साजणेंभांडतीनवजणीस्थापिती ॥ नकळेकोणाप्रतीअंततुझा ॥ ३ ॥ अठराजणेंतुझीवार्णितातीकीर्ति ॥ गुणातीताश्रीपतीतुजनमो ॥ ४ ॥ चौघाजणांतुझानकळेचिपार ॥ श्रमसिवारंवारआह्मांसाठीं ॥ ५ ॥ अठ्यायशींसहस्त्रवार्णितातीतुज ॥ ब्रह्मांडाचेंबीजतुजनमो ॥ ६ ॥ जन्ममरणाचेंनाहींतयांभय ॥ आठवितीपायतुझेजेकां ॥ ७ ॥ नवजणीतुझ्यापायींलोळताती ॥ परब्रह्ममूर्तीतुज

नमो ॥ ८ ॥ नामाह्मणेऐशीकरितातीस्तुति ॥ पुष्पेंवाहूनि जातीस्वस्थळासी ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ २५ ॥

मयूरादिपक्षीनृत्यकरिताती ॥ नद्यावाहाताती दोहींथ-ड्या ॥ १ ॥ भूमीवरीसडेकेशरकस्तूरी ॥ आनंदअंतरींस-कळांच्या ॥ २ ॥ विमानांचीदाटीसुरवरयेती ॥ गंधर्व गातातीसप्तस्वरें ॥ ३ ॥ मंदमंदमेघगर्जनाकरिती ॥ वाद्यें वाजतातीनानापरी ॥ ४ ॥ नामाह्मणेस्वर्गींनगारेवाजती ॥ अप्सरानाचतीआनंदानें ॥ ५ ॥ ॥ ॥ २६ ॥

दशरथेंमारिलातोचिहोतामास ॥ वर्षाऋतुवासकृष्ण-पक्ष ॥ १ ॥ वसुनामातिथिबुधवारअसे ॥ शुकसांगतसेप-रीक्षिती ॥ २ ॥ रोहिणीनक्षत्रदोनप्रहररात्र ॥ मायाघा-लीअस्त्ररक्षपाळां ॥ ३ ॥ नवग्रहअनुकूळसर्वांचेंजेंमूळ ॥ वसुदेवकपाळधन्यधन्य ॥ ४ ॥ जयाचातोवंशतयासींआनं-द ॥ माझ्याकुळींगोविंदअवतरला ॥ ५ ॥ अयोनिसंभव नोहेकांहींश्रमी ॥ नामयाचास्वामीप्रगटला ॥ ६ ॥ ॥२७॥

कोटीशाआदित्यगोठेएकेठायीं ॥ तेजेंदिशादाहीउजळ-ल्या ॥ १ ॥ घाबराहोउनीवसुदेवपाहे ॥ हृदयींआश्चर्यक-रीतसे ॥ २ ॥ मुकुटावरीरत्नेंनक्षत्रांचामेळा ॥ भाळींशो-भेटिळाकेशराचा ॥ ३ ॥ व्यंकटाभृकुटीकमळाकरनेत्र ॥ नासिकाविचित्रशुकचंचु ॥ ४ ॥ विद्युल्लतेऐशींझळकतीकुंड-लें ॥ अधरकोंवळेअरुणोदय ॥ ५ ॥ कंबुग्रीवकंठहृदयीं वत्सलांछन ॥ ब्रह्मयासीशीणनकळेअंत ॥ ६ ॥ चतुर्भुज शंखचक्रगदापद्म ॥ चिमणामेघश्यामवर्णज्याचा ॥ ७ ॥ कौस्तुभनिर्मळवैजयंतीमाळा ॥ कांसेसोनसळाहाटकवर्ण

॥ ८ ॥ रुणझुणरुणझुणवाजतातीवाळे ॥ आरक्तवर्तुळन-
खींशोभा ॥ ९ ॥ ध्वजवज्रांकुशजैशींरातोत्पळें ॥ नामा
ह्मणेडोळेदिपताती ॥ १० ॥ ॥ ॥ ॥२८॥

अयुतगायीब्रह्मणांसीं ॥ सोडीसंकल्पमानसीं ॥ १ ॥
ओळखिलेंतुज ॥ आतांकळलासीमज ॥ २ ॥ धर्मस्था-
पावया ॥ येथेंयेसीदेवराया ॥ ३ ॥ आलिंगितांदोहींबा-
हीं ॥ नामाह्मणेडोईपायीं ॥ ४ ॥ ॥ ॥ २९ ॥

सोडासोडामिठी ॥ लपवालपवाजगजेठी ॥ १ ॥ ह्मणी
कंसासीकळेल ॥ माझ्याबाळासीमारील ॥ २ ॥ वसुदेवा
चिंतामनीं ॥ तेजनमायगगनीं ॥ ३ ॥ नामाह्मणेआलेंहं-
सें ॥ देवतेव्हांसांगतसे ॥ ४ ॥ ॥ ॥ ३० ॥

नंदाच्याघराला ॥ मजनेईंगोकुळाला ॥ १ ॥ माया
उपजलीतेथें ॥ ठेवीमजआणीयेथें ॥ २ ॥ ह्मणसीअसेर-
क्षपाळ ॥ तेम्यांमोहिलेसकळ ॥ ३ ॥ आच्छादितरूप ॥
नामाह्मणेमाझाबाप ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ३१ ॥

उचालिलाकमळापती ॥ पायींचींबंधनेंगळती ॥ १ ॥
त्रैलोक्यांतजोनमाय ॥ त्यासीबंधनकरीलकाय ॥ २ ॥ क-
वाडेंउघडती ॥ देखतांचिदेवांप्रती ॥ ३ ॥ मंदमंदपडेपा-
ऊस ॥ शिरींछायाकरीशेष ॥ ४ ॥ पूरचढलाआचाट ॥
त्यासीलाविलाअंगुष्ठ ॥ ५ ॥ त्वरेंआलानंदाघरीं ॥ नि-
द्रिस्तत्यानरनारी ॥ ६ ॥ ठेवीतेथेंकृष्णजीला ॥ मायाघे-
उनीनिघाला ॥ ७ ॥ रडेमायाकरीआकांत ॥ नामाह्मणे
उठतीदूत ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३२ ॥

पूर्णब्रह्ममानीकंसाच्याभयासी ॥ वाटेलमानसींकोणा-

चिया ॥ १ ॥ इच्छामात्रेंकरीसृष्टीचाप्रलय ॥ त्यासीअसे भयकवणाचें ॥ २ ॥ नंदाचेंसुकृतझालेंअगणीत ॥ म्हणो-नीभगवंतआलातेथें ॥ ३ ॥ सर्वांसुखहोयतरतीललोक ॥ नामाह्मणेशुकसांगतसे ॥ ४ ॥ ॥ ॥ ३३ ॥

तांतडीनेंजाती ॥ कंसासेवकसांगती ॥ १ ॥ उपजला वैरी ॥ त्यासीतूंरेत्वरेंमारी ॥ २ ॥ त्वरेंधांवघाली ॥ पाहे कन्याउपजली ॥ ३ ॥ ज्याचाघाकतूज ॥ नव्हेकन्याद्यावी मज ॥ ४ ॥ मारायासीखड्गघाली ॥ हातींचीनिष्टूनियां गेली ॥ ५ ॥ तुजलागीवधी ॥ उपजलामजआधीं ॥ ६ ॥ सांगेब्रह्मज्ञान ॥ देवकीचेंसमाधान ॥ ७ ॥ नामाह्मणेतये वेळीं ॥ त्यांचींबंधनेंकाढिलीं ॥ ८ ॥ ॥ ॥ ३४ ॥

बोलावूनिअवघीयांतें ॥ कंसपाहेविचारातें ॥ १ ॥ को-णीएकतेबोलती ॥ आह्मांठावींदेववस्ती ॥ २ ॥ जेथेंपुराण कीर्तन ॥ गायीब्राह्मणकरितीयज्ञ ॥ ३ ॥ तेथेंअसेनाराय-ण ॥ वधूंतयासीजाऊन ॥ ४ ॥ वैरीसहजचिमरेल ॥ ऐसे बोलतातीबोल ॥ ५ ॥ कंसामानवलेंजाण ॥ करामजसा-ठींयत्न ॥ ६ ॥ नामयाच्याछंदें ॥ नंदकरितोआनंद ॥ ७ ॥ ३५

शुकह्मणेरायाऐकपरीक्षिती ॥ श्रवणकरितांतृप्तिनाहीं तुज ॥ १ ॥ मायाजातांमथुरेसावधनिद्रिस्त ॥ देखिलाभग-वंतयशोदेनें ॥ २ ॥ अनंतब्रह्मांडेंउदरींनकळेकोणाला ॥ वाजवितीथाळाजन्मकाळीं ॥ ३ ॥ यज्ञभोक्ताकृष्णत्यासीदे-तीबोळा ॥ ध्यानींध्यायभोळासदाशिव ॥ ४ ॥ गौळणी बाहातीनंदालागींतेव्हां ॥ पुत्रमुखपहानामाह्मणे ॥ ५ ॥ ३६

विश्वाचाजोबापहातींज्याच्यासूत्र ॥ ह्मणवितोपुत्रनंद-

जीचा ॥ १ ॥ तीर्थें ज्याच्या चरणीं करिताती न्हाणी ॥ यशोदा जननी ह्मणताती ॥ २ ॥ वेडावला शेष शिणले वेद चारी ॥ निजे मांडीवरी यशोदेच्या ॥ ३ ॥ शरणागता देत क्षीरसिंधु दान ॥ चोखीत से स्तन आवडीनें ॥ ४ ॥ त्रैलोक्याचा राजा वर्णूं काय रंक ॥ ऐका वें जातक नामा ह्मणे ॥ ५ ॥ ॥ ३७

करूनियां स्नान ॥ वस्त्रें घेतलीं नूतन ॥ १ ॥ पाचारा ब्राह्मण ॥ शृंगारावें देवसदन ॥ २ ॥ बाहा बाहा दशग्रंथी ॥ त्यांसी सांगा आणा पोथी ॥ ३ ॥ त्वरें बाहारे ज्योतिषी ॥ नंद करी जातकासी ॥ ४ ॥ केलें देवतार्चन ॥ द्विज सांगती तर्पण ॥ ५ ॥ फार त्याला सुख ॥ पाहे कृष्णजीचें मुख ॥ ६ ॥ करी पुण्याहवाचन ॥ नामा ह्मणे आनंदानें ॥ ७ ॥ ॥ ३८

आला जगदोद्धार ॥ त्याचें भरलें भांडार ॥१॥ सुशोभित दिसे मही ॥ दोन लक्ष दिल्या गायी ॥२॥ तिळ तांदुळ पर्वत ॥ द्रव्यें वांटी अगणित ॥ ३ ॥ एक जाती एक येती ॥ ओझें उचलितां कुंथती ॥ ४ ॥ भाट वर्णिताती ॥ नामा म्हणे ज्याची कीर्ति ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३९॥

तुतारे भोंवारे वाजंत्री वाजती ॥ अस्परा नाचती थय थया ॥ १ ॥ झणझणा झणझणा झांजा गर्जताती ॥ नौबदा वाजती धों धों धों धों ॥ २ ॥ सुरवर येती विमानाची दाटी ॥ करिती पुष्पवृष्टि देवावरी ॥ ३ ॥ नारद तुंबर गंधर्व किन्नर ॥ गाती सप्तस्वर सर्व तेव्हां ॥ ४ ॥ कीर्तनाचा घोष टाळांचा गजर ॥ मृदंग सुस्वर वाजताती ॥ ५ ॥ केंशर गंध टिळा लाविती से भाळा ॥ घाली पुष्पमाळा द्विजा कंठीं ॥ ६ ॥ घरोघरीं नंद धाडी शर्करेसी ॥ वस्त्रें सुहृदासी नामा ह्मणे ॥७॥ ४०॥

ब्राह्मणआशीर्वाददेती ॥ नंदापुसोनिनिघती ॥ १ ॥ चलाचलाह्मणतीलोक ॥ पाहूंनंदाचेंबाळक ॥ २ ॥ नरनारीअलंकार ॥ शृंगारिलेंहोनगर ॥ ३ ॥ दैन्यदारिद्यअपयश ॥ पळतीमानूनियांत्रास ॥ ४ ॥ आणितातीबाळालेणें ॥ स्त्रियापाहतीश्रीकृष्ण ॥ ५ ॥ नामाह्मणेपाहतांमुख ॥ हारपलीतहानभूक ॥ ६ ॥ ॥ ॥ ४१ ॥

पाटावरीबैसविती ॥ गोपीअक्षवणेंकरिती ॥१॥ ब्रह्मादिकदेखतीमाथा ॥ त्यासीलावितीअक्षता ॥ २ ॥ नव्हेप्राकृतबालक ॥ परस्परेंह्मणतीलोक ॥ ३ ॥ ध्वजवज्रांकुशचिन्हा ॥ आलावैकुंठींचाराणा ॥ ४ ॥ येतीवेळोवेळां ॥ नामाह्मणेपाहतीडोळां ॥ ५ ॥ ॥ ॥ ४२ ॥

द्रव्यद्यावयासी ॥ नंदगेलामथुरेसी ॥ १ ॥ तेथेंभेटेवसुदेव ॥ सांगितलेंगुह्यसर्व ॥ २ ॥ कंसाचेमानसीं ॥ घातइच्छीगोकुळासी ॥ ३ ॥ जाईजाईरेत्वरित ॥ होतीगोकुळींआघात ॥ ४ ॥ नामाह्मणेऐसेंसांगे ॥ नंदतेथूनियानिघे ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४३ ॥

कंसेंपाठविलीमायावीपूतना ॥ देवोनियांस्तनाबाळेंमारी ॥ १ ॥ दीनदुर्बळांचींमारीतबाळकें ॥ करितातीशोकमायबाप ॥ २ ॥ गाहिंवरोनितेव्हांपुसेपरीक्षिती ॥ भगवंतांचीमूर्तिबाळरूप ॥ ३ ॥ अभयदेतसेबापानकोरडूं ॥ तेंकायघुंगरडूंमारूंशके ॥४॥ जेथेंपुराणेंहीवर्णितातीकृष्ण ॥ पळतीतेथूनअसुरादि ॥ ५ ॥ नामाह्मणेआलीनंदाचियाघरीं ॥ स्वरूपेंसुंदरीदेवांगना ॥ ६ ॥ ॥ ॥ ४४ ॥

कृष्णालावितसेस्तनीं ॥ तिसीमारीचक्रपाणी ॥१॥ भयानकप्रेत ॥ जनविस्मयकरित ॥ २ ॥ रडेतेव्हांमाया ॥ वांचलासीबातान्हया ॥ ३ ॥ मिळोनीसमस्त ॥ भाळींअंगारालावित ॥ ४ ॥ वसुदेवेंसांगितलें ॥ नंदह्मणेतैसेंझालें ॥ ५ ॥ कुऱ्हाडीआणिती ॥ शस्त्रेंकरूनितोडिती ॥ ६ ॥ नामाह्मणेदिलाअग्नि ॥ वासनमायगगनीं ॥ ७ ॥ ॥४५॥

पुण्यवंतादावीबाललीलादेव ॥ पाळथाकेशवपडेतेव्हां ॥ १ ॥ नंदउत्सवासीकरीतेव्हांफार ॥ दिधलेंअपारद्रव्य द्विजां ॥ २ ॥ यशोदाघेतसेदेवाचेंचुंबन ॥ तुजलान्हाणीन तान्ह्यामाझ्या ॥ ३ ॥ चोंगईचामुकाघेतातीगौळणी ॥ हांसेचक्रपाणीआनंदानें ॥ ४ ॥ नामयाचास्वामीमंदमंदहांसे ॥ यशोदाकरीतसेलिंबलोण ॥ ५ ॥ ॥ ॥ ४६ ॥

करावयावनभोजन ॥ जातीगोकुळींचेंजन ॥ १ ॥ भोजनकरिती ॥ कोणीदेवाखेळविती ॥ २ ॥ डोळझांकितश्रीपती ॥ दावीनिद्रेचीआकृति ॥ ३ ॥ बहुखेळलासेखेळा ॥ आतांनिजवागेबाळा ॥ ४ ॥ वस्त्रेंघालुनीशकटातळीं ॥ निजवितीवनमाळी ॥ ५ ॥ क्षणएकनिजलादेव ॥ रडेउठेवासुदेव ॥ ६ ॥ मुलालागींह्मणेतेव्हां ॥ माझाकान्होबाखेळवा ॥ ७ ॥ रागेंरागेंझाडीलाथ ॥ गाडामोडोनीपडत ॥ ८ ॥ नामाह्मणेवांटीधन ॥ नंदवांचलानंदन ॥ ९ ॥ ॥४७॥

तूंचिमाझाप्राणतूंमाझीमाउली ॥ तूंमाझीबहिणुलीकान्हाबाई ॥ १ ॥ गणगोतभाऊतूंचिमाझासखा ॥ संसार लटिकातुजवीण ॥ २ ॥ मांडीवरीघेतयशोदासुंदरी ॥ आळवीतश्रीहरीनानायुक्तीं ॥ ३ ॥ तूंचिमाझाधनीतूंमाझेंजी-

वन ॥ चुंबीतवदनवेळोवेळां ॥ ४ ॥ नामाह्मणेभारघाली मांडीवरी ॥ ठेवीभूमीवरीकृष्णजीला ॥ ५ ॥ ॥ ४८ ॥

कंसेंपाठविलातेंव्हांतृणावर्त ॥ धुळीनेंसमस्तव्यापियेलें ॥ १ ॥ दुष्टबुद्धीतेंव्हांउच्चलीदेवासी ॥ धरियेलेंत्यासी कंठींदेवें ॥ २ ॥ यशोदापहातनदिसेश्रीकृष्ण ॥ ऊरबडवूनशोककरी ॥ ३ ॥ गौळणींचामेळामिळालासमस्त ॥ कोणींकृष्णनाथनेलासये ॥ ४ ॥ नलगेघरदारबुडालासंसार ॥ दावागेश्रीधरतान्हेंमाझें ॥ ५ ॥ ठावेंअसतेंऐसें बांधितेंपोटाशीं ॥ कोठेंगुंतलासीबाळामाझ्या ॥ ६ ॥ धांवागेधांवापहागेलेंकरूं ॥ शोकअनिवारुकरीतसे ॥ ७ ॥ शिणल्याभागल्यायेतोतुझ्याघरा ॥ मुखहेंउदारादावीकृष्णा ॥ ८ ॥ सोडूंपाहेप्राणयशोदासुंदरी ॥ हंबरडाफोडी कृष्णालागीं ॥ ९ ॥ चेपोनीनरडीगतप्राणकेला ॥ भूमीसी पाडिलादैत्यतेंव्हां ॥ १० ॥ नामाह्मणेवरीखेळतगोविंद ॥ पाहोनिआनंदसकळांसीं ॥ ११ ॥ ॥ ॥ ४९ ॥

आलागोकुळासी ॥ हर्षनमायेमानसीं ॥ १ ॥ नंदेंगर्गातेंदेखिलें ॥ भुजास्तवनींतोषविलें ॥ २ ॥ भूतभविष्य वर्तमान ॥ तुह्मांकळेहासंपूर्ण ॥ ३ ॥ पहासामुद्रिकलक्षण॥ याचेंकायसांगाचिन्ह ॥ ४ ॥ बोलेतेंव्हांगर्गऋषी ॥ ह्मणींकळेलकंसासी ॥ ५ ॥ रोहिणीनंदादिबैसती ॥ गर्गघेऊनिएकांतीं ॥ ६ ॥ घालूनियामंगळस्नान ॥ आरंभीपुण्याहवाचन ॥ ७ ॥ ऐशीवदेशुकवाणी ॥ नामाम्हणेएका कानीं ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५० ॥

जन्मजन्मांतरींझालातुजश्रम ॥ ह्मणोनियाब्रह्मआलें

तेथें ॥ १ ॥ राखतील गाई मारितील दुष्ट ॥ नकरी वो भाट जनांमध्यें ॥२॥ द्वादश गांव अग्नि करील प्राशन ॥ वांचवील प्राण सकळांचे ॥३॥ चोरोनिया गाई नेईल सौंगडे ॥ लावील हा वेड ब्रह्मयासी ॥ ४ ॥ उचलील पर्वत हरील हा गर्व ॥ तारील हा सर्व नाममात्रें ॥ ५ ॥ समुद्रीं हा नगरी रचील क्षणांत ॥ चरित्र अद्भुत करील हा ॥ ६ ॥ सोळा सहस्र शत अष्ट त्या नायका ॥ करील बायका तुझा कृष्ण ॥ ७ ॥ त्रैलोक्यांत हाचि उदार राणा ॥ देईल ब्राह्मणा हेमपुरी ॥ ८ ॥ सांगतसे आशीर्वाद त्या देउनी ॥ नामा म्हणे मुनी जाता झाला ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५१ ॥

श्रीकृष्णजन्म लावार्ता ही ऐकुनी ॥ चिंता कंसामनीं प्रवर्तली ॥ १ ॥ उद्विग्न मानसीं कंस तो बैसला ॥ सन्मुख देखिला महाबळ ॥ २ ॥ गौरवोनि सांगे त्यासी वर्तमान ॥ शत्रूसी जाऊन कोण मारी ॥ ३ ॥ महाबळ दैत्य प्रतिज्ञा बोलत ॥ शत्रूसी त्वरित मारीन मी ॥ ४ ॥ नामा म्हणे ऐसा बोलोनी निघाला ॥ वेष धरियेला कपटाचा ॥ ५ ॥ ॥ ५२ ॥

विप्रवेष तेव्हां घेउनी निघाला ॥ गोकुळासी आला लागवेगें ॥ १ ॥ पुत्रोत्सव कोठें लोकांस पुसत ॥ भाविक सांगत नंदाघरीं ॥२॥ ऐकोनियां ऐसें आला अकस्मात ॥ यशोदा देखत सन्मुख त्या ॥ ३ ॥ श्रीकृष्णासीं तेव्हां वोसंगीं घेतलें ॥ दंडवत केलें ब्राह्मणासी ॥ ४ ॥ सन्मुख बैसोनी वर्तमान पुसे ॥ बाळाचें या कैसें चिन्ह सांगा ॥ ५ ॥ पंचांग त्यावेळीं काढिलें कपट्यानीं ॥ मान तुकावोनी पहातसे ॥६॥ नामा ह्मणे मैंदें पंचांग पाहून ॥ यशोदे लागून बोलतसे ॥ ७ ॥५३॥

तुझियापुत्रासीलागलेंसेमूळ ॥ करीलनिर्मूळसर्वत्रांचें ॥ १ ॥ बाळकाचेअंगींअवचिन्हेंबहुत ॥ नेउनीगर्तेंतटाकायासी ॥ २ ॥ लोभधरोनियांठेवालबाळकासी ॥ ग्रासीलसर्वांसीएकदांची ॥ ३ ॥ ऐकोनीयशोदागाहिंवरोनीबोले ॥ गर्गानींकथियेलेउत्तमगुण ॥ ४ ॥ अमंगळवाणीपुनरपिबोलिला ॥ गर्गतोचुकलागणीतासी ॥ ५ ॥ स्तनपानकरीत असतांश्रीकृष्ण ॥ मांडिलेंविंदाननामाह्मणे ॥ ६ ॥ ५४ ॥

ठायींहूनिजातींउखळेंउडताती ॥ मस्तकींआदळतींयेऊनियां ॥ १ ॥ पाटेवरवंटेवस्तुमात्रालागीं ॥ जीवत्याप्रसंगींयेताझाला ॥ २ ॥ धावरेदुर्जनपळायापहात ॥ आडव्याठाकतबाजापुढें ॥ ३ ॥ जानवेंतुटलेंपंचांगफाटलें ॥ धोतरगळालेंढुंगणाचें ॥ ४ ॥ पृष्ठीवरीहोतींबदबदांमार ॥ तेथुनीसत्वरपळताझाला ॥ ५ ॥ आयुष्याचीबाकीकांहीं उरलीहोती ॥ ह्मणोनिश्रीपतीसोडीत्यातें ॥ ६ ॥ नामाह्मणे जीवघेउनीपळाला ॥ मथुरेसीआलाकंसापाशीं ॥ ७ ॥ ५५ ॥

परीक्षितीरायासांगतसेशुक ॥ वैकुंठनायकरांगतसे ॥ १ ॥ दुडदुडापळतीमुखींलावीमाती ॥ शेणांतलोळतीदोघेजण ॥ २ ॥ नंदाच्यापुढीलओढिताताताट ॥ मिटक्या मटमटवाजविती ॥ ३ ॥ कटींकडदोरावांकींघुंगरूवाळे ॥ पिंपळपानेंभाळशोभतसे ॥ ४ ॥ देवातेंझोंकितीवाजिल्या रडती ॥ घडोघडींयेतींबिदीमाजीं ॥ ५ ॥ वत्सांचींतींपुच्छें बळेंओढिताती ॥ खोडीनसोडितीदोघेजण ॥ ६ ॥ विमानाचीं दाटीयेतातीसुरवर ॥ नाम्याचादातारपहावया ॥ ७ ॥ ५६ ॥

मृगाचींतेंशृंगेंधरोनीनाचती ॥ जनहांसतातीखदखदां

॥ १ ॥ भोजनाबैसतीघांसघेतीहातीं ॥ मांजरेंदेखतीदुरोनियां ॥ २ ॥ गळात्यांचातेव्हांधरीमेघश्याम ॥ पुच्छाबळीरामओढीतसे ॥ ३ ॥ यशोदाधांवतखदखदांहांसत ॥ गौळणीसमस्तपाहताती ॥ ४ ॥ पुसतांचिमामाचौंगईदाविती ॥ मर्कटाचेधरितीदोन्हीकान ॥ ५ ॥ रोहिणीसीह्मणेडसतीलबाळा ॥ कितीम्यांयाजलासांभाळावें ॥ ६ ॥ पाणीउडवितीप्रतिबिंबपहाती ॥ गोरससांडितीभूमीवरी ॥ ७ ॥ नामाह्मणेस्वामीसर्वांचाजोसाक्षी ॥ धरीतसेपक्षी चुंचूवातें ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५७

मुतूनियाहातेंभूमीसारावितीं॥पोटासींपुशितीदोघेजण॥१ घेउनीयाकाष्ठघांशितातीदांत ॥ वाकुल्यादावीतनंदालागीं ॥ २ ॥ जेवितांजेवितांबाहेरपळती ॥ श्वानासीबाहतीयूयूकरुनी ॥ ३ ॥ तयापुढेंदोघेठेवोनीयावाटी ॥ घालितातीमिठीगळात्याच्या ॥४॥ देखोनियांजनखदखदाहांसती ॥ यशोदेसांगतीकौतुकानें ॥ ५ ॥ भिंतीधरोनियांउभेराहताती ॥ आधारजगतीज्यांचाअसे ॥ ६ ॥ उभयतांजातीबिदींखेळावया ॥ कुरवंडीनकायानामाह्मणे ॥ ७ ॥ ५८

मिळवुनीसौंगडेसांगतोतयांसीं ॥ चलागोरसासीदेतों तुह्मा ॥ १ ॥ गेलीअसेएकगौळणजळाला ॥ सांगेगोपाळालायेथेंजाऊं ॥२॥ नपुरेचीह्मातदूधशिंक्यावरी ॥ करावें मुरारीकैसेंयेथें ॥ ३ ॥ पाटावरीपाटरचीवनमाळी ॥ पाडीतसेडुळीमोहरीनें ॥ ४ ॥ बडवोनीटीरीनाचतसेपेंदा ॥ भलीलेगोविंदायुक्तितेली ॥ ५ ॥ उदेलालेंबेतेकलूनका गलबला ॥ थांबालीलेगोलालोनीयाचा ॥ ६ ॥ कोणीपि-

तीदूधकोणीखातीदहीं ॥ आलीलवलाहींगवळणते ॥ ७ ॥ अहर्निशींधरूंजपतसेतूज ॥ जाशीकैसाआजचोरटीया ॥ ॥ ८ ॥ मुखींहूनीपयटाकीतिच्याडोळां ॥ नामाह्मणेपळा सांगतसे ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५९ ॥

गाऱ्हाणेंसांगाया ॥ आल्यागोकुळींच्यास्त्रिया ॥ १ ॥ यशोदाऐकत ॥ पळेबाहेरीभगवंत ॥ २ ॥ एकह्मणेलोणी ॥ माझेंभक्षीचक्रपाणी ॥ ३ ॥ फोडितसेभांडें ॥ वाजिलिया ह्मणेरांडे ॥ ४ ॥ गायीवांसरेंसोडितो ॥ येऊनिआह्मांसी सांगतो ॥ ५ ॥ अष्टदळकाढिलेंअंगणीं ॥ वरीमुतेचक्रपाणी ॥ ६ ॥ घेऊनियांआलाअन्न ॥ तुझ्याघरासीलावीन ॥ ७ ॥ देईनमीतोंडावर ॥ तुझ्याबापाचेंहेंघर ॥ ८ ॥ घेतसेवर-खडे ॥ शिव्यादेऊनियांरडे ॥ ९ ॥ देखोनियांगरोदर ॥ ह्मणेकेवढेंउदर ॥ १० ॥ सांगतीगाऱ्हाणीं ॥ नामाह्मणेऐ-काकानीं ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६० ॥

एकह्मणेधरीस्तन ॥ याचेउपटीनकान ॥ १ ॥ तुला येईलगेराग ॥ आपल्यापोराकांहींसांग ॥ २ ॥ अंधारीं लपत ॥ पोरेंकरितीआकांत ॥३॥ सांगतसेशिकवणा ॥ खोडीनकोकरूंकान्हा ॥४॥ तोंडकरूनिवांकडें ॥ मुलेंह्मण-तीयेथेंरडे ॥ ५ ॥ देवपोरांशिकवीत ॥ गोरसआणारेस-मस्त ॥ ६ ॥ आह्मीनिजलोंसमस्त ॥ काजळमुखासीला-वीत ॥७॥ मेलेआणूनियांसर्प ॥ माझ्यापोरादावीदर्प ॥८॥ योगीयांच्यानयेलक्षा ॥ त्यासीलावूंह्मणतीशिक्षा ॥ ९ ॥ अनंतगाऱ्हाणीं ॥ नामाह्मणेकितीवर्णी ॥ ॥ १० ॥ ६१ ॥

मुलेंसांगताती ॥ मातीखातोगेश्रीपती ॥ १ ॥ लांकूड

घेऊनहातांत ॥ मातीखातोसीपुसत ॥ २ ॥ भावाभुललला- सेखरा ॥ कांपतसेथरथरा ॥ ३ ॥ मुखउघडोनी ॥ दावीतेंव्हांचक्रपाणी ॥ ४ ॥ ब्रह्मांडेंदेखिलीं ॥ नामाह्मणे वेडीझाली ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६२ ॥

यशोदाघुसळीत ॥ स्तनमागतभगवंत ॥ १ ॥ घालो- नीपदर ॥ पाजीतसेजगदोद्धार ॥ २ ॥ दूधजातसेउतोन ॥ उठेकृष्णासीटाकून ॥ ३ ॥ मंथनपात्रातेंफोडित ॥ पळेते- थूनीत्वरित ॥ ४ ॥ मागेंधांवलीयशोदा ॥ धरावयात्यागो- विंदा ॥ ५ ॥ हातींनलागेजगजेठी ॥ नामाह्मणेहोय कष्टी ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ६३ ॥

कृपाउपजली ॥ उभाराहेवनमाळी ॥ १ ॥ धरोनिआ- णिला ॥ आजिबांधीनमीतुला ॥ २ ॥ दांवेंसोडूनियां ॥ बांधीतसेदेवराया ॥ ३ ॥ फारकरितोसीखोड्या ॥ गोपी दावितीबाकुड्या ॥ ४ ॥ दांवींअनंतलावीत ॥ दोनबोटें उणेंयेत ॥ ५ ॥ करितातीचोज ॥ परीनव्हेचिउमज ॥ ६ ॥ श्रमतसेवारंवार ॥ पुरतीकरीजगदोद्धार ॥ ७ ॥ विष्णुदा- सनामापुढें ॥ आलाजेथेंउभींझाडें ॥ ८ ॥ ॥ ६४ ॥

कुबेराचेपुत्रमदोन्मत्तझाले ॥ ह्मणोनिशापिलेनारदानें ॥ १ ॥ व्हालतुह्मीवृक्षऐकोनीसावध ॥ झालाअपराधऋषी- राया ॥ २ ॥ यमलार्जुनवृक्षव्हालगोकुळांत ॥ उःशापव- दतकृपाळुतो ॥ ३ ॥ कृष्णाच्याचरणलागेलतुह्मांसी ॥ आ- पुल्यास्थळासीयालवेगीं ॥ ४ ॥ मोडितसेतेव्हांलक्ष्मीचा पती ॥ दोघेनिघतातीदिव्यपुरुष ॥ ५ ॥ नामाह्मणेतेव्हां करितातीस्तुति ॥ पापेंदग्धहोतीऐकतांची ॥ ६ ॥ ॥ ६५ ॥

दामोदराकेशवावामनादेवाकृष्णा ॥ परंज्योतिनाराय-
णातूजनमो ॥ १ ॥ विश्वव्यापकाजनार्दनावासुदेवानिर्गु-
णा ॥ अव्ययाजगजीवनातूजनमो ॥ २ ॥ अनंतअवतार
घेसीभक्तांसाठीं ॥ कृपाळूजगजेठीतूजनमो ॥ ३ ॥ यज्ञे-
शासर्वेशादयानिधीहृषीकेशा ॥ पुराणपुरुषातूजनमो ॥४॥
धन्यहादिवसदेखिलेतुझेपाय ॥ कृपादृष्टींपाहेआह्माकडे॥५॥
जोडोनियाहातकरितोंविनंति ॥ देईंतुझीभक्तिजन्मोजन्मीं
॥ ६ ॥ करूनिनमस्कारहळूंहळूंचालती ॥ वेळोवेळांपहा-
तीकृष्णाकडे ॥ ७ ॥ मोडतांचिवृक्षधांवोनियांयेती ॥ म-
गपहातातीनामाह्मणे ॥ ८ ॥ ॥ ॥ ६६ ॥

समस्तांसांगतीलहानालींमुलें ॥ नवलदेखिलेंआह्मीं
आतां ॥ १ ॥ वृक्षमुळींहूनिदोघेनिघताती ॥ पायांसीला-
गतीकान्होबाच्या ॥ २ ॥ यशोदेचेमनींझालासेविवेक ॥
वैकुंठनायकयेथेंआला ॥ ३ ॥ नामाह्मणेत्यासीघालीतसे
माया ॥ अपराधतयाकायअसे ॥ ४ ॥ ॥ ॥६७॥

नंदेंसोडविलेंतेव्हांत्याकृष्णासी ॥ नासूंघागेयासीदहीं
दूध ॥ १ ॥ मजलालेंकरेंनाहींतगेफार ॥ विश्रांतीसीथार
एवढेंचि ॥ २ ॥ निवारिलेंविघ्नदेवेंहेंकेवढें ॥ पडतीगेझा-
डेंयाजवरी ॥ ३ ॥ आजपूनयासबोलसीकठिण ॥ देईन
मीप्राणतुजवरी ॥ ४ ॥ स्फुंदस्फुंदेंरडेतेव्हांनारायण ॥
देईंयासिस्तनभुकेलासे ॥ ५ ॥ यशोदावहातनयेवनमा-
ळी ॥ धांवोनीकुरवाळीवदनत्याचें ॥ ६ ॥ समजावोनीदे-
वापाजितसेस्तन ॥ घालीतभोजननामाह्मणे ॥७॥ ॥६८॥

एकगोपतेव्हांस्त्रियेसीसांगत ॥ सांठवीसमस्तनवनी-
त ॥ १ ॥ देवाचानवसआहेपुराविणें ॥ धरावेंयेथूनअन-
सुट ॥ २ ॥ सांगोनियांऐसेंराहिलातोस्वस्थ ॥ मागेंस्त्रीनें
कृत्यकायकेलें ॥ ३ ॥ चोरोनियांघृतभरोनिघागरी ॥ ने-
ऊनिशेजारींठेवीयेली ॥ ४ ॥ गौळीयानेंतेव्हांसंकल्पसो-
डिला ॥ नवसफेडिलानामाह्मणे ॥ ५ ॥ ॥ ॥ ६९ ॥

गोपीनेंघृतासीचोरोनिठेविलें ॥ देवासीकळलेंअंतर्या-
मीं ॥ १ ॥ सेजेघरींहोतेंठेविलेंचोरून ॥ सौंगडेघेऊनगे-
लातेथें ॥ २ ॥ आज्यघेऊनियांगोपाळांसीदेत ॥ आपण
भक्षितआनंदानें ॥ ३ ॥ तृप्तहोऊनियांगेलाक्रीडायासी ॥
पूर्णनवसासीकेलेंत्याच्या ॥ ४ ॥ नामाह्मणेऐसावैकुंठना-
यक ॥ दावीतकौतुकनानापरी ॥ ५ ॥ ॥ ॥ ७० ॥

कांहींएकदीनलोटलीयावरी ॥ गोपीतिचेघरींप्रवेशली
॥ १ ॥ ह्मणेमाझाकुंभदेईंवोआणून ॥ येरीनेंसदनधुंडाळि-
लें ॥ २ ॥ ह्मणेसयेयेथेंनाहींतुझेंघृत ॥ ऐकोनियांमात
क्रोधावली ॥ ३ ॥ चोरीनवनीतनाहींतुझेंगेलें ॥ माझेंका-
यझालेंपुसतसे ॥ ४ ॥ नष्टेअभिलाषकेलासांगसत्य ॥ बो-
लोनिनिवांतराहिलीते ॥ ५ ॥ कलहकरावाभ्रताराकळेल॥
शिक्षातोकरीलयथास्थित ॥ ६ ॥ नमिळेजाणोनह्मणेकृ-
ष्णार्पण ॥ आलीतेबोलोनमंदिरासी ॥ ७ ॥ नामाह्मणेशु-
कसांगेपरीक्षिती ॥ ऐशीकितीख्यातितुजसांगों ॥८॥७१॥

एकदांश्रीकृष्णखेळतअसतां ॥ प्रवेशेअवचितागोपीगृ-
हीं ॥ १ ॥ दोहींकरेंतेव्हांनेत्रचोळीतसे ॥ गोपीपुसतसे
कायझालें ॥ २ ॥ कृष्णह्मणेमाझेदुखतातीडोळे ॥ उपाय

नकळेकरूंकाय ॥ ३ ॥ पुत्राचीजननीतिचेंदूधमिळे ॥ घालितांचिडोळेबरेहोती ॥ ४ ॥ गोपीह्मणेदूधमीदेत्येंकाढून ॥ तेंनेत्रींघालूनबरेकरी ॥ ५ ॥ देवह्मणेदूधतूंकाढूनदेसी ॥ कैसागुणत्यासींयेईलसांग ॥ ६ ॥ माझियाकरानेंपिळूंदेसी स्तन ॥ तरीयेईलगुणलवकरी ॥ ७ ॥ एकतांचिगोपीधांवेमारावया ॥ पळेउठोनियानामाह्मणे ॥ ८ ॥ ॥ ७२ ॥

यशोदेभोंवत्यामिळाल्यागौळणी ॥ सांगतीगाऱ्हाणीं नानापरी ॥ १ ॥ गोरसभक्षोनीफोडीतोभाजन ॥ गोकूळ सोडूनजाऊंसये ॥ २ ॥ एकगोपीह्मणेमाझ्याघरायेशी ॥ बांधिनखांबाशींतुजलागीं ॥ ३ ॥ यशोदेसीऐशींसांगोनि गाऱ्हाणीं ॥ चालिल्याकामिनीगृहाप्रती ॥ ४ ॥ नामाह्मणेगोपीबोललीबांधीन ॥ तिजवरीविघ्नकरीदेव ॥५॥ ॥७३॥

निशीप्राप्तहोतांभ्रताराचेसेजे ॥ गोपिकातीनिजेआनंदानें ॥ १ ॥ संधीपाहोनियांप्रवेशलादेव ॥ करीनवलाव कायतेंव्हां ॥ २ ॥ भ्रताराचीदाढीकांतेचीतेवेणी ॥ एकत्र करूनिग्रंथिदेत ॥ ३ ॥ करोनिकौतुकनिघोनियांगेला ॥ अरुणोदयझालातयेवेळीं ॥ ४ ॥ गोदोहनालागींगोपीतेउठत ॥ वेणीआसडतदाढीसंगें ॥ ५ ॥ भ्रतारासीतेव्हांबोलेती कामिनी ॥ नधायेअझुनीमनकैसें ॥ ६ ॥ भ्रताराचीदाढी ओढितांचिजाण ॥ सक्रोधहोऊनबोलतसे ॥ ७ ॥ मस्त होऊनियांमाजलीधांगडी ॥ करीसीओढाओढीमजलागीं ॥ ८ ॥ नामाह्मणेतेव्हांउठोनीबैसती ॥ आश्चर्यकरितीमनामाजी ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥७४॥

उभयतांतेव्हांकलहकरितातीं ॥ आणवाहतातीपरस्परें ॥ १ ॥ सोडूंजंवपहातीसत्वरग्रंथिका ॥ नसुटेब्रह्मादिकांकदाकाळीं ॥ २ ॥ सोडितांसुटेनाजाळितांजळेना ॥ कापितांकापेनाकांहींकेल्या ॥ ३ ॥ स्त्रियेलागींतेव्हांभ्रतारबोलत ॥ तुजसंगेंमृत्युमजआला ॥ ४ ॥ दोघेंहीरडतीबिदीमाजीयेती ॥ कोल्हाळकरितीतयेवेळीं ॥५॥ गोकुळींचेजन डोळांपहातातीं ॥ जाऊनसांगतीनंदालागीं ॥ ६ ॥ नामा ह्मणेनंदबैसलाचावडी ॥ घेऊनिआवडीकृष्णजीला ॥७॥७५

गोपीगोपतेथेंपातलेत्वरित ॥ हांसतीसमस्तदेखोनियां ॥ १ ॥ कृष्णह्मणेकैशीबांधिशीमजला ॥ बांधिलेंतुजलाभगवंतें ॥ २ ॥ पायांपडतातीरडोनीबोलती ॥ सोडवाह्मणतीआह्मालागीं ॥३॥ पाहोनीकीवत्यांचीदयाआलीचित्तां ॥ कृपेनेंपाहतांमुक्तझाली ॥ ४ ॥ नामाह्मणेतेव्हांवंदोनिदेवासी ॥ गेलींनिजधामासीआनंदानें ॥ ५ ॥ ॥ ७६ ॥

नंदाचियेघरींचंपाषष्ठीनेम ॥ कुळींकुळधर्ममार्तंडाचा ॥ १ ॥ पक्कान्नेंहींनानारोटियाभरीत ॥ केलींअपरिमितयशोदेनें ॥ २ ॥ वाघियामुरळीसांगितलींदोन्ही ॥ आलाचक्रपाणीखेळतांचि ॥ ३ ॥ मातेलागींह्मणेलागलीसेक्षुधा ॥ थांबरेगोविंदाम्हणेमाता ॥ ४ ॥ घेतलीसेआळीकरीलगबग ॥ विस्तारिलेंसांगनैवेद्यासी ॥ ५ ॥ नेऊनियांपुढेंदेवाच्याठेविलें ॥ बोलवावाहिलेआमंत्रिक ॥ ६ ॥ तोंवरीमागेंतो भक्षीनारायण ॥ यशोदाआपणरागावली ॥ ७ ॥ दुरळहा देवहोयआतांकैसें ॥ मार्तंडाचेंपिसेंलागेतुज ॥ ८ ॥ करी क्षणामाजीवांकडेंचिमुख ॥ हरिखांतविखकालवलें ॥ ९ ॥

जाणितलाभावमायेचें अंतर ॥ करूनियांखरेंदावीदेव ॥ ॥ १० ॥ पिसाळल्यापरीकरीवेडेचार ॥ भयवाटेफारमायेलागीं ॥ ११ ॥ पूर्वीम्यांसांगतांनायकसीकैसा ॥ पुढेंहावळसावोढवला ॥ १२ ॥ आलेदेवऋषीहालवितीसुपें ॥ त्यांचियानबापेंदेवनिघे ॥ १३ ॥ मंत्रूनियांपाणीआणिलाअंगारा ॥ तयाचामातेराकेलादेवें ॥ १४ ॥ नवसानपावती कुळींच्यादेवता ॥ उपायमागुताराहिलासे ॥ १५ ॥ चिंतावलीमायमूर्छाआलीतिसी ॥ झालीपोरापिसीमोहजाळें ॥ ॥ १६ ॥ जाणोनिअंतरह्मणेकृष्णार्पण ॥ तेव्हांआलेंविघ्न दूरहोय ॥ १७ ॥ नामाह्मणेदेवपाहेकृपादृष्टीं ॥ जाणवलें पोटींहाचिदेव ॥ १८ ॥ ॥ ॥ ॥ ७७ ॥

गोपिकाह्मणतीयशोदेसुंदरी ॥ करितोमुरारीखोडीबहु ॥ १ ॥ यशोदेप्रतीत्यागौळणीबोलती ॥ संकष्टचतुर्थीव्रत घेई ॥ २ ॥ गणेशदेईलयासीउत्तमगुण ॥ वचनप्रमाण मानावेंहें ॥ ३ ॥ गजवदनासीतेव्हांह्मणतयशोदा ॥ माझियामुकुंदागुणदेई ॥ ४ ॥ ऐसेंहेंवचनऐकूनकृष्णनाथें ॥ सत्यगणेशातेंकेलेंतेव्हां ॥ ५ ॥ एकमासखोडीदेवेंनाहीं केली ॥ प्रचीततेआलीयशोदेसी ॥ ६ ॥ धन्यधन्यदेवगणपतीपाहे ॥ यशोदातेराहेउपवासी ॥ ७ ॥ इंदिरावंधूचा उदयहोऊंपाहत ॥ यशोदाकरीतपूजनासी ॥ ८ ॥ शर्करामिश्रितलाडूएकवीस ॥ आणिकबहुवसमोदकते ॥ ९ ॥ ऐसानैवेद्याचाहारातोभरोनी ॥ देव्हारींनेवोनिठेवीमाता ॥ ॥ १० ॥ मातेसीह्मणततेव्हांहृषीकेशी ॥ लाडूकेव्हांदेशी मजलागीं ॥ ११ ॥ यशोदाह्मणतपूजीनगजवदन ॥ नैवेद्य

दावूनदेईनतुज ॥ १२ ॥ ऐसेंह्मणोनियांमातावाहेरगेली ॥ देव्हाऱ्याजवळींहरिहोता ॥ १३ ॥ एकांतदेखोनिहाराउचलिला ॥ सर्वस्वाहाकेलाएकदांचि ॥ १४ ॥ घेऊनियांग्रास उगाचीवैसला ॥ भक्तांलागींलीलादावीतसे ॥ १५ ॥ धूप घेऊनियांआळीसदनांते ॥ रिताहारातेथेंदेखियेला ॥१६॥ विस्मयबहुतमातेसीवाटला ॥ नैवेद्यहरीलापुसतसे ॥ १७॥ कृष्णह्मणेसत्यवचनमानींमाते ॥ एकसहस्त्रयेथेंउंदीरआले ॥ १८ ॥ त्यांतएकथोरह्मोतातोमूषक ॥ वरीविनायकबैसलासे ॥ १९ ॥ सकळहीलाडूसोंडेनेंउचालिले ॥ सर्वआकर्षिलेएकदांचि ॥ २० ॥ सर्वांगासीत्यानेंचर्चिलाशेंदूर ॥ सोंडभयंकरहालवितसे ॥ २१ ॥ उंदीरभ्यासूरभ्यालोंमी देखुनी ॥ वळलीवदनींबोवडीते ॥ २२ ॥ नवोलवेकांहीं माझेनिजननी ॥ क्षुधामजलागोनीलागलीसे ॥ २३ ॥ लाडूमजदेईम्हणेजनार्दन ॥ माताक्रोधेंकरूनबोलतसे ॥२४॥ माताह्मणेकृष्णापाहूंतुझेंवदन ॥ लाडूत्वांचिपूर्णभक्षियेले ॥ २५ ॥ हरिम्हणेमातेलाडूतेबहुत ॥ मातीलमुखांतकैसे माझ्या ॥ २६ ॥ गणपतीसर्वलाडूगेलासेघेऊन ॥ आलें विह्वरणमजवरी ॥ २७ ॥ हरीम्हणेमजमारूंनकोमाते ॥ तुजवदनातेंदावितोंमी ॥ २८ ॥ कृष्णनाथेंतेव्हांमुखपसरिलें ॥ ब्रह्मांडदेखिलेंमुखामाजीं ॥ २९ ॥ असंख्यगणपतीदिसतीवदनीं ॥ पहातसेनयनींयशोदाते ॥ ३० ॥ मुखांतगणपतीमातेसीबोलत ॥ पूजावेंत्वरितहरिलागीं ॥ ३१॥ ऐसेंदेखोनियांसमाधिस्थहोत ॥ चहूंकडेपहाततटस्थते ॥ ॥ ३२ ॥ योगमायातेव्हांहरीनेंघालून ॥ मातेपुढेंजाणउभा

असे ॥ ३३ ॥ यशोदाहरीसीकडेवरीघेत ॥ मुखासीचुंबी-तआवडीनें ॥ ३४ ॥ हरिघेऊनियांघरांततीगेली ॥ भोज-नाबैसलीनामाम्हणे ॥ ३५ ॥ ॥ ॥ ७८ ॥

कोणेएकेदिनींश्रीकृष्णअंगणीं ॥ विलोकीनयनींप्रति-बिंब ॥ १ ॥ मातेप्रतीतेव्हांह्मणतसेहरी ॥ काढोनिझड-करीदेईमज ॥२॥ माताह्मणेबाळानयेचितेंहाता ॥ आणिक अनंतामागकांहीं ॥ ३ ॥ ऐसेंऐकोनियांरडतसेहरी ॥ त्या-सीनानापरीसमजावीत ॥ ४॥ बहुतखेळणींपुढेंठेवीमाता॥ परीतोरडतांनराहेची ॥ ५ ॥ पालखानेऊनिहरिसीनिज-वीत ॥ यशोदातेजातस्वकार्यासी ॥ ६ ॥ तेचसमयींराधा आलीसेमंदिरीं ॥ देखिलाश्रीहरिरडतांतिनें ॥ ७ ॥ पा-लखाजवळींजाउनीसत्वर ॥ घेतकडेवरहरीलागीं ॥ ८ ॥ राधाह्मणेकांतूंरडतोसीचाटा ॥ गोष्टीत्याअचाटासांगतो-सी ॥ ९ ॥ ऐसेंऐकोनियांउगाचिराहिला ॥ खेळवीहरी-लाप्रेमेंराधा ॥ १० ॥ मागुतीनेऊनिपालखाघातिला ॥ रडायालागलाहरितेव्हां ॥ ११ ॥ राधेसीह्मणतयशोदा सुंदरी ॥ यासींक्षणभरीनेईआतां ॥ १२ ॥ आपुल्यामं-दिरांघेऊनजाययासीं ॥ ऐकोनिमानसींसंतोषली ॥ १३ ॥ नामाह्मणेराधाघेऊनिहरीसी ॥ गेलीमंदिरासीआपु-लिया ॥ १४ ॥ ॥ ॥ ॥ ७९ ॥

मंदिरानेऊनिपलंगींबैसाविला ॥ ह्मणतहरीलातयेवेळीं॥ ॥ १ ॥ ऐसीयासमयींथोरतूंअससी ॥ तरीहृषीकेशीबरेंहो-तें ॥ २ ॥ देखूनिभावतिचाथोरझालाहरी ॥ पाहूनसुंदरी आनंदली ॥ ३ ॥ सुखशयनींराधाएकांतींअसतां ॥ अन-

याअवचितांआलातेथें ॥ ४ ॥ सक्रोधहोऊनिबोललाराधे-सीं ॥ कोणासीबोलसीगुजगोष्टी ॥५॥ भ्रताराचाशब्दऐ-कतांश्रवणीं ॥ दचकलीमनीराधिकाते ॥ ६ ॥ हातजो-डोनियांविनवितहरीसी ॥होईहृषीकेशीसानआतां ॥ ७ ॥ ऐकोनिकरुणावाळझालाहरी ॥ दहींभातझडकरींठेवीपुढें ॥ ॥ ८ ॥ कवाडउघडोनिबोलतअनयासीं ॥ घरांतहृषीके-शीजेवीतसे ॥ ९ ॥ कावडठेवूनिघरांततोआला ॥ जेवि-तांदेखिलाकृष्णनाथ ॥ १० ॥ नामाह्मणेअनयाआनंदला मनीं ॥ हृदयींचक्रपाणीधारियेला ॥ ११ ॥ ॥ ८० ॥

राधेप्रतीअनयाबोलेतयेवेळीं ॥ घरांतएकलीअससीतूं ॥ १ ॥ एकलेंहेंतुजकर्मेनामंदिरीं ॥ खेळावयाहरिआणित जाईं ॥ २ ॥ भ्रतारवचनराधेनेंऐकोनी ॥ आनंदतोमनीं थोरतिच्या ॥ ३ ॥ स्वामीतुमचीआज्ञामजलागींप्रमाण ॥ ह्मणोनिचरणवंदियेले ॥ ४ ॥ सुखशयनींराधाभोगितअ-नंता ॥ गोकुळांतवार्ताप्रगटली ॥ ५ ॥ राधेचियाघरींथोर होतोहरी ॥ गोकुळींच्यानारीकुजबुजती ॥ ६ ॥ यशोदे-सितेव्हांसांगतीसुंदरी ॥ आवरीमुरारीआपुलाहा ॥ ७ ॥ तैसेंचजाऊनिराधेच्याघरासी ॥ सांगतीसासूसीतिच्याते-व्हां ॥ ८ ॥ राधेलागींवृद्धाह्मणेतयेवेळीं ॥ घरासिवनमा-ळीआणूनको ॥ ९ ॥ नामाह्मणेलोकींपाडियेलीतुटी ॥ तिसीजगजेठीअंतरला ॥ १० ॥ ॥ ॥ ८१ ॥

प्रातःकाळींराधाउठोनियांजाण ॥ नंदसदनावरूनपा-ण्याजात ॥ १ ॥ इकडेगोदोहनकरितसेहरी ॥ पाहेउभी द्वारींराधिकाते ॥ २ ॥ विसरेगोदोहनवृषभाखालींबैसत ॥

कृष्णजीचेंचित्तवेधियेलें ॥ ३ ॥ भरणारिचवोनिबाहेरआ-
लीमाता ॥ वृषभदोहतांहरिदेखे ॥ ४ ॥ माताह्मणेकाय
करिसीघननीळा ॥ प्रत्युत्तरत्यावेळांहरिदेत ॥ ५ ॥ द्वारा-
कडेपाहेराधेसिन्याहाळून ॥ मातेसिवचनबोलतसे ॥ ६ ॥
भरणाभरलाआतांजाईंतूंघेऊन ॥ माताक्रोधायमानझाली
तेव्हां ॥ ७ ॥ कृष्णासियशोदाह्मणेखालींपाहे ॥ वृषभकीं
गायदोहतोसी ॥ ८ ॥ कृष्णखालींपाहेवृषभदेखिला ॥ ह्म-
णेयशोदेलाऐकएक ॥ ९ ॥ देवाचानवसचुकलीसबहुतेक॥
चौथानांचेंएकथानझालें ॥ १० ॥ वचनऐकोनिहांसतय-
शोदा ॥ द्वारींउभीराधादेखियेली ॥ ११ ॥ कांगेयेथेंउभी
घेउनीघागर ॥ जातसेसत्वरराधातेव्हां ॥ १२ ॥ नामाह्म-
णेऐसेंझालेंगोदोहन ॥ मुखप्रक्षालूनहरिजेवी ॥ १३ ॥८२॥

मंथनाआरंभकरीतसेराधा ॥ आठवीगोविंदामनामाजीं
॥ १ ॥ मेळवूनिमुलेंखेळेतिचेद्वारीं ॥ देखिलाश्रीहरिराधि-
केनें ॥ २ ॥ विसरोनिमंथनारित्याडेरियांत ॥ रवीफिरवी-
तगरगरां ॥ ३ ॥ डेराखडखडांवाजतांऐकोनी ॥ वृद्धाते
धांवोनीबाहेरआली ॥ ४ ॥ सासूह्मणेकायगेलेतुझेनेत्र ॥
देतसेउत्तरराधातिसी ॥ ५ ॥ डेराधडकिंवाफुटकाह्मणोनी ॥
रवीघुसळोनीपहातसें ॥ ६ ॥ वृद्धाह्मणेतुझेंचित्तनाहींस्थि-
र ॥ द्वारींहोश्रीधरदेखियेला ॥ ७ ॥ रागेंभरोनियांबोलत
ह्मातारी ॥ येथेंकांरेहरिखेळसीतूं ॥ ८ ॥ कृष्णह्मणेआह्मी
खेळतोंबिदीसी ॥ तूंकांदटाविसीथेरडीये ॥९॥ ऐसेंबोलोनि-
यांश्रीहरिपळाला ॥ घरासींतोगेलानामाह्मणे ॥१०॥८३ ॥

मध्याह्नकाळींमगहरीसीघेऊन ॥ करीतभोजनयशोदा

ते ॥ १ ॥ भोजनकरूनपलंगींनिजत ॥ श्रीकृष्णासीयेत पुढेंतेव्हां ॥ २ ॥ यशोदेसीसुखनिद्राहोलागली ॥ राधिकातेगेलीयमुनेसी ॥ ३ ॥ नेत्रासींपदरलावोनीरडत ॥ अंतरींअनंतआठवोनी ॥ ४ ॥ करुणाशब्दतिचाऐकोनीश्रवणीं ॥ उठलाचक्रपाणीतेथोनियां ॥ ५ ॥ जावोनियांराधा धरिलीपदरीं ॥ तिजलागींहरिसमजावीत ॥ ६ ॥ संसारासीमाझ्यापडियेलेंपाणी ॥ ऐसेंचक्रपाणीतुवांकेलें ॥ ७ ॥ इकडेयशोदातीजागीजंवहोत ॥ हरीसीधुंडीततयेवेळीं ॥८॥ एकादीहीकळीघेऊनयेईलआतां ॥ पहातसेमाताचहूंकडे ॥ ९ ॥ पाउलाचामागचालिलीकाढित ॥ पावलीत्वरित यमुनातीरां ॥ १० ॥ राधातयेवेळींह्मणेरेअनंता ॥ पैलतुझीमातायेतअसे ॥ ११ ॥ मातेसींदेखोनगडबडांलोळत ॥ यशोदातेघेतकडेवरी ॥ १२ ॥ मातेसीह्मणतचोरूनिकंदुक ॥ घेऊनियांदेखआलीयेथें ॥ १३ ॥ माताह्मणेकांवोयासीरडविसी ॥ चेंडूतूंहरीसीदेईवेगीं ॥ १४ ॥ मामींसेहामजवरीघेतुफाना ॥ मजपाशींजाणाचेंडूनाहीं ॥१५ ॥ कृष्ण म्हणेमातेझाडाघेईआतां ॥ कंदुकतत्त्वतांनिघेलपैं ॥ १६ ॥ वस्त्रजंवझाडीतराधातयेवेळीं॥पडिलाभूतळींकंदुकतो ॥१७॥ ऐसेंदेखोनियांलज्जितजहाली ॥ हांसतवनमाळीनामाह्मणे ॥ १८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ८४ ॥

चेंडूदेखोनियांयशोदाकोपली ॥ ह्मणेतयेवेळींराधिकेसी ॥ १ ॥ महानष्टातुह्मीअवघियागौळणी ॥ माझाचक्रपाणीब्रह्मचारी ॥ २ ॥ इतुकेंऐकोनीराधातेचालिली ॥ स्वगृहासीगेलीआपुलीया ॥ ३ ॥ राधेचियामनींसमजलेंपूर्ण ॥

ब्रह्मसनातनश्रीकृष्णहा ॥४॥ इकडेयशोदाघेउनीहरिसी ॥ गेलीमंदिरासीनामाह्मणे ॥ ५ ॥ ॥ ॥ ८५ ॥

गोकुळींअनर्थहोतातीबहुत ॥ मिळोनिसमस्तविचारिती ॥ १ ॥ वृद्धतेम्हणतीयेतेंआमुच्यामना ॥ जाऊंवृंदावनासकळीक ॥ २ ॥ समस्तांमानलातयांचाविचार ॥ निघतीनारीनरशीघ्रतेंव्हां ॥ ३ ॥ अहर्निशींदेवाकरितीजतन ॥ नामाम्हणेमनगोविंदापैं ॥ ४ ॥ ॥ ॥ ८६ ॥

विचारितहोश्रीपती ॥ जेमीजातोंवनाप्रती ॥ १ ॥ राखावयागायी ॥ भारउतरावयामही ॥२॥ एकेदिनींसायंकाळीं ॥ नंदापुसेवनमाळी ॥ ३ ॥ उद्यांजाईनमीराना ॥ वारेघेउनीगोधना ॥ ४ ॥ वुद्धीचाचाळक ॥ नामाम्हणेहाचिएक ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ८७ ॥

प्रातःकाळींमुलेंयेतातीसकळ ॥ ऊठरेगोपाळाह्मणताती ॥ १ ॥ आळसदेउनीउठेदेवराणा ॥ बळीरामगोधनासोडीतसे ॥२॥मातादेवोनिस्तनकाकुलतीयेत ॥ सांभाळाभगवंतवनामध्यें ॥३॥ जवळींचखेळाजाऊंनकादूरी ॥ सांभाळामुरारीप्राणमाझा ॥ ४ ॥ होतातीउत्पातयाजवरीमोठे ॥ मोडतीलकांटेसांभाळावें ॥ ५ ॥ आसनींशयनींभोजनींजतनकरा ॥ नामयादाताराकेशीराजा ॥ ६ ॥ ॥ ८८ ॥

चालियेलेतेंव्हांगडीआणिदेव ॥ खेळतातीसर्वआनंदानें ॥ १ ॥ वत्साचियारूपेंवत्सासुरआला ॥ मारायाकृष्णालापरीक्षिती ॥ २ ॥ पाहोनियांऐसेंतयासिमारिलें ॥ झोंकोनियांदिलेंआकाशांत ॥ ३ ॥ चलाआतांजेवूंबैसूंएकाठायीं ॥ काढालवलाहींशिदोरिया ॥ ४ ॥ गोपाळमि-

ळोनिआनंदेंजेविले ॥ ब्रह्मरसेंधालेकृष्णासंगें ॥ ५ ॥ उद-कप्राशनकरावयाआले ॥ बकानेंदेखिलेंकृष्णजीला ॥ ६ ॥ दुष्टबुद्धितेव्हांदेवासिगिळीत ॥ हृदयजाळीतउगाळिला ॥ ॥ ७ ॥ धरोनियांहातेंउभाचिचिरिला ॥ आनंददेवालान-समाये ॥ ८ ॥ नामाह्मणेआलेघरासीसकळ ॥ सांगता-तीबाळेंवर्तमान ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ८९ ॥

उठोनिप्रातःकाळींगौळणीबोलती ॥ जाईलश्रीपतीवनां आतां ॥ १ ॥ चलाजाऊंत्याचेंपाहूंगेश्रीमुख ॥ हरेलहीभूकडोळियांची ॥ २ ॥ तांतडीनेंयेतीनंदाचियाघरां ॥ प-ह्यातीउदाराकृष्णराया ॥ ३ ॥ कुरळहेकेशसुहास्यवदन ॥ आकर्णनयनशोभताती ॥ ४ ॥ अरुणोदयप्रभाअधरदिस-ती ॥ हिरेझळाळितीदंततुझे ॥ ५ ॥ भोंवयाव्यंकटासुंदर नासिक ॥ पाहोनियांसुखफारहोय ॥ ६ ॥ ललाटींशोभत केंशराचाटिळा ॥ वरबिंदुरेखिलाकस्तूरीचा ॥ ७ ॥ वैज-यंतीमाळाकिरीटकुंडलें ॥ नामयानेंकेलेंनिंबलोण ॥८॥९०॥

उठोनियांप्रातःकाळीं ॥ देवेंमुरलीवाजविली ॥ १ ॥ ग-डीमिळोनिसमस्त ॥ घ्यारेशिदोऱ्यासांगत ॥ २ ॥ अलं-कारघालिताती ॥ दिसेसुशोभितमूर्ति ॥ ३ ॥ नामाह्मणे स्वामीमाझा ॥ आलाभक्तांचियाकाजा ॥ ४ ॥ ॥ ९१ ॥

अनेकपुष्पांच्यासाजतातीमाळा ॥ गुंजाहारगळांशोभ-ताती ॥ १ ॥ रक्तपीतांबरआरक्तअधर ॥ चरणसुंदरचा-लताती ॥ २ ॥ रक्तचंदनाचीघेतलीसेउटी ॥ मयूरपत्रवें-टीशोभताहे ॥ ३ ॥ शिंगेरंगवितीदेवोनियांरंग ॥ चालत

श्रीरंगमागेंमागें ॥ ४ ॥ चित्तींसर्वकाळराहेऐसेंध्यान ॥ नामाह्मणेधन्यतोचिएक ॥ ५ ॥ ॥ ॥ ९२ ॥

शिवादिकज्याचेंवंदितीपायवणी ॥ पायांवरीन्हाणीयशोदाते ॥ १ ॥ नंदपुण्यलेखानव्हेआह्मांप्रती ॥ शुकपरीक्षितीसांगतसे ॥ २ ॥ सनकादिकज्याचेध्यानींझालेपिसे ॥ गायीचारीतसेगोकुळांत ॥ ३ ॥ गडीयांसींकालावांटितो श्रीधर ॥ कौतुकसुरवरपाहताती ॥ ४ ॥ नामाह्मणेसुख देईलभक्तांसी ॥ वधिलदुष्टांसींस्वामीमाझा ॥ ५ ॥ ९३ ॥

कंसघाडीअघासुर ॥ मारीनंदाचाकुमर ॥ १ ॥ एक ओंठखालीं ॥ दुजामेघांच्यामंडळीं ॥२॥ गायीगोपाळउदरीं ॥ देवाकळलेंअंतरीं ॥ ३ ॥ आंतप्रवेशलाकृष्ण ॥ रूप धरीतवामन ॥ ४ ॥ क्षणार्धेचिमारी ॥ भक्तजनांचाकैवारी ॥ ५ ॥ भेणेंगोपाळपडियेले ॥ कृपादृष्टींउठविले ॥ ६ ॥ तेजअद्भुतनिघालें ॥ कृष्णमुखींप्रवेशलें ॥ ७ ॥ भक्तांसीं रक्षीत ॥ नामाह्मणेकृष्णनाथ ॥ ८ ॥ ॥ ९४ ॥

गडीआणिरमापती ॥ तेव्हांआनंदेंजेविती ॥ १ ॥ कोणीमांडितातीपानें ॥ वरीठेवीतातीअन्नें ॥ २ ॥ कोणीठेवी मांडीवरी ॥ कोणीजेवीभूमीवरी ॥ ३ ॥ कोणीपसरितीचवाळें ॥ कोणीपसरितातीजाळें ॥ ४ ॥ गोळेघेऊनयांहातीं ॥ येरयेरांतेंहाणिती ॥ ५ ॥ पहातातीदेव ॥ धन्यधन्यत्यांचाभाव ॥ ६ ॥ मिटाकियादेती ॥ देवावांकुल्यादाविती ॥ ७ ॥ मायामोहीब्रह्मादिकां ॥ नामाह्मणेतेंचि ऐका ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९५ ॥

गौळियांचींपोरेंवांकुल्यादाविती ॥ क्रोधावलाचित्तींब्र-

ह्मदेव ॥ १ ॥ चोरोनियांनेतगोवत्सगोपाळ ॥ पाहूंयाचें बळकितीआहे ॥ २ ॥ जाणोनिअंतरदेवहांसतसे ॥ सामर्थ्यपहातसेपुत्रमाझा ॥ ३ ॥ तेथुनीआणावींनव्हेहेंउचित ॥ ह्मणेलकिंचितपराक्रम ॥ ४ ॥ नामाह्मणेऐसेंविचारिलेंचित्तीं ॥ करीतश्रीपतीकायतेव्हां ॥ ५ ॥ ॥ ९६ ॥

गायीवत्सेंगोपाळकेलींसेनिर्माण ॥ नलागतांक्षणपरीक्षिती ॥ १ ॥ पूर्ववतसर्वन्यूनकांहींनोहे ॥ नकरीआश्चर्य मनामाजीं ॥ २ ॥ इच्छामात्रेंकरीब्रह्मांडाच्याकोटी ॥ त्यासीकायगोष्टीअपूर्वहे ॥ ३ ॥ सायंकाळींगेलेगोकुळाभीतरीं ॥ आपुलाल्यापरीघरींसर्व ॥ ४ ॥ ब्रह्मादिकांज्याचानकळेचिपार ॥ मानवांविचारनकळेकांहीं ॥ ५ ॥ ऐसाहासमर्थ नामयाचाधनी ॥ वंदीपायवणीसदाशिव ॥ ६ ॥ ॥९७॥

एकसंवत्सरसकळजाहला ॥ पहावयाआलाब्रह्मदेव ॥१॥ पूर्ववतगायीगोपाळदेखिले ॥ आश्चर्यवाटलेंतेव्हांत्यासी ॥ २ ॥ ब्रह्मांडांतब्रह्मादुजाअसेकोण ॥ केलेंसेउत्पन्नत्यांजलागीं ॥ ३ ॥ घेऊनियांगेलोंतेचिआलेयेथें ॥ जाऊनियां तेथेंपहातसे ॥ ४ ॥ भ्रांतीनेंव्यापिलेंतयाचेंतेंमन ॥ देखतों मीस्वप्नकिंवासत्य ॥ ५ ॥ नामाह्मणेएकेठायींउभाराहे ॥ न्याहाळूनपाहेसकळांसी ॥ ६ ॥ ॥ ॥ ९८ ॥

चतुर्भुजदिसेशंखचक्रहातीं ॥ मुकुटशोभतीसर्वांलागीं ॥ १ ॥ कर्णींचींकुंडलेंवैजयंतीमाळा ॥ देखतसेडोळांब्रह्मा तेव्हां ॥ २ ॥ कौस्तुभहृदयींश्रीवत्सलांछन ॥ बाहूंचींभूषणेंपहातसे ॥ ३ ॥ चरणींतोडरपीतपीतांबर ॥ तेजेंदिवाकरलोपतसे ॥ ४ ॥ आपादपर्यंततुळशीच्यामाळा ॥ मु-

द्रिकादशागुळांरत्नांचिया ॥ ५ ॥ केंशराचेटिळेनेत्रकम-
ळाकार ॥ दंतींइंदुकरबैसलेती ॥ ६ ॥ कोटिशारेमूतींको-
टीब्रह्मेंदिसती ॥ स्तवनकरितीसुरवर ॥ ७ ॥ नामाह्मणे
ऐसेंदावितगोविंद ॥ झालासेसावधब्रह्मातेव्हां ॥८॥ ९९॥

ओळखीबापाला ॥ ब्रह्मातेव्हांधांविन्नला ॥ १ ॥ नेत्रीं
अश्रूंचियाधारा ॥ कांपतअसेथरथरां ॥ २ ॥ घालीनम-
स्कार ॥ म्हणेअपराधीमीफार ॥३॥ जोडोनियांहात ॥ ना-
माह्मणेस्तुतिगात ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ १०० ॥

श्रवणेंजळतीपापाचेपर्वत ॥ एकेब्रह्मगीतशुकह्मणे ॥१॥
घरीजोविश्वासकरीजोपठन ॥ तरेलतोजाणभवसिंधु ॥२॥
आपणतरेलनव्हेहेंनवल ॥ उद्धरीलकुळसकळची ॥ ३ ॥
एकेकअक्षरजाळीमहापाप ॥ करायाचाजपसात्विकहो ॥४॥
नामघेतांधांवेअनवाणीचपायें ॥ कोमळहृदयकृष्णजीचें ॥
५ ॥ विचारितांयातिकुळअमंगळ ॥ नविचारीकाळवेळधां-
वे ॥ ६ ॥ शरणागतानेदीकाळाचियेहातीं ॥ नामाह्मणे
चित्तींदृढधरा ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ १०१ ॥

मेघश्यामवर्णझालासीसगुण ॥ कार्यआणिकारणतुज
नमो ॥ १ ॥ गुंजाहारगळांमयूरपिच्छेंवेंटीं ॥ कृपाळूजग-
जेठीतुजनमो ॥ २ ॥ वनपुष्पमाळाआपादशोभती ॥ ल-
क्ष्मीच्यापतितुजनमो ॥ ३ ॥ वेणुवाजविसीगायत्त्याचारि-
सी ॥ नकळेकोणासीतुझीलीला ॥ ४ ॥ हातींतुझ्याकवळ
शोभेपीतांबर ॥ चरणसुंदरतुजनमो ॥ ५ ॥ घेऊनअव-
तारदुष्टांसीमारिसी ॥ भक्तांसीरक्षिसीनिरंतर ॥ ६ ॥ राव-
णकुंभकर्णमारिसीआत्मारामा ॥ सोडविलेंआम्हांबंदीहूनी

॥ ७ ॥ तुझें मी बाळक वेडें अविचारी ॥ नामा म्हणे करी कृपा आतां ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १०२ ॥

भवसिंधु तराया एकचि उपाय ॥ ध्यावे तुझे पाय वासुदेवा ॥ १ ॥ गोविंद गोपाळ वाचेसी निखळ ॥ उद्धरे तात्काळ कलीमाजीं ॥ २ ॥ नारायण नारायण करी जो पारायण ॥ तो उद्धरे जाण इहलोकीं ॥ ३ ॥ तुटती यातना कर्मांच्या भावना ॥ जड जीवा उद्धरणा नामस्मरा ॥ ४ ॥ अहर्निशीं कीर्ति गाती भाविक भोळे ॥ त्यांणीं तुज जिंकिलें ब्रह्मा ह्मणे ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसें दाविलें सुगम ॥ न लगे तुह्मां नेम नाना कोटी ॥ ६ ॥ १०३

कृष्णभक्तीवीण तरला आहे कोण ॥ द्यावा निवडून एक तरी ॥ १ ॥ कार्य आणि कारण लटिका चि शीण ॥ वर्म न कळोन वांयां गेले ॥ २ ॥ नामा ह्मणे माझी खेचर माउली ॥ कृपेनें दाविली वाट मज ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ १०४ ॥

धन्य त्या गोपिका धन्य त्यांच्या गायी ॥ धन्य हेचि मही ब्रह्मा ह्मणे ॥ १ ॥ विश्वात्मा जो हरि क्रीडे यावनांत ॥ तृणादि समस्त धन्य धन्य ॥ २ ॥ धन्य गोवर्धन धन्य वृंदावन ॥ वृक्षादि पाषाण धन्य धन्य ॥ ३ ॥ धन्य हें गोकुळ धन्य हे गोपाळ ॥ व्रजवासी सकळ धन्य धन्य ॥ ४ ॥ धन्य ही यशोदा स्तनदे मुकुंदा ॥ धन्य तूंचि नंदा त्रैलोक्यांत ॥ ५ ॥ ब्रह्मसनातन वेदांसी न कळे ॥ गड्यांसंगें खेळे अरण्यांत ॥ ६ ॥ विश्वाचा जो बाप नंद त्याचा पिता ॥ यशोदेसी माता ह्मणतसे ॥ ॥ ७ ॥ सद्गदित कंठ नेत्रीं जळ वाहे ॥ नामा म्हणे काय मागतसे ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १०५ ॥

इतकेंमागतसें तुज ॥ वनींजन्मदेईंमज ॥ १ ॥ सुखेंक-
रोनिराहीन ॥ तुझेचरणपाहीन ॥ २ ॥ बहुतशिणलों ॥
आतांतुजपाशींआलों ॥ ३ ॥ नकरींअव्हेर ॥ दासतुझा
मींकिंकर॥४॥येतोंकाकुळती॥नामाम्हणेदेवाप्रती ॥५॥१०६

कायदेशीलयांजला ॥ ब्रह्माह्मणेनकळेमला ॥ १ ॥ ह्म-
णसीदेईनमीमुक्ति ॥ तरीऐकारमापती ॥ २ ॥ मारायासीं
आले ॥ त्यांसींस्वरूपींमिळविलें ॥ ३ ॥ नफिटेयांचेंपुण्य॥
तुजवरीझालेंऋण ॥ ४ ॥ येथोनियांनवजासी ॥ मजकळलें
मानसीं ॥ ५ ॥ आणोनियांदेत ॥ गायीगोपाळसमस्त ॥
॥ ६ ॥ घालीपोटामध्येंडोई ॥ क्षमाकरीमाझेआई ॥ ७ ॥
आज्ञाघेऊनियांगेला ॥ नामाह्मणेस्वस्थळाला ॥८॥१०७॥

आनंदें खेळत ॥ रामगडीकृष्णनाथ ॥ १ ॥ गडीह्मण-
तीरामा ॥ ताडफळेंदेईआह्मां ॥ २ ॥ सकळमिळोनी ॥
आलेधेनुकाचेवनीं ॥ ३ ॥ वृक्षहालवोनी ॥ फळेंपाडिती
मेदिनीं ॥ ४ ॥ येतधांवोनीअसुर ॥ करीतयाचासंहार ॥
॥५॥ भक्तांचाअंकित ॥ नामाह्मणेकृष्णनाथ ॥६॥ १०८ ॥

कालिंदीचेडोहींकाळियाचीवस्ती ॥ ऐकपरीक्षितीचरि-
त्रहें ॥ १ ॥ पक्षीश्वापदांनींसोडियेलेंस्थळा ॥ निघताती
ज्वाळातयाडोहीं ॥ २ ॥ विषाचियायोगेंझाडेंजळताती ॥
जीवननघेतीकोणीत्याचें ॥ ३ ॥ वैकुंठनायकतयावनींआ-
ला ॥ गोपाळांचामेळाबरोबरी ॥ ४ ॥ हुतुतुहमामाखेळ
खेळताती ॥ देवासीह्मणतीलपेआतां ॥ ५ ॥ तृषाक्रांत
गायीजहालेगोपाळ ॥ पितीतेव्हांजळकाळीयाचें ॥ ६ ॥

ल्हानालींमुलेंनाहींतयांज्ञान ॥ झालेगतप्राणसकळांचे ॥ ७ ॥ नामाह्मणेतेव्हांकृपादृष्टींपहात ॥ उठवीसमस्त गायीगडी ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १०९ ॥

जगजेठीतेव्हांक्रोधावलाचित्तीं ॥ करीनमीशांतितुझी आतां ॥ १ ॥ माझियालेंकरांदिधलासेत्रास ॥ करीनमी नाशआतांतुझा ॥ २ ॥ त्रैलोक्यांतकोणऐसाहोसमर्थ ॥ माझेशरणांगतमारीलतो ॥ ३ ॥ माझियाभक्तांसींजोकांदुः-खदायक ॥ करीनप्रलयएकत्याजवरी ॥ ४ ॥ स्फुरतातीदंड कांपतीअधर ॥ उठलासत्वरजगदीश ॥ ५ ॥ कळंबाचेवृ-क्षींदेवचढतसे ॥ पीतांबरगोसेखोवीतसे ॥ ६ ॥ जगद्गुरुते-व्हांपुष्पमाळाकाढी ॥ टाकितसेउडीजळामध्यें ॥ ७ ॥ नामा ह्मणेशोकेंव्यापिलेंसमग्र॥करोनिएकाग्रमनऐका ॥८॥११०॥

घालितसेवेढेदिसतसेजळीं ॥ आकांतसकळींमांडियेला ॥ १ ॥ गडीरडतातीवत्सेंपडताती ॥ कपाळपिटिती सकळीक ॥ २ ॥ तुजवांचूनियांरक्षीकोणआह्मां ॥ काय सांगूंरामासकळीक ॥ ३ ॥ रुसल्याआमुचेंकरीसमाधान ॥ तुजविणवनओसवाटे ॥ ४ ॥ आह्मांसाठींतुवांदुष्टांसींमा-रिलें ॥ कोणआतांललेपुरवील ॥ ५ ॥ तुजवांचूनियांआ-म्हींसर्वदीन ॥ नजाऊंयेथूनगोकुळासीं ॥ ६ ॥ वियोगानें तेव्हांपक्षीरडताती ॥ आतांकृष्णमूर्तिकैंचीआह्मां ॥ ७ ॥ बोलोनियांऐसेंनिस्तेजपडती ॥ नदीवाहतांतीस्थिरावली ॥ ८ ॥ नामाह्मणेहोतीदुश्चिन्हेंबहुत ॥ गोकुळींसमस्तवि-चारिती ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १११ ॥

यशोदाव्याकुळजहालीसेप्राणें ॥ सुखीअसोतान्हेंवनामाजीं ॥ १ ॥ उठतीतिडकास्तनींमाझ्याफार ॥ लवतसे नेत्रवेळोवेळां ॥ २ ॥ जीवतळमळीदाटेमाझाघसा ॥ पाहीनपाडसाकेव्हांमाझ्या ॥ ३ ॥ गोकुळींचेजननिघालेसकळ ॥ पहातीगोपाळवनामध्यें ॥ ४ ॥ कालिंदीच्यातीरींपडलेसकळ ॥ पाहूनिकोल्हाळकरिताती ॥ ५ ॥ कपाळपिटिती यशोदारोहिणी ॥ आतांचक्रपाणीकैंचाआह्मां ॥ ६ ॥ धांवधांवकृष्णादावीरेवदना ॥ पाजूंआतांपान्हाकोणालागीं ॥ ७ ॥ तुझियाकौतुकेंकंठींमीसंसार ॥ जळतेंअंतरतुजसाठीं ॥ ८ ॥ कोणावरीआतांघालूंअलंकार ॥ बुडालेंहेंघरमाझें आतां ॥ ९ ॥ नामाम्हणेशोकेंजाऊंपाहेप्राण ॥ सकळांचें जीवनकृष्णनाथ ॥ १० ॥ ॥ ॥ ॥ ११२ ॥

नंदम्हणेमाझेंबुडालेंजहाज ॥ अभाग्यासीमजकृष्णकैंचा ॥ १ ॥ कायमाझेंतपसंपूर्णसरलें ॥ म्हणोनीबुडालेंतान्हें माझें ॥ २ ॥ चिंतनेंव्याकुळपिटीवक्षस्थळा ॥ दावागेसांवळाप्राणमाझा ॥ ३ ॥ आलीयाअतीतात्रासेंदवडिलें ॥ ह्मणोनिबुडालेंबाळमाझें ॥ ४ ॥ प्रातःकाळींपाहूंकोणाचेंमीमुख ॥ येथूनियांसुखनाहींनाहीं ॥ ५ ॥ समस्तांचीदृष्टिकरी तुजकष्टी ॥ म्हणोनिजगजेठीटाकियेलें ॥ ६ ॥ गोकुळींचेजनदेऊंपाहतीप्राण ॥ वांचायाकारणकायआतां ॥ ७ ॥ अभयदेतसेबळिभद्रसर्वांसी ॥ मारुनीदुष्टासीयेईलआतां ॥ ८ ॥ अंतर्यामीजाणेजनझालेवेडे ॥ नामाह्मणेवेढेकाढीतसे ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ११३ ॥

तयाचेमस्तकींनाचेनारायण ॥ आरंभीगायनजगदीश

॥ १ ॥ त्रैलोक्याचाभारघालीहृषीकेशी ॥ दमीतदुष्टासीस्वामीमाझा ॥ २ ॥ होतांएकक्षणझालातेव्हांक्षीण ॥ जाऊं पाहेप्राणकाळीयाचा ॥ ३ ॥ तेव्हांत्याच्यास्त्रियायेतीकाकुळती ॥ लक्ष्मीच्यापतीकृपाळुवा ॥ ४ ॥ यज्ञेशाअच्युतागोविंदामाधवा ॥ दयानिधीकेशवाकृष्णनाथा ॥ ५ ॥ श्रीधरा वामनाअगावासुदेवा ॥ ऐकावीहीदेवाविज्ञापना ॥ ६ ॥ आह्मालागींआतांदेईंचुडेदान ॥ धरीतीचरणदेवाजीचे ॥ ॥ ७ ॥ दीनांचादयाळुदासांचाकैवारी ॥ नामाह्मणेहरिउतरला ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ११४ ॥

राहूंनकायेथेंजावेंसमुद्रासी ॥ सांगेहृषीकेशीसकळिकां ॥ १ ॥ तुझियामस्तकींअसतीचरण ॥ नभक्षीचजाणपक्षीराज ॥ २ ॥ दिव्यसुमनांच्याघालितातीमाळा ॥ पूजिती सांवळाबापमाझा ॥ ३ ॥ अनर्घ्यरत्नांचेदेतीअलंकार ॥ श्रीमुखसुंदरपहातातीं ॥ ४ ॥ जांबुनदताटींघालितीभोजन ॥ निघतीतेथूनसकळीक ॥ ५ ॥ आलाभगवानआनंदलेगडी ॥ उभारितीगुढीजनतेव्हां ॥ ६ ॥ काळियाआख्यानस्मरेजोमानसीं ॥ नखंडीतयासीसर्पकुळ ॥ ७ ॥ अहर्निशीयाचेंकरीजोपठन ॥ नामाह्मणेविघ्ननाहींतया ॥ ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ११५ ॥

आलावनमाळी ॥ मगभेटतीसकळीं ॥ १ ॥ यशोदारोहिणी ॥ पोटींधरितीचक्रपाणी ॥ २ ॥ गायीधांवतातीं ॥ कृष्णअंगातेंचाटिती ॥ ३ ॥ उड्यामारितातीं ॥ गडीआनंदेंनाचती ॥ ४ ॥ नवर्णवेतोआनंद ॥ नामयाचीबुद्धि मंद ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ११६ ॥

झालाअस्तमानतेथेंचिराहती ॥ ऐकेपरीक्षितीअद्भुततें ॥ १ ॥ निद्रेनेंव्यापिलेंअसेतेव्हांसर्वां ॥ लागलावणवातयावनीं ॥ २ ॥ गायीपळतातीपक्षीउडताती ॥ पिलेंपडतातीकृष्णापुढें ॥ ३ ॥ हाहाकारझालाधांवधांवकृष्णा ॥ वांचवीरेप्राणांसकळांच्या ॥ ४ ॥ तुझींआम्हींबाळेंवांचवीरेआह्मां ॥ धांवधांवरामाह्मणताती ॥ ५ ॥ आक्रोशेंरडतीमारितातीहांका ॥ वैकुंठनायकारक्षीआह्मां ॥ ६ ॥ दीनांचादयाळमनाचाकोमळ ॥ घालीअग्निज्वाळमुखामध्यें ॥ ७ ॥ होताप्रातःकाळसकळउठले ॥ नामाह्मणेआलेगोकुळांत ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥११७॥

दुष्टदुराचारी ॥ गोपाळाचावेषधरी ॥१॥ दैत्यओळखिला ॥ रामेंप्रलंबमारिला ॥ २ ॥ देवकरितीजयजयकार ॥ पुष्पेंवर्षतीअपार ॥ ३ ॥ सूर्यआलासेमाध्याह्नां ॥ देवावहातीभोजना ॥ ४ ॥ नामाह्मणेपाचारिती ॥ गडीएकत्रबैसती ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ११८ ॥

एकेठायींकरुनीअन्न ॥ हातेंवाढीनारायण ॥ १ ॥ हें पाहोनीसुरवर ॥ चित्तींकरितीविचार ॥ २ ॥ धन्यपुण्यगोळियांचें ॥ आम्हांअन्नमिळेकैंचें ॥ ३ ॥ एकअसेयुक्ति ॥ हातधुईलश्रीपती ॥ ४ ॥ उच्छिष्टाचेंमिसें ॥ देवजळींहोतीमासे ॥ ५ ॥ हेंकळलेंघननीळा ॥ सांगतसेहोगोपाळा ॥६॥ चलावृंदावनाजाऊं ॥ नामाह्मणेउदकघेऊं ॥७॥११९॥

तृणाचियालोभेंगायीगेल्यादूरी ॥ पाचारीमुरारीनामें त्यांचीं ॥ १ ॥ चंद्रभागेगंगेभागीरथीयमुने ॥ येईताम्रपर्णेधांवोनियां ॥ २ ॥ सरस्वतीप्रवरेकालिंदीनर्मदे ॥

येईतुंगभद्रेंधांवोनियां ॥ ३ ॥ देवाजींचाशब्दऐकोनिया कानीं ॥ येतातींधांवोनींनामाह्मणे ॥ ४ ॥ ॥१२०॥

त्रिभंगीदेहुडेंउभेवृंदावनीं ॥ वेणूचक्रपाणीवाजवितो ॥ १ ॥ तयावरीगायींटाकितातीमाना ॥ बाळेंस्तनपाना विसरती ॥ २ ॥ सर्पआणिनागमुंगुसेंबैसती ॥ जळेंहीवि- सरतीवाहणेंतें ॥ ३ ॥ हस्तिसिंहएकेठायींबैसताती ॥ भ्र- मरभुलतीवेणूनादें ॥ ४ ॥ विंचरितांवेणीतेथेंराहेफणी ॥ करितांभोजनींग्रासमुखीं ॥ ५ ॥ उदकांचेकुंभगोपिकांचे शिरीं ॥ यमुनेचेतीरींवेडावल्या ॥ ६ ॥ जहालेतटस्थत्रि- लोकींचेजीव ॥ विसरलाशिवदेहभाव ॥७॥ नामाह्मणेव्योमीं उभ्यादेवांगना ॥ पाहोनियांकृष्णाभुलताती ॥ ८ ॥१२१॥

मार्गशीर्षमासींकात्यायनीव्रत ॥ कुमारीसमस्तआचर- ती ॥ १ ॥ अरुणोदयींयेतीकालिंदीचेतीरीं ॥ गातील्या सुंदरीकृष्णलीला ॥ २ ॥ सिकतेचीमूर्तिकरुनीदेवीची ॥ पूजाअर्चातिचीकरिताती ॥ ३ ॥ जोडोनियांकरकरिती स्तवना ॥ ऐकेविज्ञापनाआदिमाये ॥ ४ ॥ नंदाचानंदनदे- ईआह्मांपती ॥ नामाह्मणेयेतीस्वस्थळासी ॥५॥ ॥१२२॥

कालिंदीचेतीरींवस्त्रेंठेविताती ॥ जळांतरिघतीसकळीक ॥ १ ॥ गड्यांसमवेतआलातेथेंकृष्ण ॥ करावयापूर्णव्रत त्यांचें ॥ २ ॥ वस्त्रेंघेवोनियांचढेवृक्षावरी ॥ घाबरल्यानारी पाहोनियां ॥ ३ ॥ वस्त्रेंदेईआतांआमुचींमुकुंदा ॥ जावो- नियांनंदासांगूंआतां ॥ ४ ॥ अच्युताअनंताकृष्णागरुड- ध्वजा ॥ दासीआह्मीतुझ्यासकाळिका ॥ ५ ॥ वाजतसेशी- तजाऊंपाहेप्राण ॥ यशोदेचीआणतुजअसे ॥६॥ ऐकोनियां

नामाह्मणेदेवहांसे ॥ धर्मसांगतसेतयांलागीं ॥ ७ ॥१२३॥

नग्नहोवोनियांस्नानजेकरिती ॥ त्यांचींव्रतेंहोतीनिरर्थक ॥ १ ॥ स्वरेंकरोनियांयागेमजपाशीं ॥ सांगतोंतुह्मांसी प्रायश्चित्त ॥ २ ॥ एकीआडएकगुह्यस्थानींहात ॥ आनंदबहुतमनामध्यें ॥ ३ ॥ करानमस्कारसांगेवनमाळी ॥ एकहस्तभाळींलाविताती ॥ ४ ॥ देवांद्विजांऐसाकारितांनमस्कार ॥ पापयाचेंफारधर्मशास्त्रीं ॥ ५ ॥ ऐकोनियांऐसें लज्जासोडोनियां ॥ पडतातीपायाआदित्याच्या ॥ ६ ॥ वस्त्रदेततेव्हांतयांजगज्जीवन ॥ मनोरथपूर्णकरीनमीं ॥ ७ ॥ नामाह्मणेयेतीगोकुळासीनारी ॥ चालिलाश्रीहरितेथूनियां ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १२४ ॥

प्रातःकाळींसांगेसकळांश्रीकृष्ण ॥ नकाघेऊंअन्नआज कोणी ॥ १ ॥ सोडोनियांगायीचालिलेवनासीं ॥ गडीहृषीकेशीखेळताती ॥ २ ॥ वर्जियेलेंआह्मांनकाघेऊंअन्ना ॥ खावेंकायकृष्णाआजीआतां ॥ ३ ॥ गडीयांसींसांगेवैकुंठींचाराणा ॥ सांगावेंब्राह्मणांजाऊनियां ॥ ४ ॥ वनींउपवासीआहेतरामकृष्ण ॥ द्यावेंत्यांसीअन्नकृपाकरोनी ॥ ५ ॥ गोपाळांसीतेव्हांधाडीवासुदेव ॥ पहावयाभावयाज्ञिकांचा ॥ ६ ॥ जोडोनियांहातवंदितीद्विजांसी ॥ धाडिलेंआह्मांसीकृष्णनाथें ॥ ७ ॥ नामाह्मणेऐसेंसांगतीगोपाळ ॥ याज्ञिकांसबळअभिमान ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥१२५॥

पडेप्रायश्चित्तबोलूंनकाकोणी ॥ ऐकूंनयेकानींशब्दयांचा ॥ १ ॥ स्वर्गसुखासाठींकरितातीयज्ञ ॥ टाकितीअवदानअग्निमुखीं ॥ २ ॥ भोक्तावनींआलानकळेचित्यांला ॥

तेपूर्णब्रह्मालानजाणती ॥ ३ ॥ कृपाळुबहुतपरीक्षितीराया ॥ उद्धारकरायापाठविलें ॥ ४ ॥ इच्छामात्रेंपाडीअन्नाचेपर्वत ॥ काकुळतीयेतअन्नासाठीं ॥ ५ ॥ गडियांसींकळेतेथीलआकार ॥ निघतीसत्वरतेथूनियां ॥ ६ ॥ येऊनियांकृष्णासांगितलेंत्यांनीं ॥ हांसेचक्रपाणीनामाह्मणे ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १२६ ॥

कृष्णापांचखाणीउथळदिसती ॥ ल्हानाल्याभिंतील्याजवरी ॥१॥ विस्तवघालितातीगवतआंथरिती ॥ बडबड करितीअवघेजण ॥ २ ॥ घालूनियांतूपह्यातींघेतीचाटू ॥ करितीऊंफटूअसकावेळ ॥ ३ ॥ लांकडाचेंपाळेंघेऊनिबैसला ॥ मिळालासेमेळात्याजपुढें ॥ ४ ॥ येवढेंसेंभांडेंतांदूळ शिजविती ॥ तुजलाकायदेतीत्यांतूनियां ॥ ५ ॥ घडींघडींउठतीघडींघडींबैसती ॥ तेंकायश्रीपतीआह्मांसांगा ॥ ॥ ६ ॥ कायचतुराईअसेत्यागोपाळां ॥ भावासीभुलला नामाह्मणे ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १२७ ॥

गडियांसितेव्हांसांगितलेंदेवें ॥ स्त्रियांसिंसांगावेंजाऊनियां ॥ १ ॥ नकोकृष्णाद्विजआह्मांसिमारिती ॥ अभय श्रीपतीत्यांसिदेत ॥ २ ॥ त्वरेंकरोनियांगेलेस्त्रियांपाशीं ॥ सांगितलेंत्यांसिवर्तमान ॥ ३ ॥ ऐकोनियांऐसेंउठिल्यासत्वर ॥ वर्जितीभ्रतारतेव्हांत्यांचे ॥ ४ ॥ एकाब्राह्मणानें स्त्रियेसीबांधिलें ॥ प्राणासीसोडिलेंपरीक्षिती ॥५॥ सुकुमार सांवळाराजीवलोचन ॥ पहातातीकृष्णमुखतेव्हां ॥ ॥ ६ ॥ आनंदाचेंनेत्रींवहातेंजीवन ॥ पुसेवर्तमाननामा ह्मणे ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १२८ ॥

घराजावेंऐसेंसांगेपुरुषोत्तम ॥ ऐकोनियांश्रमफारहोय ॥ १ ॥ दयानिधीऐकेअगामेघश्यामा ॥ धाडूनकोआह्मां येथूनियां ॥ २ ॥ तुजसाठींआह्मींसोडिलेंभ्रतारा ॥ चरणींदेईथारादेवराया ॥३॥ देवनासंसारआह्माझालेंकृष्णा ॥ सांगावेंहेंकोणादुःखआतां ॥ ४ ॥ तुमचेभ्रतारवंदितीतुह्मांसीं ॥ सांगेहृषीकेशीभिऊंनका ॥ ५ ॥ सांगतांचिऐसें चालिल्यात्यासर्व ॥ पहातीकेशववेळोवेळीं ॥ ६ ॥ द्विजांचेमानसींहोयअनुताप ॥ निंदितातीआपआपणांतें ॥ ॥ ७ ॥ भोजनकरूनिगडीरामकृष्ण ॥ निघतीतेथूननामा ह्मणे ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १२९ ॥

इंद्राचाविभागभक्षीचक्रपाणी ॥ रूपगोवर्धनीधरूनियां ॥ १ ॥ क्रोधावलाइंद्रगौळियांनिंदीत ॥ दावीनसामर्थ्यंतुह्मांआतां ॥ २ ॥ पोराच्याबुद्धीनेंवर्ततातीसर्व ॥ धरूनियांगर्वतेंचिकरी ॥ ३ ॥ प्रलयमेघांच्याकाढिल्याशृंखळा ॥ वर्षावेंगोकुळांजावोनियां ॥ ४ ॥ आज्ञाह्मणोनियां वंदियेलाइंद्र ॥ कोपेजैसारुद्रप्रलयींचा ॥ ५ ॥ मुसळाच्याधारामेघवर्षताती ॥ धारापडतातीशिळाऐशा ॥ ६ ॥ मरतातीपक्षीश्वापदेंअपार ॥ हिंवेंनारीनरकांपताती ॥ ॥७॥ नामाह्मणेगायीहंबरडाफोडिती ॥ येऊनिपडतातीकृष्णापुढें ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १३० ॥

काकुळतीयेतसकळीकळोक ॥ पहासीकौतुककायआतां ॥ १ ॥ मागेंबहुतापरींरक्षियेलेंआम्हां ॥ अगापुरुषोत्तमादीनबंधु ॥ २ ॥ कोणतुजवीणआह्मासीरक्षिता ॥ उदाराअनंताजगजेठी ॥ ३ ॥ शरणशरणअगावासुदेवा ॥

अच्युतामाधवादयासिंधु ॥ ४ ॥ विलंबकरितांजातीलरेप्रा-
ण ॥ धरितीचरणनामाह्मणे ॥ ५ ॥ ॥ ॥ १३१ ॥

सकळिकांतेव्हांदेवेंआश्वासिलें ॥ इंद्रेंहेंमांडिलेंविघ्नये-
थें ॥ १ ॥ महेंद्राचारंककरीनक्षणांत ॥ पहापुरुषार्थदा-
वीनमी ॥ २ ॥ रक्षणारयांसीआहेंमीगोविंद ॥ उतरीन
मदतुझाआतां ॥ ३ ॥ शरणागतामारीकोणऐसाथोर ॥
मशकपामरपाहूंआतां ॥ ४ ॥ यासाठींकरीनसृष्टीचाउभा-
रा ॥ लागोंनेदीवारादुःखाचामी ॥ ५ ॥ गोवर्धनातुम्हींच-
लारेसकळ ॥ दावितोंमीबळइंद्राआतां ॥६॥ उचलिलागि-
रीप्रथमअंगुळीं ॥ नामाह्मणेवळीबापमाझा ॥ ७ ॥ १३२ ॥

रहायाचेतळींआनंदेंकरूनी ॥ मानूंनकामनींभययाचें
॥ १ ॥ पाहूंकितीदिवसपडतोपाऊस ॥ धरीनानिःशेषप्र-
ळयांत ॥ २ ॥ सांगतांचिऐसेंरहातीसकळ ॥ वर्णितातीं
बळपरस्परें ॥ ३ ॥ सौंगडेह्मणतीपडेलअवचित ॥ लावा
कींरेहातसकळिक ॥ ४ ॥ उगेंचिश्रमतीबाळकेंअज्ञान ॥
ह्मणेनारायणकाढाहात ॥ ५ ॥ सप्तदीनहोतीसांगतोयो-
गींद्र ॥ पहावयाइंद्रयेताझाला ॥ ६ ॥ अद्भुतचरित्रपाहून
गेलीभ्रांत ॥ मेघांसीसांगतपुरेकरा ॥७॥ नामाह्मणेइंद्रम-
नींतोशंकला ॥ अपराधघडलासमर्थाचा ॥ ८ ॥ १३३ ॥

राहिलापाऊसनिघावेंबाहेर ॥ सांगेविश्वंभरसकळांसी
॥ १ ॥ दीनवंधुतेव्हांठेवीपर्वतासी ॥ भेटतीदेवासींसक-
ळीक ॥ २ ॥ आयुष्यबहुततुजहोवोकृष्णा ॥ वांचविलें
प्राणांसकळांच्या ३ ॥ विष्णुदासनामाओंवाळूनजाय ॥
येगेमाझेमायभेटीदेईं ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥१३४॥

वहातसेनेत्रींइंद्राचियानीर ॥ अपराधीथोरदेवराया ॥ ॥ १ ॥ क्षमाकरीआतांअच्युताअनंता ॥ अगाकृष्णनाथा दीनबंधू ॥ २ ॥ तुझियादासांसींदुःखम्यांदिधलें ॥ भ्रांतीनेंमोहिलेंमनमाझें ॥ ३ ॥ दावीतुजथोरीनकरींचसेवा ॥ करादंडदेवामजलागीं ॥ ४ ॥ तूंचिमाझाबापतूंचिमाझी आई ॥ क्षमाकृष्णाबाईकरीआतां ॥ ५ ॥ दैत्यमारावया भूतळींआलासी ॥ भक्तांलारक्षिसीनिरंतर ॥ ६ ॥ जगद्गुरुमाझाधनीवनमाळी ॥ जोडोनिअंजुळीउभाअसे ॥ ॥ ७ ॥ चतुर्भुजगळांवैजयंतीमाळा ॥ पहातसेडोळांनामा ह्मणे ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १३५ ॥

गोविंदामाधवाकेशवावामना ॥ मायातीताकृष्णातुज नमो ॥ १ ॥ गोवर्धनोद्धारादेवाविश्वंभरा ॥ निर्गुणनिराकारातुजनमो ॥२॥ जनार्दनाहरीकृपाळुवाहृषीकेशा ॥ पुराणपुरुषातुजनमो ॥ ३ ॥ अव्यक्ताक्षेत्रज्ञाअचिंत्याकूटस्था ॥ भुवनैकनाथातूजनमो ॥ ४ ॥ अनंतब्रह्मांडेंतुझिये उदरीं ॥ घनश्यामहरीतुजनमो ॥ ५ ॥ देवरायातुझेंकोमळहृदय ॥ कृपादृष्टींपाहेमजकडे ॥ ६ ॥ तुझामीकिंकर आहेंवासुदेवा ॥ अभययाजीवादेईआतां ॥७॥ नामाह्मणे घालीचरणासींमिठी॥बोलेजगजेठीस्वामीमाझा॥८॥१३६॥

तुझामोडिलाम्यांयज्ञ ॥ ऐकेंतयाचेंकारण ॥ १ ॥ नकरिसीस्मरण ॥ सुखारूढतुझेंमन ॥ २ ॥ विसरलासीमज॥ अनुग्रहकेलातुज ॥ ३ ॥ ऐसेंसांगेनारायण ॥ नामाह्मणे समाधान ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १३७ ॥

आणूनिसुरभिकरीअभिषेक ॥ येतीसकळीकमरुद्गण

॥ १ ॥ सुरवरांचीदाटीकरितीनमस्कार ॥ होतसेअपार पुष्पवृष्टि ॥ २ ॥ वेदमंत्रघोषऋषीकरिताती ॥ अप्सरानाचतीथयथया ॥ ३ ॥ नारदतुंबरगंधर्वगायन ॥ वर्णिताती गुणकृष्णजीचे ॥ ४ ॥ यथाविधीइंद्रपूजीविश्वंभर ॥ जोडोनियांकरउभाराहे ॥ ५ ॥ आज्ञाघेऊनियांजायस्वस्थळासीं ॥ येतीगोकुळासींसकळीक ॥६॥ चरित्रजोकोणी उच्चारीलवाचे ॥ जळतीपापाचेपर्वतते ॥ ७ ॥ नामाह्मणेऐसेंसांगतसेशुक ॥ सूतपुराणिकशौनकासी ॥८॥१३८॥

अहर्निशींकंसबैसेचिंताक्रांत ॥ विचारपुसतप्रधानासी ॥ १ ॥ प्रतिज्ञाकरोनीशत्रुवधाजाती ॥ तेमागेंनयेतीपरतोनी ॥ २ ॥ आतांपुरुषार्थीकोणपाठवावा ॥ तोमजसांगावानिवडोनी ॥ ३ ॥ सांगतीप्रधानधाडाअसुरासुर ॥ तंवतोअसुरउभाराहे ॥ ४ ॥ ह्मणेमृत्युनसेमजकोणाहातीं॥ द्वापारींमारुतीगुप्तझाला ॥ ५ ॥ ऐकोनियांऐसेंआनंदमानसीं ॥ गौरविलेंत्यासींनानापरी ॥६॥ नामाह्मणेकाळेंबोलाविलेंत्यासी ॥ सत्वरवनासीयेताझाला ॥ ७ ॥ ॥१३९॥

आनंदेंवनांतखेळतातीगोप ॥ गायींचेकळपचरताती ॥ १ ॥ अकस्मातदैत्यदेखतीदुरून ॥ ह्मणतीकृष्णाविघ्न थोरआलें ॥ २ ॥ लपेतूंकान्होबाह्मणतातीगडी ॥ घालितोंघोंगडीतुजवरी ॥३॥ घाबरलेतेव्हांसमस्तगोपाळ ॥ पाहोनीघननीळडोलतसे ॥ ४ ॥ तुह्मींकांहींचिंतानकरामानसीं ॥ मारितोंमीयासीक्षणामाजीं ॥५॥ राहोनियांउभापहातअंतरीं ॥ यासीमृत्युकरींकोणाचिया॥६॥ वातात्मजाहातीं तीमरणअसेयासी ॥ कळलेंदेवासीनामाह्मणे ॥ ७ ॥१४०॥

गायीगोपाळतेव्हांलपवोनीक्षणेक ॥ जानकीनायकझा-
लादेव ॥ १ ॥ आकर्णनयनहातींधनुष्यबाण ॥ करीतसे
ध्यानमारुतीचें ॥ २ ॥ स्वामीचातोधांवाऐकोनियांकानीं ॥
हडबडिलामनींकपींद्रतो ॥ ३ ॥ निघोनीत्वरितवनामाजीं
आला ॥ चरणांसीलागलाप्रेमभावें ॥ ४ ॥ ह्मणेस्वामीकां-
हींसेवकासीआज्ञा ॥ करावीसर्वज्ञादयानिधी ॥ ५ ॥ देव
ह्मणेबारेकायसांगूंफार ॥ पैलतोअसुरयेतआहे ॥ ६ ॥ तु-
झ्याहातेंअसेतयासीमरण ॥ ह्मणोनीस्मरणकेलेंतुझें ॥ ७ ॥
तयासीजाऊनिमारावेंत्वांआतां ॥ चरणींठेवूनिमाथानि-
घालातो ॥ ८ ॥ दुर्जनेंतवेळींमारुतीपाहिला ॥ ह्मणेकाळ
आलाकोठोनियां ॥ ९ ॥ धरोनियांनर्डीकेलागतप्राण ॥
पुनरपियेऊनवंदीतसे ॥ १० ॥ नामाह्मणेदोनीजोडोनि-
यांकर ॥ बोलिलाउत्तरकायआतां ॥ ११ ॥ ॥१४१॥

त्रेतायुगींख्यातिकरोनियांथोर ॥ वधिलेअसुररावणादि
॥ १ ॥ कोण्याहेतूस्तवपुन्हांआगमन ॥ सांगाकृपाकरून
दासालागीं ॥ २ ॥ ऐकोनिवचनबोलेसर्वेश्वर ॥ द्वापारीं
अवतारआठवाहा ॥ ३ ॥ तुझेभेटीस्तवरूपहेंधरिलें ॥ दा-
वीतेंवहीलेंकपीह्मणे ॥ ४ ॥ कृष्णलीलापाहूंहेतूआहेचि-
त्ता ॥ दावीसीताकांतादीनालागीं ॥ ५ ॥ चतुर्भुजरूपदा-
विलेंप्रगट ॥ शिरींमोरमुकुटशोभतसे ॥ ६ ॥ गुंजाहार
गळांवैजयंतीमाळा ॥ कांसेशींपिंवळापीतांबर ॥ ७ ॥ न-
वलक्षगायीगोपहीतितुके ॥ खेळतीकौतुकेंकरोनियां ॥
॥ ८ ॥ नामाह्मणेतेव्हांस्तुतितेंकरीत ॥ नकळेतुझाअंत
ब्रह्मादिकां ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १४२ ॥

द्वापारींचींठेवसंपूर्णपाहून ॥ विनवीजोडूनकरालागीं ॥ १ ॥ रामरूपधरूनमजबोळवावें ॥ तेंरूपरहावेंहृदयामाजीं ॥ २ ॥ मनोरथत्याचाऐकोनिश्रवणीं ॥ झालाचापपाणीतात्काळिक ॥ ३ ॥ पाहोनियाध्यानकरोनिनमन ॥ निघालातेथूनवायुसुत ॥४॥ घेऊनियांआज्ञासेतुबंधागेला ॥ ध्यानस्थबैसलानामाह्मणे ॥ ५ ॥ ॥ ॥ १४३ ॥

गौळीह्मणतीहृषीकेशी ॥ दावीआपुल्यास्थळासी ॥१॥ सखातूंचिकृष्णा ॥ आमुचीपुरवावीवासना ॥ २ ॥ दावीवैकुंठसकळां ॥ क्षणएकपाहूंडोळां ॥ ३ ॥ नामातेथीलरहिवासी ॥ आलास्थापायाभक्तांसीं ॥ ४ ॥ ॥ १४४ ॥

लोपतांआदित्यपडेचंद्रप्रभा ॥ वृंदावनींउभासुशोभित ॥ १ ॥ देहुडापाउलीउभातयेवनीं ॥ वेणुचक्रपाणीवाजवितो ॥ २ ॥ ऐकतांचिनादगोकुळींच्यानारी ॥ पहावयाहरिनिघताती ॥ ३ ॥ भ्रतारसेजेसींटाकूनिउठती ॥ वाढितांपंगतीनिघताती ॥ ४ ॥ स्तनदेतांबाळेंटाकिलींभूमीसी ॥ आनंदमानसींनसमाये ॥ ५ ॥ नामाह्मणेविसरल्यादेहभाव ॥ सकळांचाजीदेवावरी ॥६॥ ॥ १४५ ॥

वनामध्येंकांगेआल्यातीसकळ ॥ विनोदेंगोपाळह्मणतसे ॥ १ ॥ निशीमाजींव्याघ्रफिरतातीरानीं ॥ जावेंसकळांनींघरांआतां ॥ २ ॥ ऐकोनियांऐसेंकठिनवचन ॥ चाललेंजीवननेत्रींहूनी ॥३॥ वेणुनाददूतधाडिलाआह्मांसीं ॥ आलीयाह्मणसीजावेंआतां ॥ ४ ॥ शहाणाचतुरआहेसीनेटका ॥ वैकुंठनायकाविचारावें ॥ ५ ॥ कामाग्नीनेंकृष्णापीडिलोंसकळ ॥ मांडियेलाखेळमन्मथाचा ॥ ६ ॥ एकए-

कनारीएकएककृष्ण ॥ करावयापूर्णइच्छात्यांची ॥ ७ ॥ प्रकृतीसीऐसाभुललागोविंद ॥ करितीआनंदनामाम्ह-णे ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १४६ ॥

झालाअभिमानधन्यआम्हीआतां ॥ लक्ष्मीच्याकांता भोगितसों ॥ १ ॥ गुप्तझालातेव्हांवैकुंठनायक ॥ करिताती शोकसकळीक ॥ २ ॥ निघाल्यातेथूनिफिरतातीवनें ॥ य-शोदेचेंतान्हेंधुंडावया ॥ ३ ॥ वृक्षआदिपक्षीपुसतातीत-यांसी ॥ तुह्मींहृषिकेशीदेखियेला ॥ ४ ॥ मृगांसीपुसती देखियेलाडोळां ॥ सांगानासांवळाकोणीतरी ॥ ५ ॥ आ-ह्मांवरीतुह्मींकायरेकोपतां ॥ सांगारेभगवंतापुसतसों ॥ ६ ॥ कुरवंडीकरूंसकळांचेप्राण ॥ देऊंत्याभूषणअंगावरील ॥ ॥ ७ ॥ नामाम्हणेजेथेंअसेअभिमान ॥ तेथेंनारायणनाहीं नाहीं ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १४७ ॥

ऐकावेंचरित्रपरीक्षितीराया ॥ वरोबरीजायाएकअसे ॥१॥ तोडोनियांपुष्पेंकरीअलंकार ॥ घालीतश्रीधरतिज-वरी ॥ २ ॥ नयेक्षणभरीयोगियांचेध्यानीं ॥ घालीतसे वेणीआवडीनें ॥ ३ ॥ वंदियेलीशिवेंचरणींचीगंगा ॥ करी तसेभांगानीटतिच्या ॥ ४ ॥ गोपिकांच्यावेषेंप्रगटल्याश्रु-ती ॥ गुह्यतुजप्रतीसांगितलें ॥ ५ ॥ घेवोनियांतिसीगेला कुंजवना ॥ वज्रांकुशाचिन्हेंउमटतीं ॥ ६ ॥ गोपिकांचामे-ळायेतसेतांतडीं ॥ युगाऐशीघडीझालीतयां ॥ ७ ॥ नलगेचिशोधशिणतीसकळा ॥ नजातीगोकुळांनामा म्हणे ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १४८ ॥

चंद्राच्याप्रभेनेंचमकतींपाउलें ॥ दुरोनिदेखिलेंगोपिकांनीं ॥ १ ॥ कृपणाचेंधनहोतेंजेंचळलें ॥ तयासीलाधलें अवचितां ॥ २ ॥ एकीमागेंएकधांवतातीनारी ॥ आहेतेथें हरिऐसेंवाटे ॥ ३ ॥ घेऊनियांरजलावितातीभाळां ॥ पहातीसकळान्याहाळुनी ॥ ४ ॥ बरोबरीनारीकोणीतरीअसे ॥ पाउलांचेठसेउमटले ॥ ५ ॥ पापिणीगेतुह्मीआह्मीसकळिका ॥ पुण्याचीअधिकाह्मणुनीभोगी ॥ ६ ॥ बरोबरी तिसीहोयअभिमान ॥ झालासेस्वाधीनमाझ्यादेव ॥ ७ ॥ कडेवेसीतरीयेतेंबरोबरी ॥ चालवेनाहरिमजआतां ॥ ॥ ८ ॥ जाणोनीअंतरठकविलेंभगवंतें ॥ नामाह्मणेतेथेंरडतसे ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १४९ ॥

मागोनियागोपीआल्यातिजपाशीं ॥ कोठेंहृषीकेशीसांगआह्मां ॥ १ ॥ टाकोनियांगेलामजपूतनारी ॥ येथेंचि मुरारीगुप्तझाला ॥ २ ॥ वैकुंठनायकाअगानारायणा ॥ दावींरेवदनाएकवेळ ॥ ३ ॥ कृष्णाचेंचरित्रसकळकरिती ॥ मनरंजवितीनामाह्मणे ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ १५० ॥

जोडोनियांहातयेतोकाकुलती ॥ पावकृपामूर्तीआह्मालागीं ॥ १ ॥ अवतारघेसीदुष्टवधायासी ॥ येसीगोकुळासीह्मणोनियां ॥ २ ॥ पाहोनियांतुलालक्ष्मीपातली ॥ दरिद्रेंपळालींयेथोनियां ॥ ३ ॥ सकळांसींसुखद्यावयाआलासी ॥ आह्मींवनवासीदुःखीहोतों ॥ ४ ॥ नामाह्मणेकंठींधरियेला प्राण ॥ दाखवीचरणदयानिधी ॥ ५ ॥ ॥ १५१ ॥

सरोवरींकमळेंतैसेतुझेनेत्र ॥ त्याहुनीविचित्रदिसताती ॥ १ ॥ कृपाळुवाएकेंअगाहृषीकेशी ॥ आह्मीतुझ्यादासी

मोलावीण ॥ २ ॥ कामरूपदैत्यमारितोआह्मांसीं ॥ र-
क्षिताभक्तांसीकीर्तिजगीं ॥ ३ ॥ दीनांसीरक्षिसीदुष्टांसी
मारिसी ॥ धर्मालास्थापिसीनिरंतर ॥४॥ घेऊनियांशस्त्र
मारावेंसकळां ॥ आलासेकंटाळानामाह्मणे ॥ ५ ॥ १५२॥

सुकुमारसांवळेंजैशींरातोत्पलें ॥ दावींतींपाउलेंकृष्ण-
राया ॥ १ ॥ ध्वजवज्रांकुशपद्मतेंशोभलें ॥ दावींतींपा-
उलेंकृष्णराया ॥ २ ॥ दमूनियांदुष्टांबाहेरकाढिलें ॥ दावीं
तींपाउलेंकृष्णराया ॥३॥ रांगतांरांगतांयमलार्जुनमोडिले ॥
दावींतींपाउलेंकृष्णराया ॥ ४ ॥ अघासुराउदरींउभींजींरा-
हिलीं ॥ दावींतींपाउलेंकृष्णराया ॥ ५ ॥ नामाह्मणेज्यांतें
वरुणानेंपूजिलें ॥ दावींतींपाउलेंकृष्णराया ॥ ६ ॥१५३ ॥

सकळांचेंतुझ्याहातींअसेसूत्र ॥ यशोदेचापुत्रनहोशी-
ल ॥ १ ॥ नंदाचियाॠणाफेडायाआलासी ॥ कळलेंआ-
ह्मांसीतुझ्याकृपें ॥ २ ॥ तेहतीसकोटीदेवब्रह्मासदाशिव ॥
प्रार्थितातीसर्वतुजलागीं ॥ ३ ॥ यादवकुळटिळकावैकुंठ-
नायका ॥ विधीच्याजनकाभेटआतां ॥४॥ नामाह्मणेमुख
दाखवीकृष्णनाथा ॥ हरेलतीऽव्यथावियोगाची ॥५॥१५४॥

शरणागतातारीभवसिंधुत्वरित ॥ ठेवावातोहातशिरा-
वरी ॥ १ ॥ अरण्यांतदुष्टदैत्यांसीमारीत ॥ ठेवावातोहा-
तशिरावरी ॥ २ ॥ वेणुपोवाजयाहातांतशोभत ॥ ठेवावा
तोहातशिरावरी ॥ ३ ॥ घेउनीशिदोऱ्यागड्यांसीवांटीत ॥
ठेवावातोहातशिरावरी ॥ ४ ॥ रक्षावयाव्रजाउचलिलापर्व-
त ॥ ठेवावातोहातशिरावरी ॥ ५ ॥ सुवर्णाचींकडींभूषणें
अमूप ॥ पाहतांनिष्पापनामाह्मणे ॥ ६ ॥ ॥ १५५ ॥

अभिमानें घाला घातला आह्मांसी ॥ ह्मणोनी लपसी देवराया ॥१॥ तुजवांचोनियां जाऊं पाहे प्राण ॥ दाखवी वदन एकवेळां ॥२॥ मुकुटकुंडलें श्रीमुख सांवळें ॥ केंशरी लाविलें गंधभाळीं ॥३॥ पाहोनियां जीवीं होय फार सुख ॥ हरेल हीं भूक डोळियांची ॥ ४ ॥ तुजवांचोनिया आह्मां नाहीं कोणी ॥ तिहीं त्रिभुवनीं नामा ह्मणे ॥ ५ ॥ ॥ ॥१५६ ॥

चरणांसी शरण तुझिया जे येती ॥ तेचि उतरती भवसिंधु ॥१ लक्षुमीनें ज्यांतें असें आराधिलें ॥ ठेवीं तीं पाउलें स्तनावरी ॥२ आवडीनें शिवें मस्तकीं वंदिलें ॥ ठेवीं तीं पाउलें स्तनावरी ॥ ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐशी करिताती स्तुती ॥ शिंपियेली क्षिती अश्रुपातें ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १५७ ॥

आह्मांवरी कां रे धरियेला राग ॥ काय तुझें सांग आह्मीं केलें ॥ १ ॥ रडतसों आह्मी मारीतसों हांका ॥ विश्वाच्या जनका नायक सी ॥ २ ॥ कामाग्नीनें आह्मी जळतों सकळ ॥ करावें शीतळ अधरामृतें ॥ ३ ॥ नामा ह्मणे देईं ऐक वेळ भेटी ॥ तुजसाठीं कष्टी फार होतों ॥ ४ ॥ ॥ ॥ १५८ ॥

वाजवोनि वेणू पसरिलें जाळें ॥ आह्मांसी न कळे कपटिया तूं ॥ १ ॥ दुखवोनि सवीं टाकियेलें वनीं ॥ गेलासी वधूनि पारधीया ॥ २ ॥ धरोनियां धीर राहूं एकक्षण ॥ देऊं मग प्राण सकळीक ॥ ३ ॥ सकळांच्या हत्या येती तुजवरी ॥ नामा ह्मणे हरी भेट आतां ॥ ४ ॥ ॥ ॥ १५९ ॥

त्रिविधतापें जे होताती संतप्त ॥ शीतळ करीत कथामृतें ॥ १ ॥ अमृतापरीस कथा ते अधिक ॥ सांगतसें ऐक देवराया ॥ २ ॥ स्वर्गीं जे अमृत प्राशन करिती ॥ पुण्य सरल्या ये-

तीमृत्युलोकां ॥ ३ ॥ तुझीकथादेतअच्युतपदासी ॥ न विचारीमानसींयातींकांहीं ॥ ४ ॥ नाहींचतुराईबोबडेहे बोल ॥ लिहीतविठ्ठलनामाह्मणे ॥ ५ ॥ ॥ १६० ॥

गायीघेवोनियांजातीजेव्हांरानां ॥ आमुचियामनादुःखवाटे ॥ १ ॥ सुकुमारसांवळींजैशींरातोत्पलें ॥ त्यांहूनि कोंवळेपायतुझे ॥ २ ॥ खडेकांटेबहुकठिनतृणमूळें ॥ ठेविसीपाउलेंतयावरी ॥ ३ ॥ पावतोसीक्लेशअगावासुदेवा ॥ ह्मणोनियांजीवादुःखवाटे ॥४॥ सांगतसोंआम्हीनित्ययशोदेसी ॥ धाडूंनकोयासीवनामध्यें ॥ ५ ॥ नामाह्मणेहोयसकळांचाउद्धार ॥ ह्मणोनीश्रीधरवनांजाय ॥ ६ ॥ १६१ ॥

तुजवांचूनियांवैकुंठनायका ॥ आह्मांसीघटिकायुगहोय ॥ १ ॥ अस्तमानहोतांयेसीतूंगोकुळीं ॥ मुखावरीधुळीगोरजाची ॥ २ ॥ कुरळहेकेशसुंदरनासीक ॥ पाहोनियांसुखफारहोय ॥ ३ ॥ लवतीपांपण्यानसोसतीआह्मां ॥ अहर्निशींनामाहेंचिगाय ॥ ४ ॥ ॥ ॥ १६२ ॥

टाकियेलेंआम्हींपतीबंधुसुतां ॥ आलोंतअच्युतातुजपाशीं ॥ १ ॥ आमुचीहीइच्छाकरिशीलपूर्ण ॥ आहेसीकठिनठावेंनाहीं ॥ २ ॥ घालोनियांकुपींकापियेलेंदोरा ॥ साधियेलेंवैराआपुलीया ॥ ३ ॥ वरोनियांटाकीमोठासा पर्वत ॥ म्हणतीसमस्तनामाम्हणे ॥ ४ ॥ ॥ १६३ ॥

तुझेभेटीवीण ॥ जातीसकळांचेप्राण ॥ १ ॥ दयातुझ्या मना ॥ कांरेनयेनारायणा ॥ २ ॥ बोलवेनाआतां ॥ कंठ शोकलाअनंता ॥ ३ ॥ ऐसेंपाहोनियां ॥ नामाह्मणेआली दया ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १६४ ॥

देतसेदर्शन ॥ सकळांसीनारायण ॥ १ ॥ झालासकळांआनंद ॥ हृदयींधरिलागोविंद ॥ २ ॥ टाकोनियांआह्मां ॥ कांगेलासीपुरुषोत्तमा ॥३॥ तुह्मांझालाअभिमान ॥ नामाह्मणेसांगेखूण ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ १६५ ॥

सकळांचीइच्छाकरीतसेपूर्ण ॥ भुललाश्रीकृष्णत्यांच्या भावा ॥ १ ॥ विमानींबैसोनीसुरवरपहाती ॥ गंधर्वगातातीसप्तस्वरें ॥ २ ॥ विणेवाजतातीमृदंगांचेघोष ॥ वाचेंतो उल्हासवर्णवेना ॥ ३ ॥ नजायचंद्रमानजातीनक्षत्रें ॥ पहातीसर्वत्ररासक्रीडा ॥४॥ जलक्रीडाकरीलक्षुमीचापती ॥ लाळघोंटीतातीदेवस्त्रिया ॥५॥ धन्यत्यागोपिकाधन्यत्यांचेंपुण्य ॥ भोगितातीकृष्णपूर्णब्रह्म ॥६॥ नामाह्मणेहोयकामाचीतेमूर्ती ॥ नव्हेवीर्यच्युतिगोविंदाची ॥ ७ ॥ १६६ ॥

होतांप्रातःकाळसांगतसेतयां ॥ जावेंयेथोनियांशीघ्र आतां ॥ १ ॥ क्षणक्षणांपहातीदेवाजीचेंमुख ॥ येतीसकळीकगोकुळासी ॥ २ ॥ परीक्षितीएकेएकाकौतुकासी ॥ होत्यात्याजपाशींत्यांच्यास्त्रिया ॥ ३ ॥ ह्मणोनियांकोणी नाहींविचारलें ॥ अंतरींनकळेदुजियांला ॥४॥ यथामतीरासवर्णिलादेवाचा ॥ संपूर्णहेवाचाकायकरी ॥५॥ चरित्रश्रवण करीलजोकोणी ॥ धन्यतोचिप्राणीनामाह्मणे ॥ ६ ॥१६७॥

सरस्वतीतीरींअंबिकेचेंस्थान ॥ गोकुळींचेजनजातीतेथें ॥ १ ॥ करोनिपूजनकरितीप्रार्थना ॥ नंदाच्यानंदना सुखीराखी ॥ २ ॥ सारितांभोजनलपालाआदित्य ॥ नामाह्मणेतेथेंराहताती ॥ ३ ॥ ॥ ॥ १६८ ॥

निद्रिस्तसकळतयेवनींयाळ ॥ गिळितसेबळेंनंदाला-
गीं ॥ १ ॥ कृष्णाधांववेगींगिळितसेसर्प ॥ काळावरीदर्पतु-
झादेवा ॥ २ ॥ माझियापाडसायेईबाधांवोन ॥ दाखवीवदन
अंतकाळीं ॥ ३ ॥ आलीकायतूजनिद्रारेकान्हया ॥ माझि-
यातान्हयाऊठवेगीं ॥ ४ ॥ ऐकोनियाऐसेंपहातीसकळ ॥
घालितीमुसळसर्पावरी ॥ ५ ॥ श्रमलेसकळसोडीनानंदा-
ला ॥ पिटीवक्षस्थळानंदपत्नी ॥ ६ ॥ उठेजगद्गुरुकायझा-
लेंमाये ॥ लावितसेपायतयालागीं ॥ ७ ॥ टाकियेलेंसर्पेंते-
व्हांकलेवर ॥ पुरुषसुंदरनिघतसे ॥ ८ ॥ नामाह्मणेवाचें
स्तवीविश्वंभरा ॥ करुनीनमस्काराजाताझाला ॥९॥१६९॥

कारितीगायनरामकृष्णहरी ॥ गोकुळींच्यानारीजातीते-
थें ॥ १ ॥ शंखनामातेथेंआलासेगुह्यक ॥ नाहींत्या
विवेकपापियासी ॥ २ ॥ उपजलाकामतयाचियामना ॥ घा-
लोनीविमानास्त्रियानेत ॥ ३ ॥ धांवपावरामानेतसेहाआ-
ह्मां ॥ अगामेघश्यामाकृष्णनाथा ॥ ४ ॥ नेतोस्त्रियाकायन
कळेचिदेवा ॥ यासीकरूंद्यावाअपराध ॥ ५ ॥ हातींवृक्षदो-
घेऐसेंपाहोनियां ॥ टाकोनितोस्त्रियापळतसे ॥ ६ ॥ घालि-
तांचिवृक्षप्राणासीमुकला ॥ मणीत्याचादिलाबळिभद्रा ॥
७ ॥ भक्तासाठींमारीदुष्टाजगंजेठी ॥ नामाह्मणेत्रुटीविस-
रेना ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १७० ॥

गोपिकांचामेळाआलाघराप्रती ॥ कायत्याम्हणतीनं-
दाप्रती ॥ १ ॥ परब्रह्मसाक्षात्क्षीरसागरवासी ॥ त्याकै-
साधाडिसीवनामध्यें ॥ २ ॥ ब्रह्माआणिइंद्रआलेगोकुळा-
सीं ॥ वर्णितीकृष्णासीतुह्मीदेखा ॥ ३ ॥ तेहतीसकोटीदेव

ज्याप्रार्थीत ॥ त्यासीअरण्यांतरुपतीकांटे ॥ ४ ॥ दैत्यां-
चाहाभारझालापृथिवीसी ॥ वधायाकंसासीआलायेथें ॥५॥
त्याजसाठींफारश्रमतातीयोगी ॥ कैलासींचाजोगीध्यान
करी ॥ ६ ॥ भ्रांतिकारेंतुजपडेवेळोवेळां ॥ पहातोसीडोळां
चरित्रास ॥ ७ ॥ नामयासुकृतझालेंअसेफार ॥ ह्मणोनी
विचारनाठवेची ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ १७१ ॥

वृषभाच्यावेषेंआलारिठासुर ॥ इंद्रादिसुरवरभीतीज-
या ॥ १ ॥ बहुदेतोत्रासगोकुळींच्याजना ॥ धांवधांवकृ-
ष्णामारीयाला ॥ २ ॥ जगजेठीतेव्हांधरितसेशिंगें ॥ मा-
रीतसेमागेंभुजावळें ॥ ३ ॥ पाडोनियाखालींदिलापायवर ॥
मारिलाअसुरनामाम्हणे ॥ ४ ॥ ॥ ॥ १७२ ॥

कंसाचियाघराआलानारदमुनी ॥ एकांतींबैसोनीसां-
गतसे ॥ १ ॥ सातवाजोगर्भजिरालाह्मणती ॥ रोहिणी
प्रसवतीबळीराम ॥ २ ॥ आठवाजोपुत्रदेवकीसीझाला ॥
वसुदेवेंनेलानंदाघरीं ॥ ३ ॥ यशोदेचीकन्याघेवोनियां
येत ॥ गेलीआकाशांतमारितांजे ॥ ४ ॥ तुझियामानसीं
आशंकायेईल ॥ होतेरक्षपाळमाझेतेथें ॥ ५ ॥ ईश्वराची
मावनकळेकोणाला ॥ कळलेंमजलात्याच्याकृपें ॥ ६ ॥
घेऊनियाशस्त्रउठिलात्वरित ॥ करितोंमीघातवसुदेवाचा ॥
॥ ७ ॥ तयेवेळींह्मणेब्रह्मयाचासुत ॥ एकएकमातसांग-
तोंमी ॥ ८ ॥ शत्रुवधीआधीमगमारीयासी ॥ आहेतुज-
पाशींकारागृहीं ॥ ९ ॥ सांगोनियाऐसेंशांतविलेंत्यासीं ॥
गेलागोकुळासीनामाह्मणे ॥ १० ॥ ॥ ॥ १७३ ॥

गोकुळायेऊनिभेटेनंदादिकां ॥ वैकुंठनायकासांगतसे ॥ ॥ १ ॥ कंसानेंमांडिलाअधर्मबहुत ॥ मारावेंत्वरिततयालागीं ॥ २ ॥ लावोनियांआगआपणविझविली ॥ तेचपरी केलीनारदानें ॥ ३ ॥ सांगोनियांऐसेंवीणासावरोन ॥ निघालातेथूननामाह्मणे ॥ ४ ॥ ॥ ॥ १७४ ॥

मारायाकृष्णासी ॥ कंसेंपाठविलाकेशी ॥ १ ॥ बहुअसेतोप्रतापी ॥ आलाअश्वाचियेरूपीं ॥ २ ॥ देवाडसाया धांवला ॥ धरूनिपायींझुगारिला ॥ ३ ॥ मुखींदेऊनियां हात ॥ श्वासकोंडीजगन्नाथ ॥ ४ ॥ नामाह्मणेपडलेंप्रेत ॥ हर्षेंसुरवरनाचत ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ १७५ ॥

शेळयामेंढीयांचाखेळ ॥ आतांखेळूंरेसकळ ॥ १ ॥ कोणीमेंढयाहोती ॥ कोणचोरह्मणताती ॥ २ ॥ ह्मणतीरात्र झाली ॥ आतांनिजवावनमाळी ॥ ३ ॥ कोणीश्वान होती ॥ चोराडसायाधांवती ॥ ४ ॥ तेथेंव्योमासुरयेत ॥ गोपाळांचावेषधरित ॥ ५ ॥ करोनियांचोरी ॥ नेउनीठेवीपर्वतदरीं ॥ ६ ॥ हेंतोंदेवासींकळलें ॥ नामाह्मणेसंहारिलें ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १७६ ॥

कंसासुरसारेकरोनिविचार ॥ धाडितीअक्रूरगोकुळासीं ॥१॥ अक्रूराआनंदझालाअसेफार ॥ पाहीनश्रीधरडोळे भरी ॥ २ ॥ आजिहोईलमाझ्याजन्माचेंसार्थक ॥ वैकुंठनायकपाहीनमी ॥ ३ ॥ उजवेजातीकाकवामकरींमृग ॥ पाहीनश्रीरंगस्वामीमाझा ॥ ४ ॥ शुभतेशकुनमार्गींहेहोताती ॥ पाहीनमीपतीवैकुंठींचा ॥ ५ ॥ येथुनियांमाझीसरलीयेरझार ॥ कंसानेंउपकारकेलामोठा ॥ ६ ॥ आजिमाझे

पितरउद्धरतीसकळ ॥ पाहीनगोपाळकृपासिंधु ॥ ७ ॥ नामाह्मणेआलागोकुळासन्निध ॥ हृदयींआनंदनसमाये ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १७७ ॥

चौदाजणीज्याच्याचरणांतेंपूजिती ॥ त्याचीघेईनमातीआपुल्याशिरीं ॥ १ ॥ एकांतींअर्चनकरीतधूर्जटी ॥ त्यासीबोलेनगोष्टीआवडीच्या ॥ २ ॥ सप्तऋषीज्याचेवर्णितातीगुण ॥ करितसेध्यानब्रह्माज्याचें ॥ ३ ॥ तेहतीसकोटीदेवजयातेंपूजिती ॥ श्रुतिवर्णितातीगुणज्याचे ॥४॥ चारीवेदज्याचीवर्णितातीकीर्ति ॥ करितातिस्तुतीसाहीजणें ॥ ५ ॥ लक्ष्मीचापतीध्यातीसनकादिक ॥ पाहीनश्रीमुखएकवेळां ॥ ६ ॥ पृथ्वीचाहाभारकरावयादूर ॥ ह्मणोनीअवतारघेतलासे ॥७॥ नामाह्मणेआलायमुनेजवळी ॥ उतरलाखालींरथाचिया ॥ ८ ॥ ॥ ॥ १७८ ॥

धन्यहीयमुनाधन्यहेंगोकुळ ॥ वृक्षादिसकळधन्यधन्य ॥ ॥ १ ॥ धन्यह्यागोपिकाधन्यहेगोपाळ ॥ पक्ष्यादिसकळधन्यधन्य ॥ २ ॥ धन्यगोवर्धनधन्यवृंदावन ॥ नंदाचानंदनक्रीडतसे ॥ ३ ॥ धन्यहीयशोदाधन्यातिचापती ॥ अखंडपहातीमुखज्याचें ॥ ४ ॥ गायीघेऊनियांदेवगेलाराना ॥ ध्वजवज्रांकुशचिन्हेंउमटती ॥ ५ ॥ नेत्रींअश्रुपातउतरेरथाखालीं ॥ गडबडोनीलोळेतयावरी ॥ ६ ॥ ब्रह्मादिकांदुर्लभयेथीलहीमाती ॥ घेऊनियांहातींमुखींघाली ॥७॥ नामाह्मणेपुढेंचाललात्वरित ॥ देखेगडियांतपरब्रह्म ॥८॥१७९॥

तनुहेआकाशचंद्रमातेंमुख ॥ ऐसेंनिष्कलंकपरीक्षिती ॥ ॥ १ ॥ पूर्णिमेचाचंद्रत्याहुनीअधिक ॥ शोभतश्रीमुखकृ-

ष्णजीचें ॥ २ ॥ भोंवताहाशोभेनक्षत्रांचाम॰
सांवळाजगद्गुरु ॥ ३ ॥ वैजयंतीमाळाकिरीटकुंडलें ॥ अ-
क्रूरेंदेखिलेदोघेजण ॥ ४ ॥ जोडोनियांहातघालीनमस्का-
र ॥ वहातसेनीरक्षणक्षणां ॥ ५ ॥ नामाह्मणेत्वरेंधांवेहृ-
षीकेशी ॥ धरीतपोटाशींअक्रूरातें ॥ ६ ॥ ॥ १८० ॥

भेटदेईंमजह्मणेबळिराम ॥ नवर्णवेप्रेमअक्रूराचें ॥ १ ॥
पेंधासीपुसतीअवघेगडीतेव्हां ॥ कोणरेहाबाबाआलायेथें॥
॥२॥ आपल्याकान्होबाच्यापायांकांपडतो ॥ कायह्यामाग-
तोसांगआह्मां ॥ ३ ॥ अक्रूरबळिरामघरींआलेगोपाळ ॥
नंदादिसकळभेटियेले ॥ ४ ॥ मधुपर्कविधीकरितीपूजन ॥
ह्मणेधन्यदिनआजीचाहा ॥५ ॥ अक्रूराबरोबरीकरितीभो-
जन ॥ पुसेवर्तमानमगत्यासीं ॥ ६ ॥ भक्तमाझेंदैवतजगा
दावीमात ॥ कृपाळूबहुतनामाह्मणे ॥ ७ ॥ ॥ १८१ ॥

प्रातःकाळींमातझालींगोकुळांत ॥ जातोभगवंतमथुरेसी
॥ १ ॥ गौळणींचामेळानिघालासकळ ॥ पिटितीकपाळआ-
पुलेहातें ॥ २ ॥ एकीत्याघालितीकेशांमध्येंमाती ॥ एक
त्यालोळतीभूमीवरी ॥ ३ ॥ आह्मासोडोनियांतूंरेकैसा
जासी ॥ तुजविणपिशीआह्मींसर्व ॥ ४ ॥ कोणीरथापुढें
जाऊनिपडती ॥ आक्रोशेंरडतीसकळीक ॥ ५ ॥ अक्रूरन-
व्हेबाईमोठाअसेक्रूर ॥ नामींनिरंतरक्रियावसे ॥ ६ ॥ अ-
क्रूराआह्मींसर्वपसरितोंपदर ॥ नेऊंनकोश्रीधरमथुरेसी ॥
॥ ७ ॥ नामाह्मणेशोकनवर्णवेआतां ॥ झालातोहांकिता
रथत्वरें ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १८२ ॥

ब्रह्मनिष्ठतेव्हांस्थिरावलाचित्तीं ॥ अक्रूराचेगळतीदो-

॥ दहींदूधतुपेंभरिल्याकावडी ॥ चालतीता-
तडींसकळीक ॥ २ ॥ चिंतनेंत्यापीलेंअक्रूराचेंमन ॥ काय
वर्तमानहोईलनेणों ॥ ३ ॥ नरनारीशोककरितीसकळ ॥
दुराचारीखळकंसआहे ॥ ४ ॥ मार्गींतोस्नानासीउतरलाअ-
क्रूर ॥ रथावरीकिशोरनंदजीचे ॥ ५ ॥ सोडोनियांघोडेचा-
ललातांतडीं ॥ दिलीअसेबुडीजळामध्यें ॥ ६ ॥ दावु
नीकौतुकनिरसीत्याचाधाक ॥ सांगतसेशुकपरीक्षिती ॥
॥ ७ ॥ जुंपूनियांघोडेचालिलासत्वर ॥ लोपेदिनकरना-
माह्मणे ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १८३ ॥

जोडोनियाकराविनवीविश्वंभरा ॥ चलावेंमंदिरांसकाळि-
कीं ॥ १ ॥ अनाथावरकृपाकरीकृष्णनाथा ॥ ठेवितसेमा-
थापायांवरी ॥२॥ मारूनियांकंसायेईनतुझ्याघरां ॥ आग्र-
हअक्रूराकरूंनको ॥ ३ ॥ सकळसमुदायमथुरेचेवनीं ॥
साह्यचक्रपाणीह्मणेनामा ॥ ४ ॥ ॥ ॥१८४॥

प्रातःकाळींगडीउठेकृष्णराम ॥ पहावयाग्रामचालियेले
॥ १ ॥ मागतीरजकादेईनातोवस्त्रें ॥ वधीनस्वशस्त्रेंपापि-
यासी ॥ २ ॥ तींठायींवांकडीनीटकेलेंतिसी ॥ तिनेंचंदना-
सीलावियेलें ॥३॥ जोडोनियांहातविनवीसुदामा ॥ यावेमे-
घश्यामाघरांमाझ्या ॥४॥ वस्त्रेंदेतीतेव्हांमथुरेचेलोक ॥नर-
नारीमुखपाहताती ॥ ५ ॥ मोडितांधनुष्ययेतीरक्षपाळ ॥
नामाह्मणेखळवाधियेले ॥ ६ ॥ ॥ ॥१८५॥

इच्छामात्रेंमोडीब्रह्मांडाच्याकोटी ॥ चालिलाजगजेठी
कंसद्वारा ॥ १ ॥ मदोन्मत्तहस्तीदेखोनियांहांसे ॥ पीतांबर
कांसेखोंवीयेला ॥ २ ॥ सांवरोनीहातेंकेसीदेतगांठ ॥ खों-

भरणाचीममता ॥ देहपाखितीजेसत्ता ॥ त्याहीवरीलसू-
क्ष्मता ॥ तेंकृपावंतासांभाळी ॥ ७४ ॥ त्रिमिरत्रिगुणअ-
वघें ॥ जेंजेंआलेंअसेलवाघें ॥ तेंतेंमीनेघे ॥ तेंतूंस-
कळवेगेंसांभाळी ॥ ७५ ॥ योनीचियाकष्टा ॥ वरीवास-
नाहोत्याभ्रष्टा ॥ संसारहाकटकटा ॥ रतलोंतुझ्याचर-
णीं ॥ ७६ ॥ विद्यावयसाकुळ ॥ ब्रह्मकर्मआचारशीळ ॥
गेलेआलेविठ्ठल ॥ तेतूंदयाळसांभाळी ॥ ७७ ॥ नानाज-
न्मअवतार ॥ नानाशाखांचेनिर्धार ॥ नानागोत्रउच्चार ॥
तुझाविचारतूंजाणसी ॥ ७८ ॥ पाठवेदादिवचनें ॥ शास्त्र-
दृष्टींअवलोकनें ॥ कीर्तनींगुणवर्णनें ॥ हींहीनारायणेंअंगी-
कारावीं ॥ ७९ ॥ सर्वमयसर्वसपाटा ॥ त्यावरीकरूनिचा-
लिलोंवाटा ॥ चंद्रसूर्यनक्षत्रेंघनदाटा ॥ करूनियेकवटापाय-
री ॥ ८० ॥ सर्वअंडांचेंब्रह्मांड ॥ मीनह्मणेअंडाअंड ॥
खंडेंकरूनियांनिखंड ॥ प्रचंडमीतुजसींबोलें ॥ ८१ ॥ रो-
मरंध्रींब्रह्मांडें ॥ सकळविराटमयखंडें ॥ ऐशींमहत्ब्रह्मेंप्रचं-
डें ॥ तुझ्याअंगींदातारा ॥ ८२ ॥ तूंविश्वरूपाचीघडी ॥
तारकब्रह्मचिउघडी ॥ मीयानिजदृष्टीनेंचोखडी ॥ तुझीमू-
र्त्तिन्याहाळीन ॥ ८३ ॥ तेनसुटेनिजकळे ॥ येऱ्हवींहेंनाक-
ळे ॥ तुझीयाकृपागुणेंआकळे ॥ तुझियादासानिजभक्ता ८४
अनंतयानामाचासंकेत ॥ मनमुरालेंजेथेंनिर्धूत ॥ तूंपणें
परमाद्भुत ॥ परमानंदा ॥ ८५ ॥ गुणाग्रगोसावीराम ॥
गुणसमुद्रगुणग्राम ॥ सर्वभूतांचाविश्राम ॥ तुजनमो॥८६॥
नमनकेलियाविभूती ॥ चित्तरमलेंझालीविश्रांती ॥ तुजदे-
खिलियाश्रीपती ॥ नराहोंचित्तींचीतळमळ ॥ ८७ ॥ नमन

हेंचिथोरादिसे ॥ एऱ्हवींतरंगाकारभासे ॥ देखिलेंतितुकें नासे ॥ नैश्वर्यऐसीश्रुतिबोले ॥ ८८ ॥ नमनहेंचिपरम ॥ नमनहेंसुवर्म ॥ नमनहेंचिआत्माराम ॥ करूनिघाली॥८९॥ नमनहाचिअनुभव ॥ नमनहाचिमुख्यभाव ॥ नमनहाचि पैंदेव ॥ देवाधिदेवतूंपावसी ॥९०॥ नमनहेंचिश्रेष्ठपीठा ॥ नेतसेंतुझियावाटा ॥ तुजऐसाश्रेष्ठा ॥ मगयावाटाकायक-राव्या ॥ ९१ ॥ नमनहेंचितारक ॥ नमनहाचिविवेक ॥ नमनेंवीणत्रैलोक्य ॥ आडमार्गेंरिघताती ॥ ९२ ॥ नमन लटिकेंनव्हेनव्हे ॥ नमनभलतियासीनसाहे ॥ जैंसाह्य सखाहोय ॥ श्रीनिवृत्ति ॥ ९३॥ नमनाएवढामंत्र ॥ नाहीं नाहींधुंडितांशास्त्र ॥ विचारलक्षणपात्र ॥ तेंचिजाणेयेथीं-चें ॥९४॥ नमनकरीब्रह्माश्रेष्ठ ॥ नाभिकमळींधरीवैकुंठ ॥ नमनकरीनीळकंठ ॥ तीर्थेंमस्तकींवंदिती ॥ ९५ ॥ इंद्र चंद्रमहेंद्रथोर ॥ नमनेंवीणनैश्वर ॥ अंडामध्येंचराचर ॥ नमनेंवीणनतरती ॥ ९६ ॥ श्रीगुरुकृपाजैंहोय ॥ तैंनम-नाचीऐशीसोय ॥ पाऊनिसुगमउपाय ॥ नमोनमस्तेतुज॥ ॥ ९७ ॥ नमस्तेनमस्तेनमस्ते ॥ पुढतीपुढतीनमस्ते ॥ स-माधिसुखआस्ते ॥ नमोनमःकारितां ॥९८॥ नमोनमोआ-दिपीठा ॥ शिवादिगुणवरिष्ठा ॥ येथेंयेऊनिवैकुंठा ॥ समा-धिशेजघातली ॥ ९९ ॥ महाविष्णुतूंयोगरूपा ॥ महारू-पाचियास्वरूपा ॥ महादित्याअमुपा ॥ कोटिरुद्रतेजसा ॥ ॥ १०० ॥ शंखचक्रानेंमंडित ॥ करकमळतुझेंमिरवत ॥ पदकहृदयावरीशोभत ॥ आणिश्रीवत्सलांछन ॥ १ ॥ अ-नंतबाहूंचामेळ ॥ तोतूंचतुर्भुजगोपाळ ॥ मुगुटदिसतते-

जाळ ॥ कोटिसूर्याहूनिप्रभा ॥ २ ॥ पीतांबरमाळकंठीं ॥ सर्वांगींचंदनाचीउटी ॥ हिरेमाणिकेंकटीतटीं ॥ अनेककीळाफाकती ॥ ३ ॥ क्षुद्रघंटिकाच्यावोळी ॥ घणघणाटतया वेळीं ॥ देउडापाउलींनिश्चळी ॥ वेणूवाजविसीसुस्वरें ॥४॥ रुणुझुणुरुणुझुणु ॥ ऐसावाजविसीवेणू ॥ सुंदरतूंशामतनु॥ अलकापुरींउभाअससी ॥ ५ ॥ सभोंवतेगोपाळतुझे ॥ ते अंतरंगसखेमाझे ॥ पुंडलीकतरीसहजे ॥ प्राणसखापैंमाझा ॥ ६ ॥ ऐसाज्ञानउद्बोधबोले ॥ ज्ञानाज्ञाननिरसलें ॥ विज्ञानहीहारविलें ॥ दृश्यद्रष्टेनसीं ॥ ७ ॥ बापरखुमादेवीवरू ॥ समाधिदेऊनियांस्थिरू ॥ वरीठेऊनियांअभयकरू ॥ वरदेऊनिराहिला ॥ १०८ ॥ ॥ ॥ ॥ ४४ ॥

ज्ञानदेवासीउद्धव ॥ बोलेएकांतींचाभाव ॥ तुह्मातुष्टलादेवाधिदेव ॥ धन्यधन्यवैष्णव ॥ १ ॥ ज्ञानदेवह्मणेस्वामी ॥ दीनविठोबाचेआह्मी ॥ धन्यधन्यभाग्याचेतुह्मी ॥ जेंनिरंतरविष्णुसंगें ॥ २ ॥ उद्धवह्मणेज्ञानेश्वरा ॥ आह्मीं जाणोंकृष्णावतारा ॥ परीपांडुरंगमूर्तिनिर्धारा ॥ तूंआणि पुंडलीकजाणसी ॥ ३ ॥ नामाह्मणेज्ञानदेवें ॥ मागुतेंस्तवनआरंभिलेंभावें ॥ तेंऐकावयादेवें ॥ येकचित्तकेलें ॥४॥४५

बैसोनीअंतरिक्षविमानीं ॥ सर्वदेवपाहतीनयनीं ॥ वर्षावकारितीदिव्यसुमनीं ॥ विष्णुभुवनींप्रत्यक्ष ॥ १ ॥ विठोबाकृपाळुगुणनिधी ॥ पुंडलिकासवेंभक्तांचीमांदी ॥ लघिमामहिमाआणिमादी ॥ कामारिसिद्धीतिष्ठती ॥ २ ॥ निश्चयेंकरूनिनेमिलीतिथी ॥ कृष्णपक्षअष्टमीसमर्थी ॥ नामसंकीर्तनसंतसंगती ॥ तोब्रह्मप्राप्तिपावला ॥३॥ नवमीगज-

रहरिनामाचा ॥ तोचिवैष्णवकायामनेंवाचा ॥ तोप्रत्यक्ष विष्णुरूपसाचा ॥ सत्यत्रिवाचाबोलिलें ॥ ४ ॥ जोडेजया वद्यदशमी ॥ स्नानविष्णुपूजनस्वधर्मीं ॥ तोसत्वरपावेल निजधामीं ॥ नामसंभ्रमींनाचत ॥ ५ ॥ व्रतएकादशीश्रेष्ठगाढी ॥ कीर्तनश्रवणींकोटीयागजोडी ॥ येकयेकघडीकल्पायेवढी ॥ भूषणप्रौढीकीर्तिरची ॥ ६ ॥ द्वादशीपारणेंक्षीराब्धी ॥ हरिकीर्तनींपरमानंदी ॥ तोपदपावलाअनादि ॥ ज्ञानदेवींविष्णूच्या ॥ ७ ॥ वद्यत्रयोदशीमहाथोरगजर ॥ कुंचेगरुडटकेदिंडीसंभार ॥ वाजवितीटाळमृदंगझणत्कार ॥ हरिनामेंअपारउद्धरिले ॥ ८ ॥ नामाह्मणेवद्यचतुर्दशी ॥ पुढतीअमावास्येचेदिवशीं ॥ ज्ञानदेवाजोदृढधरीमानसीं ॥ तोकृतनिश्चयेंशीतरलासे ॥ ९ ॥ ॥ ॥ ४६ ॥

ऐसेंबोलोनीपांडुरंग ॥ आणिलेंदिव्यप्रावरणसर्वांग ॥ दिलेंअलंकारअव्यंग ॥ हारमोतीसुरंगलेववीले ॥ १ ॥ धन्यजन्मलेभूमंडळीं ॥ कीर्तनींनाचतीगदारोळीं ॥ तेविष्णुसन्निधसर्वकाळीं ॥ ऐसेंवनमाळीबोलिले ॥ २ ॥ राहीरुक्मिणीसत्यभामा ॥ विचारितीपुरुषोत्तमा ॥ बहुतअगाधयेथींचामाहिमा असेसर्वोत्तमावरिष्ठ ॥ ३ ॥ ह्मणेविठोजी जंववरीधरा ॥ तंववरीसमाधिस्थिरा ॥ हरिकीर्तनकरती सैरा ॥ वंशपरंपराउद्धरील ॥ ४ ॥ आणिमूळपीठशिवाचें॥ हेंचिपूर्वस्थानअगस्तीचें ॥ जाणोनिजन्मझालेचौघांचे ॥ सर्वक्षेत्रांचीआदिभूमि ॥ ५ ॥ पूर्वकल्याणयुगायुगीं ॥ आणिकपुण्यजोडिलेंप्रसंगीं ॥ तपतापिन्नलेमहायोगी ॥ शुद्धवीतरागीयाठायीं ॥ ६ ॥ येथेंरामकृष्णकथा ॥ करीजोशुद्ध

भावार्थी ॥ नपावेतोभवव्यथा ॥ संसारसर्वथानबाधी ॥ ७ ॥ आणिसप्तद्वीपनखंड ॥ गणितकेलेंअवघेंब्रह्मांड ॥ त्याहूनिपुण्ययेथेंअखंड ॥ जीवासीहोईल ॥ ८ ॥ ऐसेंउत्तमोत्तमथोर ॥ सकळजीवांचेंमाहेर ॥ नामेंतरतीचराचर ॥ दिलावररुक्मिणी ॥ ९ ॥ नामाह्मणेदेवराव ॥ महिमासांगतसेभाव ॥धन्यअलकापुरीगांव ॥ आदिठाववरिष्ठ॥१०॥४७

नित्यअनुष्ठानतीर्थी ॥ त्याचेपूर्वजउद्धरती ॥ जेकांअन्नदानकरिती ॥ तेपावतीवैकुंठीं ॥ १ ॥ ऐसेंतीर्थक्षेत्रसर्वोत्तम ॥ आणिकनाहींगायाशींसम ॥ आदिविष्णुपरब्रह्म ॥ मूळपीठ ॥ २ ॥ नवर्णवेयेथींचीथोरी ॥ प्रत्यक्षयेउनीश्रीहरी ॥ ज्ञानदेवकीर्तनगजरीं ॥ समाधिभीतरींसुखरूप ॥ ३ ॥ अनंतपुण्यज्याचेंगांठीं ॥ तरीचज्ञानदेवपडेदिठीं ॥ जोडेतपकोट्यानकोटी ॥ ऐसेंधूर्जटीबोलिले ॥ ४ ॥ हेंचि महासिद्धांचेंस्थळ ॥ शंकराचेंमूळपीठनिर्मळ ॥ वासकेलियासर्वकाळ ॥ झालेनिर्मळदोषसर्व ॥ ५ ॥ अजानवृक्षातळींहरिकथा ॥ नित्यजोनरकरीतत्वतां ॥ तोनजाययमपंथासर्वथा ॥ ऐसेंजगन्नाथबोलिले ॥ ६ ॥ द्वारींसुवर्णाचा अश्वत्थ ॥ नित्यपूजलियास्वस्थ ॥ लक्ष्मीनसांडीतयातें ॥ सकळआर्तीपूर्णहोती ॥ ७ ॥ नित्यप्रदक्षिणासप्तजोडेपवित्र ॥ पुण्येंपूर्वजबेतालीससहित ॥ वैकुंठलोकप्राप्त ॥ तयासीहोय ॥ ८ ॥ नित्यविष्णूचेंपूजन ॥ नित्यनामसंकीर्तन ॥ नित्यवैष्णवसंतभोजन ॥ धन्यपावनइहलोकीं ॥ ९ ॥ नामाह्मणेअलकापूर ॥ सर्वक्षेत्रांमाजींमनोहर ॥ परमपवित्र महापवित्र ॥ शैवशास्त्रप्रसिद्धअसे ॥ १० ॥ ॥४८॥

ऐसेंतीर्थसर्वोत्तम ॥ सांगतसेपुरुषोत्तम ॥ शंकरादिप-
रमधाम ॥ ब्रह्मनामवर्णित ॥ १ ॥ क्षेत्रमहिमाअतिअद्भुत॥
आदिसिद्धेश्वरकुळदैवत ॥ समर्थमहाभागवत ॥ नामेंगर्जे-
तसर्वकाळ ॥ २ ॥ ह्मणेपुंडलिकपूर्वींचेंस्थळ ॥ आणिशिवा-
चेंमूळपीठनिर्मळ ॥ येथेंनिर्विकल्पसोज्वळ ॥ तपविशाळ
जोडिलें ॥ ३ ॥ क्षेत्रपंढरीहूनीअधिक ॥ ऐसेंबोलतीब्रह्मा-
दिक ॥ ह्मणतीधन्ययेथींचेलोक ॥ शुद्धभाविकप्रेमळ ॥४॥
घडेमहाविष्णूचेंपूजन ॥ तीर्थव्रतसंध्यास्नान ॥ वाचेंहरि-
नामकीर्तन ॥ श्रवणींगुणविष्णूचें ॥ ५ ॥ विठोजीह्मणेएक
भक्ता ॥ तपोनिधीमहंततूंसर्वथा ॥ ज्ञानदेवासारिखावक्ता॥
मजआवडतानदिसे ॥ ६ ॥ तुह्मींदोघेअसायासृष्टीं ॥ जग
उद्धारीपाठोवाठीं ॥ कीर्तनकरितांउठाउठी ॥ तोंवैकुंठींपा-
वावें ॥७॥ पुंडलीकउठलासत्वरी ॥ चरणरजवंदिलेंशिरीं ॥
ह्मणेमीभाग्याचाउजरी ॥ तूंकैवारीआमुचा ॥ ८ ॥ नामा
ह्मणेदेवभक्त ॥ एकऋषीहोउनीसमस्त ॥ निवृत्तिराजस्तु-
तिबोलत ॥ प्रेमअद्‌भुतदाटलें ॥ ९ ॥ ॥ ॥ ४९ ॥

परब्रह्मपरममूर्ती ॥ परमधामपरात्परकीर्ती ॥ परमअ-
व्ययपरंज्योती ॥ श्रुतिस्मृतिस्वानुभव ॥ १ ॥ अकळाविक-
ळानिरंजन ॥ ज्ञाताज्ञेयविश्वघन ॥ संशयद्रष्टयानिरसन ॥
विश्वप्रिया ॥ २ ॥ कमळनयनविकासा ॥ हृदयकमळावि-
लासा ॥ चरणकमळाविश्वेशा ॥ चित्तसुखधामा ॥ ३ ॥ च-
राचरसच्चिदानंदांग ॥ शुद्धस्नानशंकरदिव्यांग ॥ विष्णु-
मूर्तिपांडुरंग ॥ सगुणरूपभीमातटीं ॥ ४ ॥ सुजळजळदघ-
ना ॥ सदनकोटिसूर्यकिरणा ॥ मुक्ताहारजडितरत्ना ॥ कि-

रीटींमुगुटविराजित ॥ ५ ॥ नीलोत्पलनीलवर्णा ॥ शामसुं-
दरामूर्तिघना ॥ स्तवितांसहस्रवदना ॥ नकळेकांहीं ॥६॥
पाररजतमाचेंमेहुडें ॥ पहातांतूंनसांपडे ॥ नाहींतुझिया
पडिपाडें ॥ भूमंडळींदैवत ॥ ७ ॥ अनंतब्रह्मांडाधीशा ॥
गुणनवर्णवेपरेशा ॥ तुवांज्ञानदेवसर्वेशा ॥ आपणाऐसाठे-
विला ॥ ८ ॥ तंवनिवृत्तिह्मणेआह्मांतारिलें ॥ तुवांनाराय-
णायावरीआदरिलें ॥ तोतूंचतुर्भुजगोपाळे ॥ सोपानतेथें
येणेंघडेलकाय ॥ ९ ॥ नारायणेंस्तुतिपारिसिली ॥ चित्तदे-
ऊनिअव्यक्तबोलीं ॥ तुह्मींगीतेवरीटीकाकेली ॥ तीमानव-
लीसर्वांसी ॥ १० ॥ नामाह्मणेसकळवैष्णव ॥ जाणोनी
शुद्धसर्वभाव ॥ संतोषलादेवराव ॥ तूंयोगीशिवनिवृत्ति-
नाथ ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५० ॥

ह्मणेविठोजीशंकराचा ॥ प्रत्यक्षअवतारतुझासाचा ॥
स्तुतिकेलीअसेवाचा ॥ विस्मयाचापूरमज ॥ १ ॥ वासित
सप्तद्वीपनवखंड ॥ त्यांमाजीअनंतब्रह्मांड ॥ रोमरंध्रींज्या
अखंड ॥ रूपप्रचंडमेदिनी ॥ २ ॥ ह्मणेनिवृत्तिनाथअवतारी॥
तुमच्यासंगतीश्रीहरी ॥ जेंजेंप्रेरिसीकामारी ॥ सांगितलें
करीउगाची ॥ ३ ॥ ह्मणेदेवाधिदेवआतां ॥ सांगालतेंकरूं
तत्वतां ॥ हरूंभवार्णवाचीचिंता ॥ भवव्यथाजीवाची ॥ ४ ॥
नामाह्मणेंऐसेंलळे ॥ पाळिलेंपोशिलेंगोपाळ ॥ करूनिस-
माधिसोहळे ॥ विष्णुकेवळप्रतिष्ठिला ॥ ५ ॥ ॥ ५१ ॥

ऐकोनीनिवृत्तिस्थिरावला ॥ महाविष्णुपरमसंतोषला ॥
मगसोपानदेवानींआदरिला ॥ संवादस्तुतीलापरीसा ॥ १ ॥
जयजयातूंरामकृष्णा ॥ भक्ताभाविकहरीतृष्णा ॥ देहेदीप-

कसहिष्णा ॥ कृष्णकृष्णह्मणताती ॥२॥ नरहरीनामनर-
केसरी ॥ वाजवोनिटाळीयेकरीं ॥ टाळमृदंगझणत्कारीं ॥
जयजयहरीह्मणोनीआह्मी ॥ ३ ॥ येकहरिआह्मासखा ॥
नाहींत्रिभुवनामाजिदेखा ॥ समाधिस्वरूपध्यानसुखा ॥
चरणसुखाविनटलों ॥ ४ ॥ धन्यधन्यभूमिकादेश ॥ स्वयें
आपणजगन्निवास ॥ ज्ञानदेवेंकेलावास ॥ हीसमाधिआस
धरूनी ॥ ५ ॥ निवृत्तिमहाराजश्रीगुरुथोर ॥ समाधिकार-
णेंजाहलेस्थिर ॥ पुढेंकोणकैसाजहालाविचार ॥ सांगानि-
र्धारस्वामिया ॥ ६ ॥ देवह्मणेब्रह्मअवतार ॥ अवघियासी
तूंचराचर ॥ श्रेष्ठपणेंतुह्मीनिर्धार ॥ आलेंआकारासगुण
रूप ॥ ७ ॥ सकळअसेतूंव्यापक ॥ स्वर्गलोकआणिमृत्यु-
लोक ॥ अधर्मझालियाचाळक ॥ पुढतीएकरूपधरिलें ॥८॥
ऐसेंबोलोनीपांडुरंग ॥ सोपाननिवालासवांग ॥ सांकडेंफे-
डितोश्रीरंग ॥ आमुचेंअंतरंगजाणोनी ॥ ९ ॥ नामाह्मणे
सोपानदेव ॥ स्तुतिआदरिलीसद्भाव ॥ निजस्वहितस्वानु-
भव ॥ समाधिठावसंस्थित ॥ १० ॥ ॥ ॥५२॥

सत्यसत्यजनार्दन ॥ सत्यसत्यनारायण ॥ सत्यसत्य
आमुचेंतूंधन ॥ जगज्जीवनजगदाकार ॥ १ ॥ तुजवांचो-
नित्रिभुवनीं ॥ दुजानदेखोंनाइकोंकोणी ॥ वेदशास्त्रपुराणीं॥
अगाधकरणीतुमचीस्वामी ॥ २ ॥ तूंदेवाधिदेवोउत्तम ॥
तूंनिजभक्तांचाविश्राम ॥ तूंशंकराचाआत्माराम ॥ ऐसाने-
मआमुचा ॥३॥ तरीभक्तांचाकोंवसा॥ पावसीतूंहृषीकेशा॥
नाहींतुजवीणभरंवसा ॥ निश्चयऐसासाचतूं ॥ ४ ॥ पर-
त्रींचेंदेवतारू ॥ तुझाआगमनिगमविचारू ॥ तुझ्याचिंतनें

पारू ॥ उतरेसंसारदुर्घट ॥ ५ ॥ विठोजीह्मणेमुक्ताबाई ॥ मनसमर्पिलेंमाझेठाईं ॥ तयासीजन्ममरणनाहीं ॥ सत्य पाहींनिर्धारें ॥ ६ ॥ नामाह्मणेकरूनिस्तुति ॥ मुक्ताबाई चरणवंदिती ॥ तंवसंतमहंतांविनविती ॥ आदिमूर्तीविठोबाची ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५३ ॥

भक्तपुंडलीकपुढारला ॥ करजोडोनिबोलिला ॥ वेदादिकांतुझाअबोला ॥ अनंतलीलास्वरूपाची ॥ १ ॥ ऐसा तूंसमर्थश्रीरंगा ॥ प्रगटआमुचियाभागा ॥ भीमातटींपांडुरंगा ॥ मूढजनातारावया ॥ २ ॥ नवर्णवेभक्तपण ॥ नकळेतुमचेंमहिमान ॥ नबोलवेतंवसाधन ॥ जन्मींकोणकेलें होतें ॥ ३ ॥ निरेभिवरेचेसंगमीं ॥ चंद्रभागेचेउगमीं ॥ वेणूनादींनारदस्वामी ॥ प्रेमनामींडोलतसे ॥ ४ ॥ तरीतूं स्वामीदयाळ ॥ महाविष्णुतूंगोपाळ ॥ भक्तालागींतूंकृपाळ ॥ दीनवत्सलपांडुरंगा ॥ ५ ॥ प्रेमातुवांमाझेंकरूनिमिस ॥ राहिलासयुगींअठ्ठावीस ॥ धरूनिसगुणरूपास ॥ ऐसाभक्तीसभुललासी ॥ ६ ॥ तूंनियंताईश्वरमूर्ती ॥ सकळगोसांवीश्रीपती ॥ तुजवांचोनीनेणेंमती ॥ मूर्तिदयासागरा ॥ ७ ॥ नामाह्मणेंपुंडलिका ॥ देवह्मणतीपुण्यश्लोका ॥ स्तुतिआदरकेलीनिका ॥ धैर्यविवेकतूंचिहोसी ॥ ८ ॥ ॥ ५४ ॥

मगसारोनिसंध्यास्नान ॥ देवभक्तींविष्णुपूजन ॥ पंक्तिआदरिलेंआपोशन ॥ मागुतींभोजनकरितातीं ॥ १ ॥ धन्यधन्यतूंज्ञानराजा ॥ तुझीआवडकेशवराजा ॥ पंक्तिपरवडीसमाजा ॥ वाढितीवोजारुक्मिणी ॥ २ ॥ उभीराही

सत्यभामा ॥ वाढितीपंचामृतउत्तमा ॥ बैसोनिपुंडलिकसामा ॥ ह्मणतीदुर्लभ ॥ ३ ॥ निवृत्तिसोपानमुक्ताबाई ॥ गोपाळदेवढेदोहींबाहीं ॥ रुक्मिणीसत्यभामाराही ॥ चतुष्ठ ठायवाढिती ॥ ४ ॥ वैष्णवप्रेमळाचेपंक्ती ॥ प्रार्थनाकरीतसेश्रीपती ॥ सोपानज्ञानदेवनिवृत्ति ॥ एकचिवृत्तींबैसले ५ गरुडतिष्ठतहनुमंताशेजारीं ॥ त्यासरुक्मिणीताटकरी ॥ आनंदेंगर्जतीजयजयकारीं ॥ रामकृष्णहरिगोविंद ॥ ६ ॥ देवगणगंधर्वपाहती ॥ ब्रह्मादिकचलाह्मणती ॥ केवढेभाग्याचियामूर्ती ॥ भक्तआवडतीजिवलग ॥ ७ ॥ नामाह्मणेअलकापुर ॥ क्षेत्रसर्वांमाजींथोर ॥ ज्ञानदेवसमाधिस्थिर ॥ नामगजरसर्वकाळ ॥ ८ ॥ ॥ ॥ ५५ ॥

मगविनवीज्ञानदेव ॥ सकळांचाजाणोनीठाव ॥ शुद्ध भक्तिप्रेमळवैष्णव ॥ सर्वभावसख्यघेती ॥ १ ॥ बैसोनियां एकासनीं ॥ देवभक्तचक्रपाणी ॥ तांबूलघेऊनिवदनीं ॥ संतोषहोऊनिबोलती ॥ २ ॥ मगपाचारिलागरुड ॥ भक्तपुंडलीकप्रौढ ॥ सोपानदेवजगारूढ ॥ पुरेकोडसकळांचें ३ ऐसानिर्धारकरूनी ॥ समस्तांचेंभोजनसारूनी ॥ सिद्धजाहलीमातारुक्मिणी ॥ अस्तमानींदिनगेला ॥ ४ ॥ जावोनितयापुष्पकावरी ॥ शयनआरंभिलेंहरीं ॥ नारदतुंबरवैकुंठाभीतरीं ॥ मंजुळसुस्वरींगातसे ॥ ५ ॥ भक्तभागवत भाग्याचे ॥ घोषगजरकेलावाचें ॥ ऐसेचतुरप्रहरानिशीचे ॥ जागरणहरीचेंकामिलें ॥ ६ ॥ केलेंप्रयाणसुमुहूर्त ॥ पंढरीसजावयाचाआर्त ॥ संवत्सरघेवोनीसमस्त ॥ सोपानस्वस्थसमाधीसी ॥ ७ ॥ नामाह्मणेचालिलाहरी ॥ ज्ञान-

देवप्रार्थनाकरी ॥ देवातूंचिनिरंतरीं ॥ रहावेंमंदिरींआ-
मुच्या ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५६ ॥

उगवलादिनप्रभात ॥ स्नानसंध्यासारोनिसमस्त ॥ उ-
द्धवकरजोडोनिबोलत ॥ पूर्णआर्तसर्वांचें ॥ १ ॥ अनुपम
इचामहिमा ॥ नबोलवेजाहलीसीमा ॥ आतांचलावेगींपु-
रुषोत्तमा ॥ आपुलेआश्रमापंढरीसी ॥ २ ॥ गरुडसामोरा
तिष्ठत ॥ भक्तभागवतसमस्त ॥ मुनीपुंडलीकविनवीत ॥
केलेंदंडवतसाष्टांगें ॥३॥ ह्मणेज्ञानदेवयजुर्वेदी ॥ वागश्रेय
वाग्बुद्धी॥ परापश्यंतिमध्यमावैखरीसमाधी ॥ त्यामंत्रोदकें
दिधली ॥४॥ ऐसाचिसोपानमार्ग ॥ तूंचिकरितापांडुरंग ॥
ग्रामलेखनाचाप्रसंग॥ निरोपिलासांगकुळयाती॥५॥सकळ
वंशपरंपरा ॥ नसोडावेंतुह्मींआचारा ॥ आह्मीजातोंसंव-
त्सरा ॥ पंढरपुरासांगत ॥ ६ ॥ सकळांआलिंगनदिधलें ॥
मगगरुडावरीआरूढले ॥ ज्ञानदेवानींहरीचींपाऊलें ॥ दृ-
ढधरिलींनिरंतर ॥ ७ ॥ नामानाचेहरिद्वारीं ॥ आनंदझा-
लाअलकापुरीं ॥ विठोबाचीलीलापंढरीं ॥ रामकृष्णहरि
गर्जती ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५७ ॥

मगउड्डाणसाधिलेंगरुडें ॥ गगनक्रमितगेलाचंड ॥ व-
रीआरूढलेप्रचंड ॥ भक्तपुंडलिकासहित॥१॥पक्षाचेनीफड-
त्कारें ॥ ग्रामठाकिलासंवत्सर ॥ पाठारावरीकऱ्हेतीर ॥ ज-
यजयकारेंगर्जिन्नले ॥ २ ॥ त्याकाळींसमारंभकेला ॥ महा
उत्सवहरीसीझाला ॥ आनंदगजरप्रवर्तला ॥ मेळाउतर-
लादिव्यविमानें ॥ ३ ॥ दृष्टिदेखावयाकौतुक ॥ शिवगण

आलेसकळिक ॥ कर्ताब्रह्मांडनायक ॥ महिमाअधिकसंतांचा ॥ ४ ॥ मुनिपुंडलीकउतरला ॥ संगतीवैष्णवांचा मेळा ॥ समाधिसुखाचासोहळा ॥ सकळकळावर्ततसे ॥५॥ हातखाणोनीभूमिका ॥ अमृताशिंपुनीसुगंधिका ॥ ध्वजउभारोनिपताका ॥ गरुडटकाकुंचेडोलती ॥ ६ ॥ नामाह्मणेसुखसंगती ॥ वैष्णवहरीनामगर्जती ॥ लक्षुनीनारायण प्रीतीं ॥ उतरोनीक्षितीसमाधि ॥ ७ ॥ ॥ ॥ ५८ ॥

भक्तसमागमेंहरी ॥ सत्वरआलेसंवत्सरीं ॥ ब्रह्मानंदें परोपरी ॥ चरणधरीसोपानदेव ॥ १ ॥ भागीरथीसवेंसरिता ॥ धांवोनिआलीगंगामाता ॥ यमुनासरस्वतीउभयता ॥ येकात्मताकऱ्हेमाजी॥२॥इंद्रचंद्रतेहतीसकोडी ॥ नवनाथसिद्धसौंगडी ॥ भक्तसनकादिकप्रौढी ॥ वेदपरवडी गर्जती ॥ ३ ॥ गगनामाजींदेवांगना ॥ वर्षावकरिती दिव्यसुमना ॥ ह्मणेनिवृत्तिनाथसोपाना ॥ चरणावरीठेवी तूं ॥४॥ पुष्पकारूढझालेदेव ॥ आणिकमागुतीआलेसर्व ॥ ह्मणेपांडुरंगदेवसदैव ॥ सोपानदेवबाळमूर्ति ॥ ५ ॥ इंद्रनीळपर्वतआहे ॥ तेथोनीठावजावयापाहे ॥ सप्तपाताळीं शेषबाहे ॥ दीर्घदेहफणीअसे ॥ ६ ॥ जावोनीत्यासीश्रुत करावें ॥ गरुडासींबोलिलेदेवराव ॥ मार्गीचालिलालवलाहे ॥ क्रमितजावेंसप्तपाताळीं॥७॥नामाह्मणेअमृतकरीं ॥ मुखकुर्वाळोनीश्रीहरी ॥ सोपानसमाधीभीतरीं ॥ आपणपुढारींबैसले ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५९ ॥

## स्तुति.

नमोअगणितगुणा ॥ नमोआगमगुणनिधाना ॥ नमो-

कलिविध्वंसगहना ॥ काळहननातुजनमो ॥ १ ॥ प्रेमळ वैष्णवनैष्ठिकपूर्ण ॥ गातीनामसंकीर्तन ॥ हाहाहूहूगंधर्वदे-वगण ॥ करितीगायनसुस्वर ॥ २ ॥ हर्षेंमंगळवाद्येंवाज-विती ॥ वैष्णवसप्रेमेंनाचती ॥ नामाह्मणेपुढतीपुढती ॥ समाधिस्थितिअखंड ॥ ३ ॥

ऐसासोपानसंबोखिला ॥ महाउत्सवआनंदझाला ॥ अभयवरादिधला ॥ गर्जिन्नलादेवराणा ॥ १ ॥ विठोजीह्म-णेतूतेंनविसंबें ॥ संवत्सरींअसेनस्वयंभे ॥ यावटेश्वरींसगु-णसुलभे ॥ समारंभप्रतिवर्षीं ॥२॥ महासिद्धसाधकांचेंस्थ-ळ ॥ तोहावटेश्वरसानुकूळ॥ यासीनीळकंठह्मणतीसुचळअ-चळ ॥ शीतळप्रथमनाम ॥ ३ ॥ पूर्णब्रह्मयाचेंस्थान ॥ ये-थेंतपसाधिलेंगहन ॥ प्रत्यक्षशंकरप्रसन्न ॥ आशीर्वचनबो-लिले ॥ ४ ॥ इंद्रनीळपर्वतरूप ॥ प्रत्यक्षनारायणस्वरूप॥ असेंकौंडिण्यपुरसमीप ॥ मातासाक्षेपयोगिनी ॥ ५ ॥ ऋ-षिगणगंधर्व ॥ क्षेत्रपाळमल्हारीदेव ॥ इंद्रचंद्रब्रह्मदेव ॥ शुद्धठावनेमिला॥६॥नामाम्हणेजनार्दन ॥बहुतसंतोषलासो-पान ॥ अंगेंब्राह्मणसनातन॥शुद्धअधिष्ठानदिधलें ॥७॥६०॥

सोपानह्मणेदेवोत्तमा ॥ पूर्वींयेथेंहोताब्रह्मा ॥ ॥ आणि तुह्मीसर्वोत्तमा ॥ कोणस्थळींहोतांदेवा ॥१॥ देवह्मणेकथा परिस ॥ कोट्यानुकोटीयुगास ॥ आह्मीहोतोंपंढरीस ॥ अ-नंतकल्पेंगेलीं ॥ २ ॥ अनंतभक्तांचियामेळीं ॥ अनंतवै-ष्णवभूमंडळीं ॥ माजींगवसलेसकळीं ॥ केलीआगळीपुंड-लिकें ॥ ३ ॥ येणेंप्रसन्नकेलेंशंकरा ॥ शंकरेंमजदाखविलें

निर्धारा ॥ आपणराहोनीपाठमोरा ॥ जगउद्धाराकीर्तनीं॥ ॥ ४ ॥ भक्तीचेनिआराधनें ॥ साधियेलेंवहुतपुण्य ॥ माझेंझालेंसेयेणें ॥ येककारणपुंडलिकाचें ॥ ५ ॥ पूर्वापरपंढरीसी ॥ होतीविष्णुमातऐशी ॥ निर्धारकरोनीमानसीं ॥ अहर्निशींअनुष्ठान ॥ ६ ॥ येथोनिपूर्वभागपंढरी ॥ पश्चिमभागींब्रह्माअवधारी ॥ झालाअवतारकऱ्हेपाठारीं ॥ महादेवशिखरींमानदेती ॥ ७ ॥ तेहतीसकोटीदेवस्थळीं ॥ पूर्वपश्चिमवैडूयमंडळीं ॥ उग्रतपसाधिलेचंद्रमौळीं ॥याइंद्रनीळपर्वतावरी ॥८॥ द्रोणाचळइंद्राचळ ॥ हनुमंतेंआणिलाविशाळ ॥ त्याच्याशाखाअधोमूळ॥तोहाइंद्रनीळपर्वत ॥ ॥ ९ ॥ येथेंवल्लीसुवर्णाकार ॥ गुप्तअसतीत्यानिर्धार ॥ दिसेअस्तमानींअंधार ॥ दीपआकारजगाप्रती ॥ १० ॥ येथोनियांदक्षिणद्वार ॥ गोकर्णमहाबळेश्वरपाठार ॥ पाताळद्वारींपूजाशंकर ॥ बेलपत्रेंअद्यापिनिघती ॥ ११ ॥ नामाह्मणेदेवाधिदेव ॥ सांगितलास्वानुभाव ॥ अधिष्ठानगुढाव॥ सोपानदेवनिवांत ॥ १२ ॥ ॥ ॥ ॥ ६१ ॥

पूर्वकथासंवत्सरनगरीं ॥ सांगितलींअसेंअवधारी ॥ मगशेषाद्रीपर्वतावरी ॥ गरुडशिखरींउभाअसे ॥ १ ॥ धन्यधन्यहासोपान ॥ धन्यसमाधिसंपूर्ण ॥ प्रत्यक्षयेऊनि नारायण ॥ अभयदानदिधलेंसे ॥ २ ॥ अनंतवैष्णवप्रेमळ॥ दिंडीपताकाटाळघोळ ॥ रामकृष्णनामसरळ ॥ भक्तसर्वकाळनाचती ॥ ३ ॥ दिव्यविमानउतरलें ॥ देववर्षतीसुमनें ॥ इंद्रचंद्रदेवगण ॥ लोटांगणघालती ॥ ४ ॥ समाधिसुखाचाआनंद ॥ अंगेंकरीतसेगोविंद ॥ कथासांगित-

लीअभेद ॥ श्रोतेसन्निधसकळी ॥ ५ ह्मणतीधन्यधन्यसो-
पान ॥ देवपुरुषचतुरानन ॥ संतमहंतवैष्णवजाण ॥ राम-
कृष्णगातातीं ॥ ६ ॥ नामाह्मणेदेवराव ॥ मनोरथपूर्णकरू-
निसर्व॥अपारगुणकीर्तीलाघव॥नकळेमावकोणासी ॥७॥६२

सोपानसमाधींबैसला ॥ सकळींपुष्पवर्षावकेला ॥ जय-
जयकारेंभूगोलकोंदला ॥ आनंददाटलामहीवरी ॥ १ ॥
धन्यधन्यहासोपान ॥ वर्णितसेश्रीभगवान ॥ क्षणोक्षणींमा-
झीआठवण ॥ उद्विग्नमनहोतसे ॥ २ ॥ नारदतुंबरअक्रूर
उद्धव ॥ पुंडलीकादिकरूनिसर्व ॥ मुनिदेवगणगंधर्व ॥
स्तुतिस्तवबोलती ॥ ३ ॥ ह्मणतीचौघेजणभाग्याचे ॥ जें
निधानब्रह्मादिकाचें ॥ तेंनिजध्यानशंकराचें ॥ सकळजीवां-
चीजीवनकळा ॥ ४ ॥ तोप्रत्यक्षयेऊनीअनंत ॥ यांचीप-
रिचर्याकरित ॥ भक्तासाह्यहोऊनीभगवंत ॥ पूर्णआर्तकरा-
वया ॥ ५ ॥ निजभक्ताचेंकौतुक ॥ करोनीब्रह्मांडनायक ॥
तयावर्णितीसनकादिक ॥ वरकडमशकबापुडे ॥ ६ ॥ पुंड-
लीकविस्मयबोलती ॥ हेचौघेभाग्याचेमूर्ती ॥ यांच्यानामें
जगउद्धरती ॥ पावेविश्रांतिजगासी ॥ ७ ॥ नामाह्मणेस-
कळजगाचा ॥ उदयजाहलासेदैवाचा ॥ सुकाळकेलास्वा-
नंदाचा ॥ ब्रह्मविद्येचामृत्युलोकीं ॥ ८ ॥ ॥ ६३ ॥

नामयाचाधरूनिहात ॥ क्षणक्षणापंढरीनाथ ॥ ज्ञानदे-
वासीआठवित ॥ कंठसद्गदितहोऊनी ॥ १ ॥ उद्धवासी
ह्मणेपांडुरंग ॥ यासज्जनांचानव्हावावियोग ॥ हेंहृदयहो-
तसेदोनभाग ॥ सखेअंतरंगतुह्मीमाझे ॥ २ ॥ मजयाहूनि
गोडनवाटे ॥ ऐसेजीवलगनभेटे ॥समूळजिवाचेंदुःखआटे॥

संतोषवाटेमानसीं ॥ ३ ॥ धन्यधन्यचौघेजण ॥ मुक्ताबाई ब्रह्मपूर्ण ॥ यांणींतारिलेसकळअज्ञान ॥ दुःखदारुणनासलें ॥ ४ ॥ यांचेनिपडिपाडें ॥ उपमेसिदिसेथोकडें ॥ ज्ञानासारिखेंरत्नजोडे ॥ हेंतंवनघडेकल्पांतीं ॥ ५ ॥ माझ्या अंतरींचेंगूज ॥ उद्धवासांगितलेंतुज ॥ कींनामदेवआवडता सहज ॥ आणीकमजनावडते ॥ ६ ॥ घडिघडिरुक्मिणी पाशीं ॥ बैसोनिसांगेहृषीकेशी ॥ मातारुक्मिणीनिजमानसीं ॥ जिवलगासीआठवीतसे ॥ ७ ॥ निवृत्तितुह्मानाहीं भिन्नता ॥ त्याचाआत्मातुह्मीअनंता ॥ शिवविष्णुऐक्यता॥ असेस्वभावतामूळची ॥ ८ ॥ ज्ञानदेवतुमचाचिअंश ॥ केवळब्रह्मस्वयंप्रकाश ॥ स्वात्मसुखनिजरहिवास ॥ स्वानंद असेउद्बोध ॥ ९ ॥ गोडीसवेंजैसागूळ ॥ सुवर्णरत्नजडित तेजाळ ॥ जैसेंपुष्पासवेंपरिमळ ॥ कैचेंवेगळेंस्वामिया १० सोपानदेवतरीपोटींचा ॥ तोसखाप्राणअसेतुमचा ॥ तेथेंशब्दभिन्नपणाचा ॥ कोठवरीवाचामिरवेल ॥ ११ ॥ सकळ संतमहंतमिळोनी ॥ माथाठेविलाहरिचरणीं ॥ जगन्माता बोलेरुक्मिणी ॥ तुह्मापासोनीदूरनाहींत ॥ १२ ॥ नामदेवानींधरिलेंचरण ॥ साष्टांगघालोनिलोटांगण ॥ तूंस्वामी सर्वांचेंजीवन ॥ मीरंकदीनकैंबोलूं ॥ १३ ॥ ॥ ६४ ॥

भगवंतह्मणेनामयासी ॥ तूंयथार्थबोलिलासी ॥ क्षणक्षणाआठवमानसीं ॥ नपडेविसरमजसी ॥ १ ॥ आवडीभक्तिज्ञानवीतरागी ॥ ज्ञानदेवयुगानुयुगीं॥नदेखेसकळब्रह्मांडजगीं ॥ मजलागींखंतीवाटे ॥२॥ उद्धवेंचरणावरीठेवोनि माथा ॥ ह्मणेएकविनंतिपरिसावीजगन्नाथा ॥ गुजअंतरींचें

सांगासमर्था ॥ कृपावंतास्वामिया ॥ ३ ॥ निवृत्तिज्ञानदेव
सोपानांसी ॥ तिघांबैसविलेंसमाधीसी ॥ मुक्ताबाईचीस्थि-
तीकैशी ॥ मजप्रतितीसांगावी॥४॥ह्मणेविठोजीतूंकायनेण-
सी ॥ प्रीतीकरूनीआह्मापुससी ॥ तरीऐकास्तुतिहृषीके-
शी ॥ ऐसेंउघडतुजशींबोलतों ॥ ५ ॥ निवृत्तीचाकरअभ-
यशिरीं ॥ सत्यसनातननिर्धारी॥महाकल्पाच्याअंतीवरी ॥
देहअवसरीठेविला ॥ ६ ॥ तंववरीबाईचेंशरीर ॥ चिरका-
ळनिरंतर ॥ मुक्ताबाईब्राह्मणीसाचार ॥ जाणानिर्विकारउ-
द्धवा ॥ ७ ॥ देवगणबैसोनिविमाना ॥ गेलेआपुलियाभुव-
नां ॥ सकळमहामुनिस्थाना ॥ हरिचरणावंदोनी ॥ ८ ॥
ह्मणतीसभाग्यकेव्हडें ॥ जिहींकेलेंब्रह्मउघडें ॥ संवत्सर
गांवींवाडेंकोडें ॥ देखिलेंरोकडेंसकळीं ॥ ९ ॥ निवृत्तिनाथ
पायाळपूर्ण ॥ ज्ञानदेवज्ञानांजन ॥ सोपानदेवब्रह्मजाणोन॥
जिहींनिधानजोडिलें ॥ १० ॥ शुद्धिभक्तिभावज्ञान ॥ जो-
डिलाविठोबानिधान ॥ तेथींचेंविभागीसंपूर्ण ॥ प्रेमजीवन
ओसंडत ॥ ११ ॥ वैष्णवमहंतांसीकुरौंडी ॥ मुक्ताबाईओ-
वाळोनिसांडी ॥ सद्भावउभारिलीगुढी ॥ आनंदपरव-
डींनाचती ॥ १२ नामाह्मणेपंढरीसी ॥ स्वामीचालिलेशी-
घ्रगतीसी ॥सवेंभक्तमांदीसी॥नामवाचेंसीगर्जती॥१३॥६५॥
ऐशीयाचेंजोचारित्रआवडींऐके ॥ तोयाभक्ताबरोबरीतु-
के ॥ भोगीवैकुंठनिजसुख ॥ देवस्वयंमुखेंबोलिले ॥ १ ॥
धन्यधन्यतोपुंडलीकभक्त ॥ जयाकारणेंहरितिष्ठत ॥ ऐसे
पवाडेगर्जतात ॥ जगतारितनामेंकरूनी ॥ २ ॥ जन्मोज-
न्मींसभाग्यहोती ॥ तयालागींनिजपदप्राप्ती ॥ कदाकाळीं

॥ श्री ॥

नामदेवकृत

# तीर्थावळीचे अभंग.

---

नामयाचेभेटीज्ञानदेवआले ॥ लोटांगणघातलेंनामदेवें ॥ १ ॥ देऊनिआलिंगनप्रीतीच्यापडिभरें ॥ पूजिलेंआदरें यथाविधी ॥ २ ॥ धन्यतोअवसरूसंतसमागमु ॥ करीत संभ्रमुआवडीचा ॥ ३ ॥ नामदेवह्मणेसुफळमाझेंजिणें ॥ स्वामीच्यादर्शनेंधन्यझालों ॥ ४ ॥ पूर्वपुण्यमाझेंफलोन्मुखझालें ॥ प्रत्यक्षभेटलेपांडुरंग ॥ ५ ॥ संसारींआसक्तमायामोहरत ॥ तापत्रयींसंततझालेजीव ॥ ६ ॥ ऐशीयापतितांचाकरावाउद्धार ॥ यालागींअवतारतुमचाजगीं ॥७॥ तरीमीएकदीनमूढमतिहीन ॥ चरणींचारजरेणसंतांचीया ॥ ८ ॥ ह्मणूनिपंढरीनाथपाळितसेमातें ॥ प्रेमजीवनभातें देऊनिया ॥ ९ ॥ आजीस्वामींनींपाहिलेंकृपादृष्टीं ॥ केली सुखवृष्टिअनिवार ॥ १० ॥ नामाह्मणेतुमच्याचरणांच्या आधारें ॥ ठाकीनपैलपारभवनदीचा ॥ ११ ॥ ॥ १ ॥

ज्ञानदेवह्मणेतूंभक्ताशिरोमणी॥जोडिलेजन्मोनीकेशवचरण ॥ १ ॥ प्रेमसुखगोडीतुजचीफावली ॥ वासनामावळलीसकळतुझी ॥ २ ॥ धन्यतुझेंजन्मधन्यतुझेंकुळ ॥ धन्य तुजराउळजवळीअसे ॥ ३ ॥ भक्तिप्रेमधन्यसाधिलेंत्वांसार ॥ केलापैंसंसारदेशोधडी ॥ ४ ॥ क्षणएकएकांतींबैसोनीसहज ॥ अंतरींचेंगुजबोलोंकांहीं ॥ ५ ॥ जीवन्मुक्तज्ञा-

नीजरीझालेपावन ॥ देवतीर्थभजननसंडिती ॥ ६ ॥ भक्त शिरोमणीधन्यतूंसंसारीं ॥ परिएकअवधारीवचनमाझें॥७॥ भूतळींचींतीर्थेंपहावींनयनीं ॥ ऐसेंआर्तमनींआहेमज ॥८॥ तुझ्यासंगतीचेंनित्यसुखघ्यावें॥ सार्थककरावेंसंसाराचें॥९॥ ऐशीउत्कंठाबहुतमाझेपोटीं ॥ भाग्येंझालीभेटीतुजशींआ-जी ॥ १० ॥ ज्ञानदेवह्मणेपुरवीमनोरथ ॥ करावेंमुहूर्त प्रयाणासी ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ २ ॥

ऐसेंऐकूनिनामाविचारीमानसीं ॥ ह्मणेकायद्यावेंयासी प्रतिवचना ॥ १ ॥ विठोबाचेपायआठविलेमनीं ॥ बोले अमृतवचनींतयाप्रति ॥ २ ॥ सर्वसुखमजआहेपांडुरंगीं ॥ जावेंकवणालागींकवणाठाया ॥ ३ ॥ ऐहिकपरत्रचाडमज नाहींसर्वथा ॥ नलगतीपुरुषार्थामुक्तिचारी ॥ ४ ॥ रंकहो-ऊनियापंढरीचोहटा ॥ राखीनदारवंटामहाद्वारीं ॥ ५ ॥ यासुखाकारणेंशरीरकर्वतींफाडिलें ॥ दुर्जयतोडिलेंमाया-जाळ ॥ ६ ॥ त्रिभुवनीचेंवैभवसांडूनियादूरी ॥ झालोंसें भिकारीपंढरीचा ॥७॥ कल्पतरुचीछायाकामधेनूचेंदुभतें ॥ संपूर्णआईतेसर्वकाम ॥८॥ विठोबाचेपायींकायमजउणें ॥ वासनाचिमनेंगिळिलीमाझ्या ॥९॥ पाळिलोंपोशिलोंजन्मो-नीजयाचा ॥ विकलोंकायावाचामनेंत्यासी ॥ १० ॥ ना-माह्मणेस्वामीविठोबासीपुसा ॥ आज्ञादेईलशिरसाधरीन त्याची ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३ ॥

ज्ञानदेवह्मणेभलाभक्तराज ॥ कळलेंगोप्यगुजसर्वतुझें ॥ १ ॥ धीरआणिचतुरसर्वस्वेंउदार ॥ साजेतुजअधिकार प्रेमभक्ति ॥ २ ॥ धन्यतूंसंसारींभक्तभावशीळ ॥ साधिलें

त्वांकेवळप्रेमसुख ॥ ३ ॥ देऊनिआलिंगनधरियेलाकरीं ॥ वंदियेलींशिरींचरणरजें ॥ ४ ॥ राउळाभितरींचलाजाऊंवे-गें ॥ आज्ञामागोंदोघेतीर्थयात्रे ॥ ५ ॥ सत्वरउठोनीआले स्वामीजवळी ॥ मस्तकेंठेविलींचरणांवरी ॥ ६ ॥ जिवाचा निजभावसांगेज्ञानदेव ॥ ऐकोनीपंढरीरावहांसिन्नले ॥७॥ ह्मणेतूंज्ञानशीलचिद्रूपकेवळ ॥ सबाह्यनिर्मळस्फटिकाजैसा ॥ ८ ॥ सहजतीर्थरूपतूंचिनिरंतर ॥ असतांहाविचारका-यकरशी ॥ ९ ॥ येरूह्मणेस्वामीबोलिलेतीबरवें ॥ परीसा-र्थककरावेंयादेहाचें ॥ १० ॥ प्रसंगेंनामयाचेसंगतींसुखघ्या-वें ॥ ह्मणोनिज्ञानदेवेंधरिलेचरण ॥ ११ ॥ ॥ ४ ॥

मगहांसोनीपंढरीनाथपाहेनाम्याकडे ॥ ह्मणेनवलकेव-ढेंभाग्यतुझें ॥ १ ॥ प्रत्यक्षपरब्रह्ममूर्तिज्ञानेश्वर ॥ करीत-सेआदरसंगतीचा ॥ २ ॥ ऐसेंभाग्यजेणेंसर्वस्वेंसाधावें ॥ तरीचजन्मायावेंविष्णुदासा ॥ ३ ॥ जावेंस्वस्तिक्षेमयावें शीघ्रवत ॥ करावेंस्वहितकळेलतैसें ॥४॥ सर्वभावेंआमुचा विसरनपडावा ॥ लोभअसोंद्यावामजवरी ॥ ५ ॥ परिये-सीज्ञानराजाबोलेजगज्जीवन ॥ तूंतंवसर्वज्ञसुखमूर्ति ॥६॥ परियेकमागणेंआहेतुजप्रति ॥ आठवणचित्तींअसोंद्यावी ॥ ७ ॥ हेंकृपेचेंपोसणेंमाझेंआवडतें ॥ क्षणजिवापरतेंनक-रीकदां ॥ ८ ॥ परित्वांसांकडेंघातलेंसर्वथा ॥ दाटलेंअव-स्थाहृदयमाझें ॥ ९ ॥ आरुषसाबडेंनामेंमाझेंवेडें ॥ मागीं मागेंपुढेंसांभाळावें ॥ १० ॥ तहानभूकतुवांजाणावीजिवीं-ची ॥ मजचिंतायाचीवाटेथोर ॥ ११ ॥ मगनामयाचाहा-तधरूनिश्रीपति ॥ देतअसेहातींज्ञानदेवा ॥१२॥ रानींव-

नींजनींविसंवसीझणी ॥ धाडितोंदेखोनीआर्ततुझें ॥१३॥ चरणींठेवूनिमाथानिघतेझालेदोघे ॥ आलेचंद्रभागेकेलीं स्नानें ॥ १४ ॥ पुंडलिकाचेचरणवंदूनियानामा ॥ उतरले भीमापैलतीर ॥ १५ ॥ ॥ ॥ ॥ ५ ॥

तीर्थयात्रेप्रतिबोळविलानामा ॥ आलेनिजधामादेवराव ॥ १ ॥ चरणप्रक्षालायारुक्मादेवीआली ॥ श्रीमुखन्याहाळीभरुनिदृष्टि ॥ २ ॥ तंवतेनिडारलेनयनस्वेदेंभिजलेंवदन ॥ हृदयझालेंपूर्णकरुणारसें ॥ ३ ॥ कृपेचासागरूसुखाचासुखतरू ॥ आर्तलोभापरूदीनालागीं ॥ ४ ॥ चरणीं ठेवूनिमाथापुसेजगन्माता ॥ आजिकांअवस्थाविपरीतदेखों ॥ ५ ॥ वाटतेंजडभारीनाम्याच्यावियोगें ॥ दाटलेंउद्वेगेंचित्तमाझें ॥६॥ कवण्यासुखेंस्थिरनराहेमाझेंमन ॥ केंव्हांडोळांदेखेनप्राणमाझा ॥७॥ इष्टमित्रबंधुमायबापसखा ॥ हीं नामेंमजदेखाठेविलींतेणें ॥८॥ तोकैसामजवीणराखीलआपुलाप्राण ॥ हेचिंतादारुणवाटेमज ॥९॥ तंवतेमहामायाह्मणेजीयादवराया ॥ झणीतुमच्यानामयादिठीलागो ॥१०॥ शोकमोहदुःखक्षणामाजींजळे ॥ तेंजीवनत्याजवळेंनामतुमचें ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥६॥

माझेभक्तमजअनुसरलेचित्तें ॥ त्यांहूनिपाढियंतेंमजआणिकनाहीं॥१॥ व्यक्तीसयेणेंमजतयाचीआवडी॥ युगायुगीं प्रौढीहेचिमिरवीं ॥२॥ त्याचेनिकृतार्थेंमीअसेंपूर्णकाम ॥ ते माझेपरमप्राणसखे ॥ ३ ॥ तेमाझेआश्रममीत्यांचाविश्राम ॥ जिहींरूपनामकेलेंमज ॥ ४ ॥ मीत्यांचासोयरातेमाझेसांगाती ॥ करींत्याएकांतींसुखगोष्टी ॥ ५ ॥ जिहींतनु

मनप्राणलाविलामजकडे ॥ मीतयांआवडेजिवाहूनि ॥६॥ तेमाझ्याभाग्याचेअधिकारीविभागी ॥ वैकुंठत्यालागींवसतें केलें ॥ ७ ॥ त्यांचेंगुजगोप्यमीचीएकजाणें ॥ माझीप्रेमखूणकळलीतयां ॥ ८ ॥ मनाचीसाउलीकरूनियामातें ॥ भोंगितीआतौतेंसर्वसुख ॥ ९ ॥ आपुलियाचीकिरणेंविराजेगभस्ती ॥ परिकिरणेंनहोतीआनजेवीं ॥१०॥ तैसेमाझेदासमजमाजींउदास ॥ असतीसमरसदुजेनवीण ॥११॥ मी तोभक्तरूपभक्तमाझेंस्वरूप ॥ प्रभाआणिदीपजयापरी ॥ १२ ॥ हेखूणअनुभवीजाणतीतेज्ञानी ॥ ज्यानाहींआयणीकासयाची ॥ १३ ॥ त्यांचीयाचरणींचेंरजमाझेंनामें ॥ जेंसांडिलेंरजतमेंसत्वशीळ ॥ १४ ॥ त्याचेभेटीलागींहृदय कळवळे ॥ कैंदेखेनडोळेनिवतीमाझे ॥ १५ ॥ ॥ ७ ॥

तंवतेआवडतेभक्तअंतरंगआपुले॥देवेंबोलाविलेएकांतासी॥१॥ह्मणेत्यानाम्यापरतेंमजदुजेंनावडे॥सांगेतयांपुढेंकेशवराज॥२॥त्यादेखतांचिदृष्टींचित्तमाझेंनिवें॥वाटेत्याघालावेंहृदयामाजीं ॥३॥ तयाचेनिलोभेंमनमाझेंमोहिलें ॥ अखंडराहिलेंत्याचेपाशीं ॥ ४ ॥ मजपरतेंदुजेंनजाणेतोनामा ॥ नित्यमाझाप्रेमापढियेत्यासी ॥५॥ मीभक्तकाजकैवारीह्मणतांवाटेलाज ॥ परिम्यांनाहींकांहींकाजकेलेंत्याचें ॥ ६ ॥ धर्मअर्थकामत्यानाहींदिधलें ॥ जन्मोनीबांधिलेंसेवाऋणें ॥ ७ ॥ तेणेंआपल्यापुरुषार्थेंजिंकिलासंसार ॥ केलामदमत्सरदेशधडी ॥ ८ ॥ लोभमोहदुर्धरमायामोहवैरी ॥ घातलेतोडरींकामक्रोध ॥ ९ ॥ तोनमनीआणिकादेवान करीत्यांचीसेवा ॥ मजपरताविसावानाहींत्यासी ॥ १० ॥

तेंमार्गीशिणलेंअसेलकोंमाईलें ॥ सुखदुःखआपुलेंसांगेल कवणा ॥ ११ ॥ त्याचीयाजिवीचेंमीचीजाणेंसर्व ॥ हामाझाअनुभवआहेत्यासी ॥ १२ ॥ तेंमाझेंआवडतेंदासअंतरंग ॥ त्यजिलेसर्वसंगमजचीलागी ॥ १३ ॥ देखूनितेआवडीअभिनववाटलें ॥ सप्रेमदाटलेसकळभक्त ॥ १४ ॥ पारिसाभागवतआनंदेंनाचत ॥ लोटांगणींयेतगरुडपारीं ॥ १५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ८ ॥

ऐसेंसुखरूपदोघेचालतातिमार्गीं ॥ परिचित्तपांडुरंगीं नामयाचें ॥ १ ॥ क्षणक्षणावासपरतोनिपाहे ॥ वियोगन साहेपंढरीचा ॥ २ ॥ ह्मणेकांगाकेशवराजामोकलिलेंमातें ॥ नयेसीसांगातेंसांभाळीत ॥३॥ चिंतातुरथोरपडलोंयेपरजनीं ॥ नदिसेमाझेंकोणीजिवलग ॥ ४ ॥ फुटोनीहृदयहोती दोनभाग ॥ बहुतउद्वेगवाटताती ॥ ५ ॥ तूंमाझीजननीतूं माझाजनिता ॥ बंधुआणिचुलतापंढरिराया ॥ ६ ॥ तूंचि इष्टमित्रतूंचिगणगोत ॥ तूंचिकुळदैवतआवडतें ॥७॥ तूंचि माझेंव्रततूंचिमाझेंतीर्थ ॥ तूंचिधर्मअर्थकामदेवा ॥ ८ ॥ तूंचिज्ञानचक्षुतूंचिमाझालक्षु ॥ तूंचिमाझासाक्षुस्वभावासी९ साचकींलटिकेंहेंमाझेंबोलणें ॥ तुजवांचूनिजाणेंकवणदुजा ॥ ॥ १० ॥ नामाह्मणेआपुल्याअनाथासांभाळीं ॥ येऊनिहृदयकमळींराहेंमाझ्या ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥९॥

ज्ञानदेवह्मणेपरियेसीविष्णुदासा ॥ तूंसुखसंतोषापात्र होसी ॥ १ ॥ प्रेमाचाजिव्हाळातुझ्याहृदयींआला ॥ तूंकां वेळोवेळांखंतिकरिसी ॥ २ ॥ विचारीसावधहोऊनिभक्तराजा ॥ सुखानंदतुझातुजचिजवळी ॥ ३ ॥ मीनेणेंज्ञानगति

नेणेंयोगयुक्ति ॥ नदेखेंविश्रांतिएकेवीण ॥ ४ ॥ सर्वभावेंम-
जतेंचिरूपआवडे ॥ जेंपुंडलिकापुढेंउभेंअसे ॥ ५ ॥ तोमा-
झाविठ्ठलुदावादृष्टिभरी ॥ आसमीनकरीआणिकांची ॥ ६ ॥
व्यापकविठ्ठलअसेसर्वदेशीं ॥ जरीसांडूनियापाहशीभेदभ्र-
मु ॥ ७ ॥ तोनाहींऐसाठावउरलासेकवण ॥ सर्वत्रसंपूर्णग-
गनजैसें ॥ ८ ॥ कायावाचामनेंतोचिमजव्हावा ॥ गीतींगा-
तांजिवासुखवाटे ॥ ९ ॥ ऐकावाश्रवणींपहावातोचिनयनीं ॥
नवजावाजवळूनिदुरीकोठें ॥ १० ॥ जेंअक्षरअव्यक्तदेशका-
ळरहित ॥ ज्ञानीउपासितसोहंभावें ॥ ११ ॥ सर्वइंद्रियां-
सहितआवरूनिचित्त ॥ भोगितीअद्वैतानित्यसुख ॥ १२ ॥
सर्वसुखमजआहेत्याचेपायीं ॥ आणिकांच्यावाहींनपडेंकदां
॥ १३ ॥ तेथेंमाझेंमनरंगलेंसेभावें ॥ सुखयेणेंजिवेंदाखिलें
डोळां ॥ १४ ॥ सर्वगतसंपूर्णसर्वकाळअसणें ॥ होणेंआणि
जाणेंनाहींजया ॥ १५ ॥ तेंतुजमाझारींतूंतयाभितरीं ॥ अ-
नुभवींनिर्धारींठेवूनिमन ॥ १६ ॥ नमनीनमनीलटिकीहे
काहाणी ॥ जलधारावांचूनिचातकजैसा॥१७॥तैसेंमाझेंमन
स्मरेरात्रंदिवस ॥ पंढरीनिवासजीवनमाझें ॥ १८ ॥ ऐसें
ऐकूनिबोलणेंह्मणेज्ञानदेव ॥ धन्यतुझाभावएकविध ॥१९॥
नामाह्मणेमाझ्यासुखाचाविसावा ॥ आवडेयाजिवापंढरी-
रावो ॥ २० ॥ ॥ ॥ ॥ ॥ १० ॥

भक्तभागवतबहुसालऐकिले ॥ बहुहोऊनिगेलेहोतीपुढें
॥ १ ॥ परीनामयाचेंबोलणेंनव्हेंहेंकवित्व ॥ हारसअद्भुत
निरुपम ॥ २ ॥ हेंसुखविश्रांतिनाहींहोकल्पांतीं ॥ विचा-
रावेंसंतींदूरदृष्टीं ॥३॥ होतूशस्त्रवक्तेव्युत्पत्तीचेमाथे ॥ होतू

बहुश्रुतबुद्धिवंत ॥ ४ ॥ होतूकर्मनिष्ठनिधीचेउद्भट ॥ होतू सर्वश्रेष्ठपूज्यलोकां ॥ ५ ॥ होतूकळावंतकवित्वकुशल ॥ होतूकांवाचाळचतुरतेचे ॥ ६ ॥ होतूकांपाठकहोतूकांसाधक ॥ होतूकांवाचकग्रंथाकार ॥ ७ ॥ होतूआत्मज्ञानीहोतूनिजध्यानीं ॥ होतूवज्रासनींबैसकेचे ॥ ८ ॥ होतूयोगयुक्तहोतूजीवन्मुक्त ॥ होतूकांविरक्तसर्वसंगीं ॥ ९ ॥ ऐसे होतूकांसभाग्यसर्वज्ञसंपन्न ॥ परीतुजवीणनमनींमी ॥१०॥ हेखुणजाणताएकपंढरीरावो ॥ रुक्मादेवीनाहोश्रीविठ्ठल ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ११ ॥

ऐसेंनित्यानंदभरितक्रमितातिमार्गु ॥ हृदयींतोअनुरागुआवडीचा ॥ १ ॥ प्रेमेंओसडंतकरितीस्वहितगोष्टी ॥ दावितीकसवटीअनुभवाची ॥ २ ॥ वापतेसुखवृष्टिहोतसे अनिवार ॥ ब्रह्मरसपूरओसंडत ॥ ३ ॥ ज्ञानदेवह्मणेपरियेसीनामया ॥ अद्वैतआत्मयाप्रेममूर्ती ॥ ४ ॥ भक्तिभाग्यतुवांजोडिलेंअविनाश ॥ सांगपासविलासमार्गत्याचा ५ कैसातोसाधावासांगभजनाविधि ॥ कैसीनमनबुद्धिसत्वशील ॥ ६ ॥ कैसानिर्विकारध्यानाचाप्रकार ॥ हासर्वविचार सांगेमज ॥ ७ ॥ कैसेंतेंश्रवणकैसेंतेंमनन ॥ कैसेंनिजध्यासनदृढहोय ॥ ८ ॥ कवणतेंभक्तिकवणतेंधृति ॥ कवणतेंविश्रांतिदावीमज ॥ ९ ॥ बहुतउत्कंठितयासुखाकारणें ॥ तेंमजपारणेंकरवीआजी ॥ १० ॥ सांगअनुभवसाधनउपाव ॥ विनवीज्ञानदेवनामयासी ॥ ११ ॥ ॥ १२ ॥

परिसूनितेगोष्टीघालीचरणींमिठी ॥ दाटलासेकंठींसद्गदीत ॥ १ ॥ कृपेचेंपोसणेंमीपंढरीरायाचें ॥ येवढेंभाग्यकै-

चेंजाणिवेचेंमज॥२॥ नोहेंबहुश्रुतनोहेंज्ञानशील ॥ दासमी दुर्बळवैष्णवांचा ॥ ३ ॥ नेणतेंनेणतेंकांहींचमीनेणतें ॥ ह्मणूनिदेवेंहातोंनिरावलेंतुज ॥ ४ ॥ येतांमाझाहातदिधलातुमच्याकरीं ॥ घातलेंआभारींमायबापें ॥ ५ ॥ त्याचेनिकृपावशेंयेईलवाचेसरिसें ॥ कळेलकांहींतैसेंनिवेदीन॥६॥ भानूसदेखणेंकरीनतेजेंआन ॥ तैसेंमाझेंज्ञानस्वामीप्रति ॥ ॥ ७ ॥ कल्पतरुचियाचककृपणाचेद्वारीं ॥ दैन्यभाकीथोरी कामधेनू ॥८॥ तैसीतुमचीयाउचामजदीनाप्रति ॥ नकळे काळगतिसमर्थांची ॥ ९ ॥ मातेचियास्वरेंबालकबोबडें ॥ खेळवीलाडेंकोडेंनवजेलाजों ॥ १० ॥ नामाह्मणेतैसेंतुह्मी माझेंकौतुक ॥ करूनिसुखेंसुखवाढवितां ॥ ११ ॥ ॥१३॥

ज्ञानदेवह्मणेशंकानधरिजेमनीं ॥ दृष्टिदुजेपणींनठेवावी ॥ १ ॥ सुखेंसुखघ्यावेंअनुभवूनिअनुभवावें ॥ आहेतें आघवेंब्रह्मरूप ॥ २ ॥ त्यासुखाचाअनुभवकरीसुखरूपा ॥ सुखवस्तूच्यादीपानामदेवा ॥ ३ ॥ सुखाचियेताटींसुखाचि ओगरी ॥ तृप्तिहोईलथोरीक्षुधातुरा॥ ४ ॥ पंढरीरायाचातूं प्रेमभांडारी ॥ आशापूर्णकरीयाचकाची ॥ ५ ॥ विश्रांतिसीपात्रतूंचिविष्णुदासा ॥ हामजभरंवसाआहेतुझा ॥ ६ ॥ ह्मणोनिहासंगधरिलीथोरआस ॥ झणींहोसीउदासभक्तराया ॥७॥ सिंधुहूनिसखोलसुरसतुझेबोल ॥ आनंदाचीओलनित्यनवी ॥ ८ ॥ तेंमजसादरएकवीसत्वर ॥ श्रवणक्षुधातुरजालेमाझे ॥ ९ ॥ जाणीवनेणीवतरीचशोभेसर्व ॥ जरीहोयआविर्भाववैराग्याचा ॥१०॥ ज्ञानदेवह्मणेतूंभक्तअंतरंग ॥ नलगेतुजपांगबहुज्ञतेचा ॥ ११ ॥ ॥ १४ ॥

ऐसेंऐकूनियाप्रेमाआलापोटीं ॥ ह्मणेबोलावीतेगोष्टीअ-
नुभवाची ॥ १ ॥ येरकर्मधर्मसर्वहीपाल्हाळ ॥ अमुचिकेव-
वळजाणिवेचा ॥ २ ॥ ऐसासंतभेटेविरळाभाग्ययोगें ॥ जो
आथिलावैराग्येंसप्रेमळ ॥३॥ सर्वभूतींदयासर्वभावेंकरुणा॥
जेथेंमीतूंपणामावळला ॥ ४॥ भजनतयानांववाटेमजगोड॥
येरतेंकाबाडयेणेंवीण ॥ ५ ॥ नमनतेनम्रतानदेखेगुणदोष॥
अंतरींप्रकाशआनंदाचा ॥ ६ ॥ येरतेंदांभीकजाणावेमाया-
वी ॥ विश्वासमीजीवींनधरींत्याचा ॥ ७॥ ध्यानतयानांव-
निर्विकारनिकें ॥ जेंविश्वींमाझ्यादेखेविठोबासी ॥८॥अखंड
हृदयींतेंचिआठवण ॥ साजिरेसमचरणविटेवरी ॥ ९ ॥
नादींलुब्धजैशीआसक्तहरिणी ॥ जायविसरूनिदेहभाव१०
यापरीतल्लीनदृढराखावेंमन ॥ यानांवश्रवणआवडीचें॥११॥
व्यवसायींचित्तठेवोनिकृपण ॥ लाभाचेंचिंतनसर्वकाळ १२
यापरीअखंडस्वहितविचारण ॥ करिजेमननसत्वशीळ १३
परपुरुषींजैसीआसक्तजारिणी ॥ नलगेतिचेमनींकामधंदा॥
॥ १४ ॥ कीटकीभिंगुटीयेजैंअनुसंधान ॥ निकेंनिजध्यासन
एकवीध ॥ १५ ॥ सर्वभावेंएकविठ्ठलचीध्याये ॥ सर्वभूतीं
पाहेरूपत्याचें ॥ १६ ॥ सर्वांहूनिनिराळारजतमावेगळा ॥
भोगीप्रेमकळातेचिभक्ति ॥ १७॥ सत्वाचासुभटुअसंगए-
कटु ॥ वैराग्यउद्भटुएकनिष्ठ ॥ १८ ॥ प्रारब्धाचाभोगनेणे
देहस्मृति ॥ अखंडतेधृतिनिर्विकार ॥ १९ ॥ निर्वासना
मननिजलाभेंसंपूर्ण ॥ नेणेस्वरूपज्ञानसंकल्पाचें ॥ २० ॥
अनुरागेंगोविंदुध्याइजेएकांतीं ॥ यापरतीविश्रांतिआणिक
नाहीं ॥ २१ ॥ कायावाचामनेंहामाझाअनुभव ॥ सांगि-

तळासर्वआवडीचा ॥ २२ ॥ नामाह्मणेहेंचिबोलविलेंतेणें॥ उदारसर्वज्ञपांडुरंगें ॥ २३ ॥ ॥ ॥ ॥१५॥

पश्चिमप्रभासआदिकरूनिद्वारका ॥ पाहिल्यासकळिका मोक्षपुऱ्या ॥ १ ॥ पंथींपावनतीर्थेंपाहिलींसकाळिकें ॥ प्रक्षाळिलींपातकेंवासनेचीं ॥ २ ॥ परीपंढरीचेंप्रेमनामयाचे जीवीं ॥ माउलीआठवीपांडुरंग ॥ ३ ॥ जीवन्मुक्तदोन्ही भक्तआणिज्ञानी ॥ परतोनीयेथोनीयेतीमार्गीं ॥४॥ तृषाक्रांतवनींहोतसेपीडनी ॥ पडलेचिंतवणींजिवनालागीं ॥५॥ तंवदृष्टिएककूपदेखिलाअवचिता ॥ उदकतेथेंपहातांनलगे अंत ॥ ६ ॥ कवणीयेपरीकरूंरिघवण ॥ प्राणसंतर्पणेंवांचवावे ॥ ७ ॥ मगत्यानामयाप्रतिबोलेज्ञानदेव ॥ मजएक उपावसाध्यअसे ॥८॥ लघिमेचेंलाघवकरूनितेअवसरीं ॥ उतरूनिभीतरींघेतलेंजीवन ॥ ९ ॥ घेऊनिउदकनिघाले बाहेरी ॥ ह्मणेअवधारीनामदेवा ॥ १० ॥ आणूनिजीवन देईनतुझेहातीं ॥ नदिसेचिगतिआनकांहीं ॥ ११ ॥ पडल्यासंकटींविचारावेंमनीं ॥ सांडावीआयणीअभिमानाची ॥ १२ ॥ आत्मातोविठ्ठलसर्वनिरंतरीं ॥ निरोपदेझडकरी उशीरझाला ॥ १३ ॥ आत्मातोविठ्ठलअसतांसर्वदेहीं ॥ माझीचिंताकांहींनाहींत्यासी ॥ १४ ॥ नामाह्मणेधीरकरावानावेक ॥ दावीनकौतुकस्वामीजवळीं ॥ १५ ॥ ॥१६॥

मगलावूनियानेत्रनिर्धारपैंकेला ॥ हृदयींआठविलाकेशवराज ॥ १ ॥ इष्टमित्रबंधुसोयराजननीजनकु ॥ नेणें मीआणिकुतुजवांचूनि ॥ २ ॥ येईपंढरीरायामजलागींधांवतु ॥ ह्मणीपहासीअंतुकृपाळुवा ॥ ३ ॥ तुझियेमूर्तीचीबहु

खंतीवाटली ॥ आसुवेंदाटलींनेत्रकमळीं ॥ ४ ॥ धीरनधर-
वेपोकारितोंधांवा ॥ येईमाझ्याकेशवामायबापा ॥ ५ ॥ का-
यावाचामनेंविनटलोंचरणांसी ॥ शरणआणिकांसीजाऊं
कोण॥६॥जन्मोनिपोसणातुझाचिह्मणती ॥ मोकलितांअंतीं
लाजकोणा॥७॥अनाथाकैवारीनामाचीआयणी ॥ वर्णिजेपु-
राणींकीर्तितुझी ॥ ८ ॥ तेंकायलटकीवाणीकरिशीआजी ॥
अर्जुनितुजमाझीकरुणानये ॥ ९ ॥ गजेंद्राकारणेंज्यावेगीं
धांवणें ॥ केलेंतुवांकोणेकळवळेनी ॥१०॥ द्रौपदीचेआकां-
तींयेसीसोडवणें ॥ तेंमजकारणेंविसरलासी ॥ ११ ॥ येतां
निरविलेंज्ञानदेवाप्रति ॥ दिलात्याचेहातींहातमाझा ॥१२॥
तोतूंकैसामजकरिशीउदास ॥ धांवकासावीसथोरझालों१३
सर्वभावेंतूंमजलागींलोभापर ॥ मीतुझाडिंगरआवडता
॥ १४ ॥ नामाह्मणेहांसेंझालेंपिशुनाचें ॥ नकरीमजदीना-
चेंअव्हेरण ॥ १५ ॥ ॥ ॥ ॥ १७ ॥

तंवनिजभुवनींवैकुंठींसुखेंपंढरीनाथ ॥ नित्यजीवींआर्त
निजभक्ताचें ॥ १ ॥ कृपेचावोरसुहोतांदेवापोटीं ॥ तेचिक-
रीगोष्टीरुक्माईशीं ॥ २ ॥ क्षेममाझानामायावाएकवेळां ॥
मगमीजीवावेगळाजाऊंनेदीं ॥ ३ ॥ आजिमाझाडावाकां
लवतोलोचन ॥ करीतसेस्फुरणवामबाहु ॥ ४ ॥ उद्वेगउ-
पसर्गवाटतातीजीवा ॥ कोण्याजिवलगाझालेकष्ट ॥ ५ ॥
वाजतांहावारानलागोराजसा ॥ माझ्याविष्णुदासाभावि-
कासी ॥ ६ ॥ वाटेतहानभूकझालीत्यापीडणी ॥ तरीचमा-
झ्यामनींऐसीदशा ॥७॥ तंवतीविश्वमाताविचारीनावेक ॥
अवचितांशोकपडिलाकानीं ॥ ८॥ तृषाक्रांतनामाकारितसे

धांवा ॥ वेगींजाऊनिदेवासांभाळावें ॥ ९ ॥ तंवतोआर्तबंधुऐकूनिवचन ॥ मनाचेनिमनेंवेगकेला ॥ १० ॥ तंवगडगडीतकूपउदकेंवोसंडला ॥ कल्पांतींखवळलासिंधुजैसा ॥ ११ ॥ ज्ञानदेवह्मणेझालेंअभिनव ॥ कैसाऋणीदेवकेला यानें ॥ १२ ॥ सावधकरूनियादिलेंआलिंगन ॥ जीवेंलिंबलोणउतरिलें ॥१३॥ येरेंचरणावरीठेवियेलामाथा ॥ ह्मणेमाझीआहेचिंताविठोबासी ॥ १४ ॥ नामाह्मणेमाझेबहुललेपाळिले ॥ कैंदेखेनपाऊलविटेवरी ॥ १५ ॥ ॥१८॥

योगीपरमध्यानींबैसलियाजाणा ॥ कांहींचयामनाविश्रांतिनुपजे ॥ १ ॥ तुजवीणदुसरेंकांहींचनाठवे ॥ लागली तुझीसवेविष्णुदासा ॥२॥ कवणकुळींतूंजन्मलासीनाम्या ॥ केशवपरमात्मातुजजवळी ॥ ३ ॥ धेनुवसेवनींवत्सअसेघरीं ॥ चित्ततयावरीठेवूनिचरे ॥ ४ ॥ तेंतयादेखोनीसंतोषलीमनीं ॥ तैसेंतुझ्यागुणींओलाविलें ॥ ५ ॥ तीर्थयात्रेजाणेंकांहींनलगेंकरणें ॥ ऐकूनितुझेंगाणेंसुखरूप ॥६॥ वेडावल्याश्रुतिशास्त्रेंआणिपुराणें ॥ योगियांचींध्यानेंविसर्जलीं ॥ ७ ॥ तुझेंप्रेमतोडावेंमनेंकोठेंजावें ॥ जाऊनियापहावेंकायतेथें ॥ ८ ॥ समाधिसोहळालयलक्षवैराग्य ॥ तेंत्वांआह्मांलागींआणियेलें ॥ ९ ॥ ऋषीगणगंधर्वब्रह्मादिकसर्व ॥ लक्षितातीठावअरूपाचा ॥ १० ॥ तोतुवांआह्मांसन्मुख उभाकेला ॥ चरणांसीलागलाज्ञानदेव ॥ ११ ॥ ॥१९॥

तीर्थंकरूनिनामापंढरीसीआला ॥ जिवलगाभेटलाविठोबासी ॥ १ ॥ सद्गदीतकंठओसंडलानयनीं ॥ घातली लोळणीचरणांवरी ॥ २ ॥ ह्मणेशिणलोंपंढरीरायापाहेकृपा

दृष्टीं ॥ थोरझालोंहिंपुटीतुजवीण ॥ ३ ॥ अज्ञानाचाभाग होतामाझेमनीं ॥ हिंडलोंह्मणोनिदारोदारीं ॥ ४ ॥ पंढरी-चेंसुखपहातांकोटीवाटे ॥ स्वप्नींहीपरीकोठेंनदेखेंची ॥ ५ ॥ उदंडातीर्थांचीऐकोंजायप्रौढी॥चित्तमाझेंओढीचंद्रभागे ॥६॥ ह्मणोनिचरणांचीठाकूनिसाउली ॥ आलोंमजसांभाळी मायबापा ॥७॥ त्यादेवाचीवासनपहातीमाझेनयन ॥ नक-रितीपूजनकरत्याचे ॥ ८ ॥ तेणेंपंथेंमाझेनचालतीचरण ॥ नऐकतीश्रवणकीर्तित्याची ॥९॥ कटींतटींजेणेंकरनाहींठे-विले ॥ नदेखोंपाउलेंविटेवरी ॥ १० ॥ त्यासीम्हणतांदेव लाजेमाझेंमन ॥ तेकष्टदारुणकोणासांगों ॥ ११ ॥ ज्याचे गांवींनाहींवैष्णवांचामेळा ॥ नदेखोंसुकाळहरिकथेचा॥१२॥ कुंचेगरुडटकेनदेखेंपताका ॥ त्यादेवाचीशंकावाटेथोर॥१३॥ हेंनदेखोंतेथेंखंतीवाटेजिवीं ॥ तेवेळींआठवींरूपतुझें ॥१४॥ इष्टमित्रबंधुतूंकुळदेवता ॥ नामाम्हणेआवडताप्राणमा-झा ॥ १५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ २० ॥

मगकेशवह्मणेनाम्याखंतीवाटेमनीं ॥ निद्रानलागेनय-नींपहातांवाट ॥ १ ॥ तुजवीणउदासवाटेहेपंढरी ॥ नपडे क्षणभरीविसरतुझा ॥ २ ॥ डोळियांवेगळानवजेंकोठेंदुरीं॥ चित्तमजवरीठेवूनिराहें ॥ ३ ॥ तुजमाझीसवेमजतुझीआ-वडी ॥ गुळासीनसोडीगोडीजैशी ॥ ४ ॥ तैसेतुह्मीआह्मी एकमेकामाजीं ॥ विचारितांसहजोंदुजेंनाहीं ॥ ५ ॥ येति-यांजातियांपुसेंतुझीगोष्टी ॥ ह्मणेमाझेंनामेंदृष्टींपडिलेंहोतें ॥ ६ ॥ वाटेंतहानभूकेंपीडिलेंजाणेकोण ॥ एकामजविणगु-जत्याचें ॥ ७ ॥ रात्रंदिवसखेदकरूनियाजिवा ॥ असेल

माझाधांवापोकारीत ॥ ८ ॥ मजवीणकोणाचेसाउलीबैसे-
ल ॥ कोणत्यापुसेलशीणभाग ॥ ९ ॥ संतांपाशींसांगेशि-
णलेंमजवीण ॥ कंठींधरिलाप्राणमजलागीं ॥ १० ॥ धरू-
निहनुवटीदिधलेंआलिंगन ॥ कुरवाळूनिवदननेत्रपुसी ११
मगकाढूनिकंठींचीसुमनतुळसीमाळा ॥ घातलीसेगळांना-
मयाच्या ॥ १२ ॥ सर्वांगसुंदरपाहेकृपादृष्टीं ॥ पुसेजिवीं-
चीगोष्टीकृपासिंधु ॥ १३ ॥ निवृत्तिज्ञानेश्वरसोपानखेचर॥
नरहरीसोनारआदीकरोनि ॥ १४ ॥ समस्तभक्तमिळूनि
लोटांगणींयेती ॥ आलिंगनदेतीनामयातें ॥ १५ ॥ अ-
निवारसुमनेंवर्षतातीसुरवर ॥ गगनींजयजयकारशब्दहो-
ती ॥ १६ ॥ ऋषिगणगंधर्वमिळूनिसकळीक ॥ येतीदृष्टीं
सुखघ्यावयासी ॥ १७ ॥ तंवरुक्माबाईआरतीघेऊनिआ-
लीवेगें ॥ ओवाळिलेदोघेदेवभक्त ॥ १८ ॥ कौतुकेंनाम्या-
चीधरुनीहनुवटी ॥ पाहेकृपादृष्टींघडियेघडिये ॥१९॥ २१

केशवह्मणेनाम्याधन्यतुजफावलें ॥ बरवेंतुवांकेलेंआत्म-
हित ॥ १ ॥ पुण्यपावनतीर्थेंपाहिलींसकळीकें ॥ प्रक्षाळि-
लींपातकेंवासनेचीं ॥ २ ॥ धन्यतुवांकेलेंजन्मोनिसार्थक ॥
शोकमोहदुःखनिवारिलें ॥ ३ ॥ तीर्थयात्राफळव्हावयासंपू-
र्ण ॥ करीउद्यापनविधियुक्त ॥ ४ ॥ केलियाकष्टाचेंहोईल
सार्थक ॥ सांगेनतेंएकवचनमाझें ॥ ५ ॥ महामुक्तिक्षेत्रवै-
कुंठभूमीवरी ॥ विख्यातपंढरीभूवैकुंठ ॥ ६ ॥ एकशीतअ-
न्नादिजेद्विजामुखीं ॥ राहेसदासुखीकल्पवरी ॥ ७ ॥ क्षेत्र-
वासीभावेंपूजावेब्राह्मण ॥ षड्रसभोजनद्यावेंत्यांसी ॥ ८ ॥
सुगंधचंदनसुमनतुळशीमाळा ॥ समर्पितांबोलासदक्षिणा

॥ ९ ॥ ऐसेंबोलोनिनामाधरियेलाकरीं ॥ राउळाभितरीं घेऊनिगेले ॥ १० ॥ रुक्माईशींसांगेवैकुंठींचाराणा ॥ आ-जीआराधनानामयाची ॥ ११ ॥ ॥ ॥ २२ ॥

तंवतीजगन्मातान्ह्मणेजीकृपावंता ॥ कर्ताकरविताकोण याचा ॥ १ ॥ हातुमचादासआहेअंतरंग ॥ कायहेउद्योग करणेंअसे ॥ २ ॥ सर्वभारत्याचालागेचालवणें ॥ ऋणीके-लेंयेणेंजन्मोजन्मीं ॥ ३ ॥ तुम्हापरतेंयासीजिवलगसोइरें॥ कोणआहेदुसरेंलोभापर ॥ ४ ॥ दृढचरणधरोनिराहिला अंतरीं ॥ झालासेअधिकारीसर्वस्वाचा ॥ ५ ॥ जन्मोनि-यायेणेंजोडिलेंजेंकांहीं ॥ तितुकेंतुमचेपायींनिक्षेपिलें ॥६॥ म्हणूनियाचेंकोडकरावेंपरिपूर्ण ॥ व्हावेंतेंउत्तीर्णऋणयाचें७ मायबापयाचींसखींजिवलग ॥ सांडूनितुमचासंगधरिला सुखें ॥ ८ ॥ म्हणूनियाचेंहितलागेविचारावें ॥ उचितकरा-वेंदेवराया ॥ ९ ॥ आपुल्यादासाचासंभ्रमसोहळा ॥ करा-वागोपाळाब्रीदतुमचें ॥ १० ॥ रुक्माईम्हणेहाभाग्यवंतना-मा ॥ नकळेयाचाप्रेमानित्यनवा ॥ ११ ॥ ॥ २३ ॥

आतांजावेंवेगींनामयाघेवोनि ॥ सांगावींआमंत्रणेंब्रा-म्हणांसी ॥ १ ॥ सकळकामपूर्णअसतीतुमचेपायीं ॥ वि-चारावेंकांहींनलगेदेवा ॥ २ ॥ कायकायनलभेतुमचेकृपा-दृष्टीं ॥ सदांसुखवृष्टिहरीच्यादासा ॥ ३ ॥ नामयाचाहात धरोनिपंढरीनाथ ॥ निघालेअक्षतद्यावयासी ॥ ४ ॥ नि-वृत्तिज्ञानेश्वरजनामित्रसोपान ॥ सावताजाल्हनघेऊनिस-रिसे ॥ ५ ॥ चोखामेळावरवाकाठीकरपुढें ॥ दोहींबाहींदे-व्हडेसनकादिक ॥ ६ ॥ नामयाचेपाठींचालेकेशवराज ॥

लागावयारजचरणींचें ॥ ७ ॥ आपुल्यादासाचासिद्धीन्या- वापण ॥ ह्मणूनियजमानझालादेव ॥ ८ ॥ तेणेंमिषेंक्षेत्रक- रूनिप्रदक्षणा ॥ प्रार्थितोब्राह्मणांपरमप्रीतीं ॥ ९ ॥ अना- थाचानाथदीनाचागोसावी ॥ आवडीनित्यनवीसेवकांची ॥ ॥ १० ॥ तोयानामयाच्यासुखाचाशृंगारू ॥ रखुमादेवीवरू श्रीविठ्ठलु ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ २४ ॥

तंवतेंअध्यात्मीपंडितअग्निहोत्री ॥ म्हणवितीश्रोत्रीस- दाचारी ॥१॥ आह्मासीतेंनाहींतुमचेंस्वरूपज्ञान ॥ अपूर्व दर्शनदेखिलेंआजीं ॥ २ ॥ सुखाचेंपारणेंकरविलेंत्यारूपें ॥ तेणेंत्रिविधतापनिवारले ॥ ३ ॥ कायवृत्तिकायचालविजे व्यापार ॥ योजिलेंबिढारकवणेठायीं ॥ ४ ॥ आजिचेंनि- मित्तकायउपस्थित ॥ ऐकूनिपंढरीनाथबोलतेझाले ॥ ५ ॥ माझीकुळवृत्तिहरिदासांठाउकी ॥ मजशींओळखीनिकट आहे॥६॥मजअसंगासीसंगसर्वकाळत्यांचा॥अनंतजन्मांचा ऋणानुबंधू ॥७॥ साक्षतुमचेचरणकरूनिबोलेंवाचा ॥ मैत्र नामयाचाअंतरंग ॥ ८ ॥ करूनिस्नानविधियावेंशीघ्रवत॥ करावेंसनाथकृपादृष्टीं ॥ ९ ॥ बिऱ्हाडतरीअसेराउळाभि- तरीं ॥ नामसांगोंतरीअनंतजाणा ॥ १० ॥ जिवींचेंगुज गोप्यसंतांसिपुसावें ॥ निःसंदेहयावेंभोजनासि ॥ ११ ॥ ऐसीअमृतवाणीऐकूनिश्रवणीं ॥ आनंदलेमनींभूदेवते ॥ ॥ १२ ॥ आज्ञादेतीदेवाजावेंनिजमंदिरा ॥ शीघ्रवतकरा पाकसिद्धि॥१३॥रुक्माईशींसांगेसकळविवंचना॥प्रार्थिलेंब्रा- ह्मणांसकाळिकांसी ॥ १४ ॥ कर्मठअभिमानीनोळखितीम- ज ॥ देखोनियाचोजवाटेत्यांसी ॥ १५ ॥ कुळवृत्तिनाम

पुसिलेंमजतिंहीं ॥ सांगितलेंमींहीसर्वत्यांसी ॥१६॥ सां-
गातीसंतांचामित्रनामयाचा ॥ अनंतजन्मींचानिकटह्मणो-
नि ॥ १७ ॥ बिन्हाडतरीअसेराउळाभीतरीं ॥ सांगेखूण
परीनकळेत्यांसी ॥१८॥ नामतरीअनंतदाखविलासंकेत ॥
नघेत्यांचेंचित्तआठवण ॥ १९ ॥ तंवतेविश्वमाताह्मणेजी
कृपानिधी ॥ सदाभेदबुद्धित्यांचेठायीं ॥ २० ॥ विद्यावय
जातीकुळाचाअभिमान ॥ त्याकैंचेचरणप्राप्ततुमचे ॥२१॥
उदारचक्रवर्तीभक्तांचाविसावा ॥ त्यांचियानिजभावावेळा-
ईतुं ॥ २२ ॥ तोभाग्येंजोडिलावैकुंठींचाठेवा ॥ उजरीझा-
लीदैवानामयाच्या ॥ २३ ॥ ॥ ॥ २५ ॥

तंवत्याअणिमादिसिद्धीउभ्यामहाद्वारीं॥तिंहींसर्वसामुग्री
सिद्धकेली ॥ १ ॥ सडासंमार्जनगुडियातोरणें ॥ शृंगारि-
लींसदनेंपरिचारकें ॥ २ ॥ ह्मणतीकायपुण्यकेलेंविष्णुदा-
सें ॥ देवालोभेंपिसेंलावियेलें ॥ ३ ॥ द्वारींदीपावाळीचौक
रंगमाळा ॥ अभिनवसोहळाआरंभिला ॥ ४ ॥ हर्षेंमंगळ-
तुरेवाजतीविनोदें ॥ भक्तजयजयशब्देंगर्जताती ॥५॥ मं-
गलमार्जननामयाकरविलें ॥ मगआरंभिलेंपुण्याहवाचन ॥
॥ ६ ॥ देवेंअंगवस्त्रेंआपुलेंनिहातें ॥ वाहिलेंअनंतेंविष्णु-
दासा ॥ ७ ॥ सत्यभामाराहीरुक्माईजननी ॥ वेगींअक्ष-
वाणींघेऊनियेती ॥ ८ ॥ आनंदेंनरनारीकौतुकपाहती ॥
जिवेंओवाळितीनामयासी ॥ ९ ॥ आपुल्यादासाचाकरी
समारंभू ॥ दिनानाथप्रभूकृपासिंधू ॥१०॥ धन्यहाहोनामा
ह्मणतीसकललोक ॥ नेणतीयाचेंसुखब्रह्मादिक॥११॥२६॥

झालास्वयंपाकस्नानविधिसारा ॥ सकळांहांकाराजाण-

विला ॥१॥ आलेमहाद्वारींदिधलींआसनें ॥ पूजानारायणें आरंभिली ॥ २ ॥ ठाकलोंह्मणतीदेवपहाहोकैसेंझालें ॥सर्वसुखनेलेंइहींभक्तीं ॥ ३ ॥ रत्नजडितपाटसत्वरआणिले॥ द्विजबैसविलेपृथकाकारें ॥ ४ ॥ प्रक्षाळुनिचरणपुसिलेपीतांबरें ॥ मस्तकींआदरेंतीर्थवंदी ॥ ५ ॥ कस्तूरीचेटिळेदिव्यचंदनउटी ॥ घातलियाकंठींतुळसीमाळा ॥ ६ ॥ दशांगधूपरत्नाचेदीपक ॥ ओंवाळीनायकवैकुंठींचा ॥ ७ ॥ दोहींबाहींपंक्तीमांडिल्यादेवडी ॥ राहीरुक्माईवाढीतसे ॥८॥ चतुर्विधअन्नेंअथिलींपैंगुणें ॥ षड्रसपक्वान्नेंसर्वांठायीं ॥९॥ संकल्पसोडिलानामयाचेकरें ॥ भक्तजयजयकारेंगर्जिन्नले॥ ॥ १० ॥ भोक्तानारायणलक्ष्मीचापति ॥ ह्मणुनिप्राणाहुति घेतल्यावेगीं ॥११॥ भर्ताभोक्ताकर्ताकरविताआपण ॥ सहजतेथेंपूर्णसकळकाम ॥ १२ ॥ विश्वंभरकृपादृष्टींन्याहाळीत ॥ प्रार्थनाकरीतब्राह्मणांची ॥ १३ ॥ देखूनितेसमृद्धिहरिखलेद्विज ॥ झालेंनवलचोजपहाकैसें ॥ १४ ॥ कोणहागृहस्थकेवढाभाग्यवंत॥ नेणवेअद्भुतमहिमायाचा॥१५॥ जेवलेआनंदेंधालेपरमानंदें ॥ मुखशुद्धिगोविंदेंदिधलीकरीं॥ ॥१६॥ कर्पूरासहितसमर्पिलेविडे ॥ करजोडूनिपुढेंविनवितसे ॥ १७ ॥ भक्तजनकृपाळुदीनाचादयाळू ॥ आनंदेंगोपाळुउभाअसे ॥ १८ ॥ तयानामदेवेंभुलविलेंलोभें ॥ वेडावलेंउभेंचिदानंद ॥ १९ ॥ ॥ ॥ ॥ २७॥

सकळिकांनमस्कारकरूनिदेवराव ॥ सांगेजिवींचाभाव तयांप्रति ॥ १ ॥ तुमचेकृपादृष्टींकरावेंभोजन ॥ तेणेंहोईल संपूर्णव्रतसिद्धि ॥ २ ॥ हेंचिआवडीआहेबहुमाझ्याजीवीं ॥

तीआजिगोसावीपूर्णकीजे ॥३॥ क्षणएकबैसावेंस्वस्थअंतः-
करणें ॥ दिलेंनारायणेंतुळसीदळ ॥ ४ ॥ संतुष्टमानसेंया-
तेंअंगिकारा ॥ मगनिजमंदिराजावेंस्वामी ॥ ५ ॥ आजी
तुमचालाभझालाभाग्ययोगें ॥ नामयाच्यासंगेंघडलीसेवा॥
॥ ६ ॥ तुह्मींब्रह्मबीजब्रह्मादिकांपूज्य ॥ सांभाळिलेंमजकृ-
पादृष्टीं ॥ ७ ॥ मजनीरालंबाकरूनिअवलंबन ॥ निष्का-
मासीपूर्णकेलेंकाम ॥ ८ ॥ अकर्ताअसंगतुमचेनिकृतार्थ ॥
झालोंपैंयथार्थवचनमाझें ॥ ९ ॥ मगतेचतुर्विधमहामंत्रेंध्व-
र ॥ द्विजजयजयकारकरिताती ॥ १० ॥ विजयीसर्वकाळ
व्हावेंपुढतोपुढती ॥ आशिर्वाददेतीमंत्राक्षता ॥ ११ ॥
पितांबराचेआंचळींघेऊनिमंत्राक्षता ॥ घालितसेमाथांना-
मयाच्या ॥ १२ ॥ हेंचितुझेंप्रेमराहोहेंचिंतन ॥ मुखींनाम
ध्यानहृदयींसदा ॥ १३ ॥ ह्मणतीधरामरश्रमलेतीथोर ॥
लागलाउशीरभोजनासी ॥ १४ ॥ सर्वांठायींसर्वतुह्मींच
होऊनिएक ॥ कारणसार्थककेलेंनिकें ॥ १५ ॥ स्वामींचा
आदरसांगतांअभिनव ॥ नम्रतागौरवनिरुपम ॥१६॥ आ-
कल्पआयुष्यचिरंजीवव्हावें ॥ आह्मांसांभाळावेंपुढतोपु-
ढतीं ॥ १७ ॥ संतांचियेपंक्तिसारावेंभोजन ॥ करावेंपरि-
पूर्णजीवींचेंकोड ॥ १८ ॥ उच्छिष्टप्रसादद्यावानामयातें ॥
आसकरूनिपहातवाटतुमची ॥ १९ ॥ ॥ ॥ २८ ॥

सुवर्णाचेंताटओगरूनिपरिकर ॥ रुक्माईसत्वरआणि-
तसे ॥ १ ॥ कनककलशघेऊनिसत्यभामाआली ॥ आपो-
शनघालीदेवराया ॥ २ ॥ सुखाचासुरतरूभक्तचिंतामणी॥
पुरवितोआयणीनिजभक्ताची ॥ ३ ॥ उद्धवअक्रूरनारदतुं-

वरू ॥ आणीकअपारूभक्तयेती ॥४॥ महाद्वारींहोतानामा
उभाठेला ॥ जवळींबोलाविलाकेशवराजें ॥ ५ ॥ देवाचा
वोरसुदेखूनिगौरव ॥ देहींदेहभावविसरला ॥ ६ ॥ निज-
बोधानिवृत्तिराहिलानिवांत ॥ हृदयींओसंडतप्रेमरस ॥७॥
देखूनिपंढरीनाथधांविन्नलेवेगीं ॥ जैसीवत्सालागींतान्ही
धेनू ॥ ८ ॥ उचलूनिचहूंभुजींदिधलेंआलिंगन ॥ आणि-
लेउमजूनदेहावरी ॥ ९ ॥ धरूनिहनुवटीवैसविलाताटीं ॥
स्फुंदताहिंपुटीहोतअसे ॥ १० ॥ कुरवाळूनिमाथाघास
घालीमुखीं ॥ तंवतोपरलक्षीतन्मयअसे ॥ ११ ॥ अंतरीं-
चेंगुजबोलेकृपासिंधू ॥ करूनिसावधूनामयासी ॥ १२ ॥
ह्मणेजिवलगाबोलेसुखगोष्टी ॥ अर्थआहेपोटींवहुदिवसां-
चा ॥ १३ ॥ अंतरींचेंसुखबाहेरींतूंपाहे ॥ गगनाकायआ-
हेपाठीपोट ॥ १४ ॥ तैसातूंआनंदूआहेसपैंनिर्मळ ॥ चि-
द्रूपकेवळसदोदित ॥ १५ ॥ तुझेंतेंचिमाझेंमाझेंतेंचितुझें ॥
आहेसहजींसहजेंएकविध ॥ १६ ॥ परतोनिदृष्टींघालीम-
जवरी ॥ मीतोनिरंतरींतूंचिहोसी ॥ १७ ॥ हातुझासोहळा
पाहेउघडाडोळा ॥ जंवमीआहेंजवळाज्ञानदीपू ॥ १८ ॥
आतांतुझेभेटीआलेभक्तराणे ॥ सुखाचेंपारणेंकरवीत्यांसीं
॥ १९ ॥ परमानंदमूर्तिधन्यहानिवृत्ति ॥ सुखाचासंगाती
ज्ञानदेव ॥ २० ॥ पवित्रहासोपानपरलोकींचातारू ॥ क-
रीयाचाआदरूभाग्यवंता ॥ २१ ॥ ह्मणूनिपंढरीनाथेंआ-
श्वासिलाकरें ॥ मिठीदिलीयेरेंचरणकमळा ॥ २२ ॥
नामाह्मणेतुझेकृपेचाओलावा ॥ विश्रांतियाजीवाझाली
असे ॥ २३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ २९ ॥

नामयाचेमुखींदेऊनिकवळ ॥ पुसतसेगोपाळाशिणभाग ॥ १ ॥ जेंकरकमळसनकादिकांशिरीं ॥ नामातिंहींकरींकुरवाळीला ॥ २ ॥ सांडीसर्वखंतीजिवींचीकाजळी ॥ विश्रांतीजवळीआहेतुज ॥ ३ ॥ वियोगाचेशोकेंशिणलासी मार्गीं ॥ देहमजलागींवाळविलें ॥ ४ ॥ कोमाइलेंवदनानिरांजिलानयनीं ॥ नेणेंतुझीकोणीतहानभूक ॥ ५ ॥ गेलासिजवळूनिज्यादिवसापासूनि ॥ नदिसेमाझेंकोणीआवडतें ॥ ६ ॥ धीरनधरवेपाहेंदाहीदिशा ॥ माझाविष्णुदास येईलकेंव्हां ॥ ७ ॥ पाहेंगरुडपारींपाहेंमहाद्वारीं ॥ पाहे भीमातिरींचंद्रभागे ॥८॥ पाहेंपद्मतीर्थींपाहेंवेणुनादीं॥ नलगेतुझीशुद्धिखंतीवाटे॥९॥अनुदिनींभोजनकरितांउदकपान॥ तेंव्हांआठवणहोयतुझी ॥१०॥ मीह्मणेधांवतयेसिनधरत ॥ प्रसादाचेंआर्तबहुतूज॥११॥धांवोनियांयेसीआलिंगनदेसी॥ पुसेनसांगसीसुखगोष्टी ॥१२॥ तेणेंहर्षेंनिघतीडोळ्यांसीयादोंदें ॥ हृदयमाझेंकोंदेकरुणारसें ॥ १३ ॥ आवडतेंआळुकेंजननीचेंबाळ ॥ जाणतेंकृपाळभूकत्याची ॥ १४ ॥ तैसा पंढरिनाथमोहेंतोवर्षला॥नामयातेंपाजिलाप्रेमपान्हा॥१५॥

ऐशीतेजेवणीब्रह्मरसाधणी॥पुरविलीआयणीनिजभक्ताची॥१॥ नामयाचेंउच्छिष्टस्वीकारिलेंदेवें ॥ कौतुकअवघेंपहातीद्विज ॥ २ ॥ ह्मणतीआह्मांयेणेंकैसीकेलीमाव ॥ बुडविलेंसर्वक्रियाकर्म ॥३॥ नेणवेहाकोणादिसेसुलक्षण ॥ नोहे क्षत्रियब्राह्मणवैश्यशूद्र ॥४॥ चहूवर्णांवेगळीदिसेयाचीलीळा ॥ विस्मृतिसकळांपडलीकैसी ॥ ५ ॥ निर्धारेंनामयाचाहोयमायबाप ॥ सोडविलासंकल्पयाचेहातीं ॥ ६ ॥ का-

यावाचामनेंलोभयाचेवरी ॥ घातालेयाशिरींमंत्राक्षता ॥ ॥ ७ ॥ एकह्मणतीझालेंहोतेंतेंनिर्माण ॥ आतांआपुलेंआ- पणगोप्यकरा ॥ ८ ॥ लौकिकींहेमातप्रगटनकराह्मणी ॥ न बोलावेंकोणींकोणापाशीं ॥ ९ ॥ एकह्मणतीआतांयासीच वाळावें ॥ आपुलेंटाळावेंलोकनिंद्य ॥ १० ॥ अज्ञानासीदो- षनाहींप्रत्यवाय ॥ शास्त्रींहाउपायसिद्धअसे ॥११॥ आत्म- शुद्धिलागींकराविचारणा ॥ करामंत्रस्नानात्रिपदाजप ॥ ॥ १२ ॥ ह्मणोनिसत्वरचालिलेअघवे ॥ प्रार्थूनियादेवेंबो- लाविले ॥ १३ ॥ संकुचितमनदिसतांकवण्यागुणें ॥ को- माइलींवदनेंसकळिकांचीं ॥ १४ ॥ कायशंकावाटेतुमच्या मनींस्वामी ॥ तेंकृपाकरोनितुम्हीसांगामज॥१५॥मनाचेम- वाळतुह्मीब्रह्मबीज ॥ गोप्यनयेगूजकरूंकांहीं ॥ १६ ॥ मी तुह्मासर्वांचेंअसेंकृपापात्र ॥ सांगाजिवींचेंआतेंकरीनपूर्ण ॥ ॥ १७ ॥ अर्पूनिदक्षिणासहिततुळसीदळ ॥ वरीत्यापुण्य- जलप्रक्षाळूनि ॥ १८ ॥ चरणांवरीनामाघालूनिनिरवी ॥ कृपाअसोंद्यावीयाजवरी ॥ १९ ॥ ॥ ॥ ३१ ॥

जातीचेंहेंशिंपीविश्वजाणेयातें ॥ प्रत्यक्षसांगातेंजेवावि- लें ॥ १ ॥ उच्छिष्टनिजमुखेंस्वीकारलेंयाचें ॥ उरलेंतुम्हां कैचेंक्रियाकर्म ॥ २ ॥ नकळेहानिर्धारुभ्रांतिवाटेआम्हां ॥ कायतुमचानामाअंगभूत ॥ ३ ॥ नवलआवडीलौकिकावे- गळी ॥ बुडविलेसमुळींसकळधर्म ॥ ४ ॥ कोण्यालोभेंतु- म्हांलावियेलाचाळा ॥ कृपेचाकोंवळानिरुपम ॥ ५ ॥ वि- चारितांतुह्मीआहांवेषधारी ॥ लीलाऔडंबरीदिसेतुमची ॥ ॥ ६ ॥ वर्णाश्रमधर्मनदिसेतुमच्याठायीं ॥ निर्धारूचिकां-

हींनकळेआम्हां ॥ ७ ॥ निंद्यवंद्यतुम्हानादिसेचिकोणी ॥दृ-
ष्टिदुजेपणींनपडेतुमची ॥८॥ विश्वआपरूपदिसेतुह्मासर्व ॥
नेणवेहेभावब्रह्मादिकां ॥ ९ ॥ आम्हींविश्वासलोंवरवेषेंतु-
मच्या ॥ भावअंतरींचानकळेकांहीं ॥ १० ॥ आपुलेंस्व-
हितदेखोनिआपण ॥ पापअथवापुण्यविचारावें ॥ ११ ॥
सर्वभावेंकरूनिविधीतेंपाळावें ॥ सत्यसंभाळावेंवेदवचन ॥
॥ १२ ॥ वर्णाश्रमपरत्वेंबोलिलेजेधर्म ॥ तेंतेंविहितकर्मआ-
चरावें ॥ १३ ॥ स्वामीचेंवचनस्वामींनींकरावें ॥ यशतेंमि-
रवावेंउभयलोकीं ॥ १४ ॥ तरीहातुमचाजिवलगनामा ॥
निर्धारितांआम्हांकळोंआलें ॥ १५ ॥ ॥ ॥ ३२ ॥

नामयातेंआम्हींजेवविलेंसांगातें ॥ हादोषआम्हांतेंठेवा
ह्मणीं ॥१॥ सर्वत्रचाळकएकचिचैतन्य ॥ वंद्यनिंद्यकोणह्म-
णेस्वामी ॥ २ ॥ पुण्यपापबाधाआह्मांनाहींकदां ॥ असों
शुद्धबुद्धानिरंतर ॥ ३ ॥ देहह्मणालजरीओंडंबरपापाचें ॥
अंबरींआभासाचेंअभ्रजेवीं ॥ ४ ॥ नामाऐसेंनामकवणीये
अवयवा ॥ सांगातुह्मीदेवासाचकरूनि ॥ ५ ॥ तरीतें
जीवनींगगनींकींपवनीं ॥ कायदोषधरणीमाजींहोता ॥ ६ ॥
तोतुह्मांगोचरूझालाकवणेव्यक्ती ॥ हेखूणनिरुतीसांगामज
॥ ७ ॥ तुह्मीवेदवक्तेसर्वशास्त्रद्रष्टे ॥ नाहींआत्मनिष्ठेपा-
वलेती ॥ ८ ॥ भेदभ्रमतुमचानाहींमावळला ॥ श्रमचीउ-
रलासंदेहासी ॥ ९ ॥ जेवेळींसंकल्पसोडिलापैंयेणें ॥ तुह्मीं
आपोषणेंघेतलींकैसीं ॥ १० ॥ तवेळींहेनाहींकेलीविचार-
णा ॥ अधिकारअन्नाआहेकींनाहीं ॥ ११ ॥ याचिलागींतु-
ह्मांप्रार्थूनिखुणासांगें ॥ नामयाच्यासंगेंघडलीसेवा ॥१२॥

वांनीं ॥ पूजितातीसुमनींसमाधीसी ॥ ५ ॥ नामाम्हणे अवघेकराप्रदक्षिणा ॥ चलाआचमनांपुष्करणीसी ॥६॥२१॥

पांचादिवसउत्सवकेलानिवृत्तीसी ॥ कालाआमावास्ये- सींत्र्यंबकेश्वरीं ॥ १ ॥ प्रतिपदेसीहरिनिघालेबाहेरी ॥ कीर्तनगजरींपुढेंहोत ॥ २ ॥ कांहींऋषीश्वरराहियेलतेथें ॥ गेलेबहुततेअलकापुरा ॥ ३ ॥ गरुडावरीसिद्धझालेना- रायण ॥ चाललींविमानेंगंधर्वांचीं ॥ ४ ॥ नामाम्हणेदेवा जावेंआषाढीसी ॥ आलेएकादशीपंढरीये ॥ ५ ॥ २२ ॥

जयजयकारेंटाळीपिटितीसकळी ॥ चाललीमंडळीवैष्ण- वांची ॥ १ ॥ पंढरीचापोहानिघालाबाहेरी ॥ कीर्तनगजरीं पुढेंहोत ॥२॥ विठोबारखुमाईबैसलेगरुडावर ॥ केलानम- स्कारवैष्णवांनीं ॥३॥ म्हणेतीर्थयात्राझालीयथासांग ॥ पा- हिलेप्रसंगसमाधींचे ॥४॥ गेलेयोगीराजअनादिजेआदी ॥ राहिल्यासमाधिजगामाजीं ॥ ५ ॥ नामाम्हणेदेवागेलेमुनि- जन ॥ राहिलेंतेंज्ञानजगामाजीं ॥ ६ ॥ ॥ २३ ॥

गेलेदिगंबरईश्वरविभूती ॥ राहिल्यात्याकीर्तिजगामा- जीं ॥ १ ॥ वैराग्याच्यागोष्टीऐकिजेतकानीं ॥ आतांऐ- सेंकोणीहोणारनाहीं ॥ २ ॥ सांगतीलज्ञानम्हणतीलखूण॥ नयेचिसाधननिवृत्तीचें ॥ ३ ॥ परब्रह्मडोळांदावूंऐसेंम्हण- ती ॥ कोणानयेयुक्तिज्ञानोबाची ॥ ४ ॥ करतीलअर्थसांग- तीलपरमार्थ ॥ नयेपांएकांतसोपानाचा ॥ ५ ॥ नामाम्ह- णेदेवासांगूनियाकांहीं ॥ नयेमुक्ताबाईगुह्यतुझें ॥ ६ ॥२४॥

नानापरिछंदआठवितीमना ॥ आतांनारायणासिद्धी न्यावे ॥ १ ॥ समाधीसीकेलीआरतीपंचारती ॥ राहिली

निवृत्तिस्वरूपींतुझ्या ॥ २ ॥ सुखाचेंसाधनझालेंचौघेज-णें ॥ केलीनारायणेंबोळवण ॥ ३ ॥ पंचक्रोशावरीउभेठेले भार ॥ केलानमस्कारसमाधीसी ॥ ४ ॥ नामाम्हणेआतां जावेंपंढरपुरा ॥ समाधींचासाराविधिझाला ॥ ५ ॥ ॥२५॥

शेवटचीसमाधिझालीजैशीतैशी ॥ तुजहृषीकेशीसम-र्पिली ॥ १ ॥ आपुल्यासत्ताबळेंचालविलेंहरि ॥ विष्णुदा-सावरीकृपाकेली ॥ २ ॥ नेणोकैसाहोईलसमाधीचाप्रसंग॥ बोलिलांतअंगेंपांडुरंगा ॥ ३ ॥ मुकियालावाचादिधलीश्री-रंगें ॥ इच्छिलाप्रसंगसिद्धिनेला ॥ ४ ॥ नामाम्हणेदेवामा-यबापविठ्ठल ॥ म्हणोनिमाझेबोलस्वीकारिले ॥ ५ ॥ ॥२६॥

---

अथ नामदेवकृत

# रामजन्माचे अभंग.

श्रीगणेशायनमः ॥ कुळगुरुवसिष्ठसांगेनृपवरा ॥ अस-तीगरोदराकांतातुझ्या ॥ १ ॥ धर्मशास्त्रसांगेडोहळेपुसावे ॥ त्यांचेपुरवावेमनोरथ ॥ २ ॥ ऐकोनीयांऐसेंआनंदमानसीं ॥ कैकईसदनासीजाताझाला ॥ ३ ॥ मंचकींबैसलीहोतीते पापिणी ॥ देखतांनयनींपहूडली ॥ ४ ॥ सुंदरपणाचाअ-भिमानमनीं ॥ त्यावरीगर्भिणीनामाह्मणे ॥ ५ ॥ ॥ १ ॥

राजाम्हणेइच्छातुझीयेमानसीं ॥ डोहळेमजसींसांग आतां ॥ १ ॥ येरीम्हणेऐसेंवाटतसेजीवें ॥ कनिष्ठासीद्यावें राज्यपद ॥ २ ॥ ज्येष्ठासीधाडावेंदूरीदिगंतरा ॥ नयेस-माचारत्याचाआम्हां ॥ ३ ॥ जनांतहेंनिंद्यवेदबाह्यकर्म ॥

करितांअधर्मपापबहू ॥ ४ ॥ माझीयेमस्तकींठेवावाहादोष ॥ तुम्हांकडेलेशनाहींनाहीं ॥ ५ ॥ निंदितीलजनहोयमज सुख ॥ ऐकतांचिदुःखरायाझालें ॥ ६ ॥ वृश्चिकाचेपेंवींत-क्षकपडत ॥ घालीत.हेंघृतअग्निमुखीं ॥ ७ ॥ ऐसीव्यथा होयनामाम्हणेत्यासी ॥ उठिलात्वरेंसितेथूनियां ॥ ८ ॥ ॥ २ ॥

येतसेदशरथसुमित्रामंदिरीं ॥ देखतांसामोरीयेतीझा-ली ॥ १ ॥ नमायेआनंदतियेचेमानसीं ॥ ठेवीमस्तकासी चरणावरी ॥ २ ॥ घालोनीआसनप्रक्षाळीचरण ॥ सर्वांगीं लेपनतीर्थोदकें ॥ ३ ॥ गंधधूपदीपपुष्पांचीयामाळा ॥ अ-र्पुनीतांबुलाउभीराहे ॥ ४ ॥ कैकयीचेंदुःखविसरलाराव ॥ पाहोनीयांभावसुमित्रेचा ॥ ५ ॥ होतीजेडोहळेतुझीयेमा-नसीं ॥ सांगमजपासींपतिव्रते ॥ ६ ॥ प्राणनाथाऐसीइ-च्छाआहेजीवा ॥ वडिलांचीसेवाअहर्निशीं ॥ ७ ॥ आवडे हेंएकनावडेआणिक ॥ द्यावेंमजएकहेंचिआतां ॥ ८ ॥ ऐ-कतांचिऐसेंकांतेचेंवचन ॥ आनंदेंनिमग्नमनहोय ॥ ९ ॥ घेउनीयांहातींरत्नाचेंभूषण ॥ टाकीओंवाळूननामा ह्मणे ॥ १० ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३ ॥

दशरथराजाउठिलातेथुनी ॥ कौसल्येचेसदनींजाता झाला ॥ १ ॥ पाहातसेदृष्टींतेव्हांश्रावणारी ॥ नमायेअंत-रींतेजातिचें ॥ २ ॥ तुझीयेमानसींहोतीजेडोहळे ॥ सांगवो वेल्हाळेमजपाशीं ॥ ३ ॥ उदरांतअसेभक्तांचाकैवारी ॥ तेथें कैंचीउरीदेहभावा ॥ ४ ॥ सदासमाधिस्थरामरूपझाली ॥ कौसल्यामाउलीनामाह्मणे ॥ ५ ॥ ॥ ॥ ४ ॥

नबोलेचिकांहींइसीकायझालें ॥ भूतेंझडपिलेंनिश्चयेंसी

॥ १ ॥ माझीयेअदृष्टींनाहींहानंदन ॥ ह्मणोनियांविघ्नओ-
ढवलें ॥ २ ॥ निवारीहेंदुःखवैकुंठनायका ॥ रक्षींयाबाळका
सुदर्शनें ॥ ३ ॥ तुझामीकिंकरआजीअंबुजाक्षा ॥ द्यावी
मजभिक्षाहेचिआतां ॥ ४ ॥ नामाचाउच्चारऐकतांचिका-
नीं ॥ नेत्रउघडोनीपाहतीझाली ॥ ५ ॥ राजाह्मणेकांहो
ऐसीहेअवस्था ॥ कांहोभ्रमचित्ताझालाअसे ॥ ६ ॥ वि-
श्वाचामीआत्मास्वयेंअसेराम ॥ मजमाजींभ्रमकैंचाअसे
॥ ७ ॥ अवतारमहिमावानीवेदमाझा ॥ सुरवरांच्याका-
जानामाह्मणे ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ५ ॥

रावणानेंकेलेंलग्नामाजींविघ्न ॥ असेकींस्मरणतुजला-
गीं ॥१॥ आणीरेधनुष्यमारीनरावणा ॥ लंकाबिभीषणादे-
ईनमी ॥ २ ॥ अंगदसुग्रीवजांबुवंतवीरा ॥ हनुमंतपाचारा
लवकरी ॥ ३ ॥ टाकोनीपर्वतबूजवारेसागरा ॥ पायवाटक-
राजावयासि ॥ ४ ॥ लंकेपुढेंमोठेंमाजवीनरण ॥ तोडीनबं-
धनसुरवरांचें ॥ ५ ॥ विश्वामित्रयागनेईमीसिद्धी ॥ मारीन
कुबुद्धीदोघाजणां ॥ ६ ॥ खरदूषणांचाघेईनमीप्राण ॥ ध-
नुष्यमोडीनभुजाबळें ॥ ७ ॥ ध्यातीमजत्यांचीबहुतआव-
डी ॥ नविसंबेंघडीत्यासीएक ॥ ८ ॥ बोलिलावाल्मीकतै-
सेंचिकरीन ॥ वर्तोनीदावीननामाह्मणे ॥ ९ ॥ ॥ ६ ॥

परब्रह्मपूर्णआलेंमाझेघरीं ॥ नकळेअंतरींनृपाचिया ॥१॥
करीतीबडबडहोतीभूतचेष्टा ॥ पाचारावसिष्ठालवकरी ॥२॥
येउनीवासिष्ठपाहेकौसल्येसी ॥ नावरतीत्यासीअष्टभाव
॥ ३ ॥ राजाह्मणेकैसेंविपरीतझालें ॥ वसिष्ठाझडपिलेंमहा-
भूतें ॥ ४ ॥ श्रावणवधाचेंअघनाहींजळालें ॥ दुर्जेंहेंनिर्मि-

लेंप्रारब्धानें ॥ ५ ॥ एकतांचिहासेसावधहोउनी ॥ बोल-
तसेंझणीनामाम्हणे ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

विरंचीचाबापक्षीरसागरवासी ॥ ध्यातीयोगीत्यासीनिरंतर ॥ १ ॥ परेहुनीपरवैखरीहुनीदूरी ॥ कौसल्येउदरींतोचिअसे ॥ २ ॥ बोलियेलेंजेंजेंनव्हेअसत्यवाणी ॥ नयेऊंदेमनींशंकाकांहीं ॥ ३ ॥ माझेंहेंसंचितधन्यधन्यआतां ॥ पाहीनमींकांतालक्ष्मीच्या ॥ ४ ॥ धन्यधन्यधन्यअयोध्येचेलोक ॥ वैकुंठनायकपहातील ॥ ५ ॥ धन्यपशुपक्षीश्वापदेंतरुवर ॥ राजारघुवीरपहातील ॥ ६ ॥ त्रैलोक्यांतधन्यतूंचिएकनृपा ॥ नामयाच्याबापापहाशील ॥ ७ ॥ ८ ॥

उत्तमहाचैत्रमास ॥ ऋतुवसंताचादिवस ॥ १ ॥ शुक्लपक्षींहीनवमी ॥ उभेसुरवरव्योमीं ॥ २ ॥ माध्यान्हींसींदिनकर ॥ पळभरीहोयस्थिर ॥ ३ ॥ धन्यमीचात्रिभुवनीं ॥ माझेवंशींचक्रपाणी ॥ ४ ॥ सुशोभीतदाहीदिशा ॥ आनंदनारीनरईशा ॥ ५ ॥ नाहींकौसल्येसिभान ॥ गर्भीआलेनारायण ॥ ६ ॥ अयोनीसंभव ॥ प्रगटलाहाराघव॥ ७ ॥ नामाह्मणेडोळां ॥ पाहीनभुवनत्रयपाळा ॥ ८ ॥ ९ ॥

सुवर्णाचाशोभेमस्तकींमुगुट ॥ हिरेघनदाटतयावरी ॥१ विस्तीर्णकपाळव्यंकटाभ्रूकुटी ॥टिळकलल्लाटींकेशराचा॥२॥ कमळाकारनेत्रआकर्णशोभती ॥ कुंडलेंझळकतीकर्णीज्याच्या ॥ ३ ॥ सरळनासिकलावण्यमुखचंद्र ॥ हनुवटीसुंदरराघवाची ॥४॥ कंठाचाआकारकंबुग्रीवाऐसा ॥ हृदयावरीठसाद्विजपद ॥ ५ ॥ सुकुमारसुरेखजयाचेंउदर ॥ ब्रह्मांडेंअपारवसतीजेथें ॥ ६ ॥ नाभीकमळींचाब्रह्मानेणेअं-

त ॥ कडदोराशोभतकटींज्याच्या ॥ ७ ॥ दंडींपेट्याकरीं जडितमुद्रिका ॥ पिंवळानेटकापीतांबर ॥ ८ ॥ केंशराची उटीसरळबाहुदंड ॥ चिमणाकोदंडहातींज्याच्या ॥ ९ ॥ गर्जतीनुपुरेंकोमळचरणीं ॥ वज्रांकुशचिन्हींविराजित ॥ १० ॥ कौस्तुभमुक्तमाळारुळेवैजयंती ॥ भ्रमरगुंजतीनामाह्मणे ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १० ॥

सांगतातीदाया ॥ तुह्मांपुत्रझालाराया ॥ १ ॥ ऐकतांचिऐसेंकानीं ॥ हर्षनसमायेमनीं ॥ २ ॥ उठाउठाहोत्वरें-शी ॥ पाचारावेंवसिष्ठासी ॥ ३ ॥ ब्राह्मणांसींतेपाचारा ॥ सांगासर्वनारीनरां ॥ ४ ॥ फोडाफोडारेभांडारें ॥ आणवागाईचींखिल्लारें ॥ ५ ॥ उभवाउभवारेगुढी ॥ सोडावस्त्रांचींगांठोडीं ॥ ६ ॥ झाडोनियांटाकाखडे ॥ घालाकेंशराचेसडे ॥ ७ ॥ नामाह्मणेभूमंडळा ॥ स्वामीमाझाआला आला ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ११ ॥

अनंतब्रह्मांडेंजयाचेउदरीं ॥ ध्यातसेत्रिपुरारिअहर्निशीं ॥ १ ॥ पाहातसेमुखदशरथत्याचें ॥ भाग्यमीतयाचें कायवर्णूं ॥ २ ॥ गंधपुष्पवस्त्रेंअर्पोनियांद्विजां ॥ समभावें पूजासकळांसीं ॥ ३ ॥ मास्त्ररेच्यागोण्याघालाहत्तीवरी ॥ धाडीघरोघरींनामाह्मणे ॥ ४ ॥ ॥ ॥ १२ ॥

तुतारेभोंवारेवाजंत्रेंवाजती ॥ अप्सरानाचतीथैथैकारें ॥ १ ॥ झणणझणणझांजागर्जताती ॥ नौबदावाजतीधोधोकारें ॥ २ ॥ सुरवरयेतीविमानाचीदाटी ॥ करितीपुष्पवृष्टिदेवावरी ॥ ३ ॥ नारदतुंबरकिन्नरगंधर्व ॥ व्योमींगातीसर्वसप्तस्वरीं ॥ ४ ॥ कीर्तनाचाघोषनामाचागजर ॥

मृदंगसुस्वरवाजताती ॥ ५ ॥ केंशरीगंधाचेटिळेलावीभा-
ळा ॥ घालीपुष्पमाळाद्विजकंठीं ॥ ६ ॥ घरोघरींराजाधाडी
रत्नराशी ॥ वस्त्रेंसुहृदांसींनामाह्मणे ॥ ७ ॥ ॥ १३ ॥

इति श्रीरामजन्म समाप्तः

---

अथ नामदेवकृत

# हनूमज्जन्माचे अभंग.

देवांगनांहातींआणविलाशृंगी ॥ यज्ञतोप्रसंगींआरंभि-
ला ॥ १ ॥ विमांडीकाक्रोधआलाअसेभारी ॥ अयोध्येभीत-
रींवेगींआला ॥ २ ॥ राजादशरथसामोराजाऊनी ॥
अतिप्रीतिकरुनींसभेनेला ॥ ३ ॥ पुत्रस्नुषादोन्हीदेखतां
नयनीं ॥ आनंदलामनींनामाह्मणे ॥ ४ ॥ ॥ १ ॥

आनंदोनीह्मणेरायाधन्यकेलें ॥ इच्छिलेसोहळेपुरवीन
॥ १ ॥ यज्ञाचाआरंभकरीलवलाह्या ॥ पुसोनीआचार्यांव-
सिष्ठासी ॥ २ ॥ सर्वऋषीजनामिळालेसकळ ॥ मंत्राचा
कल्लोळकरिताती ॥ ३ ॥ नामाह्मणेशृंगीमुख्यत्वेंशोभला ॥
यज्ञआरंभिलातेणेंतेव्हां ॥ ४ ॥ ॥ ॥ २ ॥

आरंभिलायज्ञसंतोषसर्वत्र ॥ आनंदेंनगरदुमदुमित
॥ १ ॥ यज्ञनारायणसंतोषपावला ॥ प्रत्यक्षतोआलाकुं-
डांतुनी ॥ २ ॥ पायसतेंपात्रघेऊनियाकरीं ॥ शृंगीसिझ-
डकरीबोलतसे ॥ ३ ॥ विलंबकरितांविघ्नवोडवेल ॥ सत्वर

वहिलाभागकरा ॥ ४ ॥ नामाह्मणेदेवयेईलपोटासी ॥ ऐसें गुजत्यासीअग्निसांगे ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥३॥

विभागसत्वरवासिष्ठानेंकेले ॥ रायाबोलाविलेंसंन्निधचि ॥ १ ॥ प्रथमतोभागकौसल्येसीदिला ॥ तेणेंक्रोधआलाकनिष्ठेसी ॥२॥ येतांचितोक्रोधविघ्नवोढवलें ॥ मुखींझडपिलें पिंडघारीं ॥ ३ ॥ असुडोनिपिंडघारीनेंपैंनेला ॥ नामाह्मणेघातिलाअंजनीकरीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥४॥

ऋषिमुखपर्वतींध्यानस्थअंजनी ॥ सांगतसेकानींखूण वायु ॥ १ ॥ तंवकरींपिंडपडतांचिसत्वर ॥ भक्षीकांनिर्धार स्मरणमात्रें ॥ २ ॥ शिवस्मरणेंपिंडप्राशनपैंकेला ॥ जन्मासीतोआलाबाळियारुद्र ॥ ३ ॥ नामाह्मणेजन्मपावतांचिवाळ ॥ झालाअसेकाळरविमंडळा ॥ ४ ॥ ॥ ५ ॥

पिंडघारीनेंझडपिला ॥ अंजनीनेंतोसेविला ॥ १ ॥ अंजनीच्यातपासाठीं ॥ महारुद्रआलेपोटीं ॥ २ ॥ चैत्र शुद्धपौर्णिमेसी ॥ सूर्योदयसमयासी ॥ ३ ॥ महारुद्रप्रगटले ॥ नामाह्मणेम्यांवंदिले ॥ ४ ॥ ॥ ॥ ६ ॥

समाप्त.

---

अथ नामदेवकृत

# चोवीस नावांचे अभंग.

॥केशव॥येईगेकेशवेमजतुझीसवे॥ तुजवीणनुगवेदिनुमा-

ये॥ ३ ॥तूंमायजननीकांसवीकौशल्या ॥ दिनबहुसालमजपावे ॥२॥नमागेंकेवळविषयाचेंटवाळ ॥ तूंमाझीकृपाळविठ्ठलमाय ॥३॥बोळलीगगनींकेशवकामधेनु ॥ लवतालोचनस्फुरेबाह्य ॥४॥वाजवीलवाद्यगोपाळांचीमांदी॥ आल्हादगोविंदींनित्य माझा ॥ ५ ॥ नामाह्मणेकेशवयेईकामधेनु ॥ तेणेंमाझीतनु तृप्तसदा ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १ ॥

॥नारायण॥येईगेनारायणीअमृतसंजीवनी॥चिंतितांनिर्वाणींपावेवेगीं॥१॥ तूंमाझेंजीवननामनारायण ॥ नित्यअनुष्ठानतुझ्यानामें ॥२॥ बाह्यअभ्यंतरींतूंचिसर्वांठायीं ॥ तुजविणसृष्टीशून्यदिसे ॥ ३ ॥ चालल्वलाहीकृपाळुतूंमाये ॥ मजहेंनसाहेमोहजंजाळ ॥ ४ ॥ तुटलविरडेंसुटतीलगांठी ॥ जंवतूंजगजेठीनयेमाय ॥ ५ ॥ नामाह्मणेधन्यतुझेंनामसाचें ॥ उच्चारितांवाचेंनिवतीअंगे ॥ ६ ॥ ॥ २ ॥

॥माधव॥येईगेमाधवेपाजीप्रेमपान्हा॥विषयांचाआंदणानकोकरूं ॥१॥ धांवतूंमधुकरेमाधवेउदारे॥येईतूंसोयरेजननीये ॥ २ ॥ कष्टलोंमीभारीशीणदूरकरी ॥ येईतूंझडकरी माधवेवो ॥ ३ ॥ अनंतवोनामेंपुराणेंपढती ॥ पावसीआकांतींविठ्ठलेवो ॥ ४ ॥ नामाह्मणेलाहोकरावामाधवे ॥ ४ ॥ माझेंनिवोजीवेंलाहेचाड ॥ ५ ॥ ॥ ॥ ३ ॥

॥गोविंद॥येइतुगोविंदेनामामृतधारी॥नित्यहेंउच्चारीगोविंदतें॥१॥गोविंदगोविंदनित्यहाचिछंद॥पावतूंह्रदआदिरूपें॥२॥गोविंदहोध्यानेंनिवतीअष्टांगें॥गोविंदेवेगेंयेवेषधरूं॥३॥ गोविंदगोपाळमुकुंदकेसरी ॥ येईतूंलवकरीसांवळीये ॥ ४ ॥ गोविंदहेंनामजनींवनींदिसे ॥ प्रत्यक्षतेंठसेपंढरीसी ॥ ५ ॥

वेणुनादींकालागोविंदेंपैंकेला ॥ धांवताचिआलापेंद्यापाशीं ॥ ६ ॥ तीहीचवोमायेउभीबाळमूर्ति ॥ नामजेंजपतीपांडुरंग ॥ ७ ॥ नामाह्मणेपांगगोविंदहादवडी ॥ वेगेंलवडसवडीकरीमाये ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ४ ॥

॥विष्णु॥विष्णुविष्णुहरिपावेलवकरी॥ब्रिदचराचरींसांगेमुनीं ॥१॥ वैकुंठवासिनीकृष्णाविष्णुदेव ॥नामाचेंगौरवआह्मालागीं ॥ २ ॥ धन्यहाचिदिनुविष्णुमायपावे ॥ गगनीं उगवेसूर्यजैसा ॥ ३ ॥ आदिब्रह्माहरिविष्णुकृष्णगंगा ॥ भागीरथीपैंगापदींपावे ॥ ४ ॥ गयातेप्रयागकाशीतेंसवांग ॥ विश्वेश्वरलिंगचराचर ॥ ५ ॥ विष्णुगदाधरविष्णुनामपाठ ॥ उच्चारितांवाटवैकुंठींची ॥ ६ ॥ नामाह्मणेविष्णुभागीरथीमाजी ॥ पंढरीयेमाझीविठ्ठलमाय ॥७॥ ॥५॥

॥मधुसूदन॥येईंतूंमधुकरेमदनसुंदरे॥मजगेनधरेप्रेमपोटीं ॥१॥तूंमाझीजननीमधुसूदनगाय ॥ कामधेनुहोयकांसवीची ॥२॥आनंदनिजघनेजुनाटमधुसूदने ॥ शुकस्तनपानेपाजिपान्हा ॥ ३ ॥ केशवकांसवीपदरानगाय ॥ आत्मारामहोय निःसंदेह ॥ ४ ॥ विठ्ठलमुकुंदेस्वरूपेंगोमटी ॥ आकांतलीसृष्टिमधुसूदने ॥ ५ ॥ शंखचक्रांकितआयुधेंमंडित ॥ मुकुटशोभततुझ्याशिरीं ॥ ६॥ भक्तवरदायिनीमधुसूदनगंगा ॥ धांवेंतूंवोवेगाकामधेनु ॥ ७ ॥ नामाह्मणेमायेमधुसूदनगाय ॥ तेंसंजीवनीहोयआह्मालागीं ॥ ८ ॥ ॥ ६ ॥

॥त्रिविक्रम॥येईंवोत्रिविक्रमेपूर्णपान्हादेईं ॥ कामधेनुहोईंविठ्ठलराजे॥१॥त्रिविक्रमधरेयेईंतूंसावळे॥ मुकुंदगोपाळेकेशवेगे ॥ २ ॥ तूंमाझेंनिजधनात्रिविक्रमधरे ॥ गंगानाममात्रें

भंगीपाप ॥ ३ ॥ त्रिपदागायत्रीत्रिविक्रमसुखें ॥ जनाचींवो दुःखेंहरतीनामें ॥ ४ ॥ त्रिजटात्रिफणीभागीरथीवेणी ॥ प्रयागवोधुणीपापजाळी ॥ ५ ॥ त्रिस्थळींत्रिमायेत्रिविक्रम होय ॥ विश्वेश्वरदोहेतारकब्रह्म ॥ ६ ॥ काशिकांतिमाये अयोध्याद्वारका ॥ मथुराअवंतिकातूंत्रिमाये ॥ ७ ॥ नामा ह्मणेमाझीत्रिविक्रमगाय ॥ भक्तीसीपान्हायेपंढरपुरीं॥८॥७॥

॥वामन॥येईवोवामनेखुजियेखुजटे॥ पंढरीचेपेठेउभीराहे ॥१॥येईवोडोळसेसांवळेतेजसे ॥ वामनेवहुवसेब्रह्मचारी॥२॥ अनंतविद्वदेअनंतअपार ॥ कैवल्यवोसरेपदकमळीं ॥ ३ ॥ तुझेंनामधन्यवामनसाजिरें ॥ रूपहेंगोजिरेंबळिच्याद्वारीं ॥ ४ ॥ तुझ्याचरणतीर्थेंउद्धरतीसर्व ॥ येईंतूंसत्वरवामनाई ॥ ५ ॥ नामाह्मणेपावेवामनब्रह्मांडे ॥ स्वरूपवितंडेब्रह्म-चारे ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ८ ॥

॥श्रीधर॥येइंवोश्रीधरेसर्वरूपसारे॥कैवल्यउत्तरेअभिनव ॥१॥श्रीधरश्रीरंगेनामपांडुरंगे ॥ प्रगटवोसांगेपूर्णधन ॥२॥ श्रीकरेश्रीधरेशोभातेसाचारे ॥ चक्रांकितकरेशंखतुझा ॥३॥ सुंदरश्यामळनामहेंअढळ ॥ मुखींहोवेल्हाळहस्ततुझे ॥४॥ प्रकाशेहापूर्णश्रीधरेपैंजाण ॥ सांगितलीखूणखेचरानें ॥ ५ ॥ नामाह्मणेमाताश्रीधरउच्चारू ॥ तरेनसाचारूतिहीं लोकीं ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ९ ॥

॥हृषीकेशी॥येईहृषीकेशीदिव्यरूपादिसे॥मनहेंउल्हासे-भेटीलागीं॥१॥हृषीकेशीनामेंतरलेसंभ्रमें॥नित्यरामनामेभव-सिंधु ॥ २ ॥ आराधनेंधनऋषीसीसंपूर्ण ॥ नामकोटीयज्ञ जालेतया ॥ ३ ॥ पावनहृषीकेशीहेंचिध्यानमन ॥ नामस-

नातनहृषीकेशी ॥ ४ ॥ विश्वाकरीकळाविश्वाजनलीळा ॥ त्राहेवेळोवेळाहृषीकेशी ॥५॥ नामाह्मणेमाययेईहृषीकेश ॥ जालोंकासावीसतूजवीणें ॥ ६ ॥ ॥ ॥ १० ॥

॥पद्मनाभ॥येईवोपद्मनाभेपंकजलोचने॥विश्वपुर्णघनेदे-खेतुज॥१॥त्राहेपद्मनाभावाचासिद्धपावे ॥ मजहेंनुगवेमाया-जाळ ॥ २ ॥ पद्मांकितरेखापद्महेंसुरेख ॥ पाववोनिमिष्य एकमाय ॥ ३ विचरेहेपृथ्वीनामपद्मनाभ ॥ स्वयंभावोविं-बविठ्ठलेंशी ॥ ४ ॥ रिकामामीनसेंदिननिशींनिमिष्य ॥ प-द्मनाभसाक्षहृदयींभोगी ॥ ५ ॥ नामाह्मणेपद्मनाभहेंहोना-म ॥ जपतुझेंप्रेमदेईमज ॥ ६ ॥ ॥ ॥ ११ ॥

॥दामोदर॥ येईवोदामोदरेपवित्रहेकरे॥मनाहोनावरेप्रेम-लोट॥१॥पाहेकृपादृष्टीसाहेजगजेठी ॥ पूर्णपान्हाघोटीऐसेंकं-री॥२॥दामोदरनाममदनपरीकरे ॥ हाचिवोविचारेमनेंकेला ॥३॥येईतूंनिर्धारेंपावेंतूंझडकरी॥ येईवोलवकरीदामोदरे॥४॥ दामोदरमातापाहेवोसमता ॥ पाववोनिवांतापावेवेगीं ॥५॥ नामाह्मणेलोटुंप्रेमामृतनिवटूं ॥ नामेंचवैकुंठूदामोदरा॥६॥१२

संकर्षण॥येईतूंकृपाळेसंकर्षणमाते ॥पवित्रपूर्णभरितेगुण निधी॥१॥त्राहेत्राहेवेगींपावेवोझडकरीं ॥ ब्रीदचराचरींवर्णि-ताति ॥ २ ॥ संकर्षणगंगासर्वांगींतूअसे ॥ जनिंवनिंदीसे रूपतुझें ॥ ३ ॥ कटावरिकटसांवळीसुंदर ॥ मनाचाविचार इच्याचरणीं ॥ ४ ॥ निर्धारूसांगतांनमायेवोघेतां ॥ संक-र्षणमातापावेवेगीं ॥ ५ ॥ विष्णुसंकर्षणनामहेंगहन ॥ प-तितपावनचरणरजें ॥ ६ ॥ नामाह्मणेमायसंकर्षणगाय ॥ हरिदासापान्हावेपंढरीसी ॥ ७ ॥ ॥ ॥ १३ ॥

॥वासुदेव ॥येईं तूं शारंगे वासुदेवे त्वरें ॥ वासुदेवे वोसारे गोपाळावे ॥१॥ त्राहे वासुदेवा पावे झडकरी॥त्वरें वेगू करी आर्त भेटी ॥ २ ॥ वासुदेव नामें साधन सुगम ॥ योगियां विश्राम स्थान झालें ॥ ३ ॥ द्वादश अक्षर जपिन्नला धुरू ॥ तयासि साचारू अढळ पद ॥ ४ ॥ वळी भीष्मदेवीं वासुदेवीं भाव ॥ रोहिणीची माव ऐसें झालें ॥५॥ नामा ह्मणे भक्त वासुदेवीं रत ॥ सायोज्य पावत येक्या नामें ॥ ६ ॥ ॥ ॥ १४ ॥

प्रद्युम्न॥येईं तूं प्रद्युम्ने ध्यान तूं धारणे ॥ माझी येक कल्पने निर्धारूस॥१॥त्राहे झडकरी पावे वोलव करी ॥प्रद्युम्न फुप्कारी वेळोंवेळां॥२॥ सांवळे सुंदर वेणु वाहे करें ॥ ध्यान हें सुंदरें यमुनातटीं ॥ ३ ॥ प्रवाह प्रद्युम्ने नाम घोष दाट ॥ जिंकिले जुनाट पापराशी ॥ ४ नामा ह्मणे नाम धन्य हें प्रद्युम्न ॥ होईन संपन्न नाम घेतां ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १५ ॥

॥अनिरुद्ध॥येईं वो अनिरुद्धे सांवळे प्रबुद्धे॥विराटे गोविंदे पावे वेगीं ॥१॥ त्राहे माउली येमना तुझी सोय ॥ चुकती अपाय नाम घेतां ॥२ ॥ अनिरुद्ध पाठें जाईन वैकुंठे ॥ पुंडलिक पेठे उभा असे ॥ ३ ॥ कटावरी कर सांवळी सुंदर ॥ मनाचा विचार इच्याचरणीं ॥ ४ ॥ अनिरुद्ध सार अनु नाहीं आधार ॥ सर्वही विचार अनिरुद्धे ॥५॥ नामा ह्मणे येईं अनिरुद्धे माये ॥ आणिक उपाय न लगे मज ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ १६ ॥

॥पुरुषोत्तम॥येईं तूं पुरुषोत्तमे संजीवनी रामे ॥ योगियां विश्रामे पुरुषश्रेष्ठे ॥१॥ त्राहे मना धर्म नाम पुरुषोत्तम ॥ साधन आगम ऐसी माये॥२॥ येईं वो सांभाळी लवला हें मन ॥ जुनाट होजुने पुरुषोत्तमे ॥३॥ तुझें नाम धन्य पुरुष हें सौजन्य ॥ द्वैत हें

अभिन्नअद्वैतहें ॥ ४ ॥ येकाक्षरीनामपुरुषचिसम ॥ नामआत्मरामपुरुषोत्तम ॥ ५ ॥ नामाह्मणेपावेपुरुषोत्तममाते ॥ सर्वत्रअद्वैतेएकरूपे ॥ ६ ॥ ॥ ॥ १७ ॥

॥अधोक्षज॥ येईंवोअधोक्षजेवैकुंठविराजे ॥ नामगेसहजे अमृतराशी ॥१॥ अधोक्षजनामेंघालीनगोंधळ ॥ रितायेक पळजाऊंनेदी॥२॥ अधररंगींवअधोर्धसोशीन ॥ सर्वत्रपाहीनअधोक्षज॥३॥अरिष्टहेंनिरसीमायेअधोक्षजे ॥ ऐशीयापाविजेसंकटींत्वां ॥ ४ ॥ अरीहेंमर्दनअधोक्षजजाणे ॥ स्वींकारावेंपूर्णप्रगटतां ॥ ५ ॥ नामाह्मणेधांवेअधोक्षजेपावे ॥ दिशादमभावेतुजमग ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ १८ ॥

॥नरसिंह॥येईवोकेसरीनरसिंहउच्चारी॥ पवित्रसाचारी तिहींलोकीं॥१॥नरसिंहवामनप्रल्हादरक्षण ॥ आमुचेंतेंधन नामतुझें ॥ २ ॥ शंखचक्रकरींपावेवोलवकरीं ॥ येईंतूंकेसरीलवलाहें ॥ ३ ॥ नरसिंहहेंनामनरसिंहहेंप्रेम ॥ उत्तमाउत्तमतिन्हीलोकीं ॥ ४ ॥ त्रिपुररक्षकदानवमर्दन ॥ विकटवदनपंचाक्षरी ॥ ५ ॥ नामाह्मणेहरिनामनरकेसरी ॥ नरसिंहउच्चारींतरतीजीव ॥ ६ ॥ ॥ ॥ १९ ॥

॥अच्युत॥येईवोअच्युतेनामामृतरसे ॥ सुंदरडोळसेजान्हवीये॥१॥अमृताचीखोटीअच्युतनामपेटी॥पावेवोजगजेठी अच्युतसार ॥२॥अच्युतअच्युतनामहेंचिसत्य॥हेंपीयूषत्वरितउच्चारितां ॥३॥ वैकुंठींचीमूर्तिअच्युतनामपाठें ॥ प्रत्यक्षवोभेटेविटेवरी ॥ ४ ॥ पुंडलीकदृष्टिनयनाचीभेटी ॥ निवारितांदृष्टीन्याहाळीतां ॥ ५ ॥ नामाह्मणेअच्युतनाम हेंचिआम्हां ॥ दिननिशींरामाजपतसों ॥ ६ ॥ ॥ २० ॥

॥जनार्दन॥येईंतूंजनार्दनेजनवनसंपन्ने ॥माझेवोचिद्‌वने पांडुरंगे ॥१॥ आहेजनार्दनेपूर्णानंदघने ॥ येईंवोसंपन्नेविश्वंभरे ॥२॥ नामहेंदुर्लभजनकजननी ॥ रामजनार्दनींविनटली ॥ ३ ॥ सांवळीडोळसरवियेकासनीं ॥ तेजप्रकाशनीहिरेयांची ॥ ४ ॥ जनींतेजननीनिकटतेजीवनीं ॥ जगप्रगटणीहरीयाची ॥ ५ ॥ नामाम्हणेजननामजनार्दन ॥ सनकादिकजाणसेवताती ॥ ६ ॥ ॥ ॥ २१ ॥

॥उपेंद्र॥येईंतूंउपेंद्रेवैकुंठसहींद्रे ॥ देवामाजीभद्रेसिंहासनीं॥१॥ आहेवोजननीशिणलोंगेमाये ॥ तुजविणआहेकवण मज॥२॥ तूंमाझेंकारुण्यप्रत्यक्षसौजन्य ॥ विचारितांप्रवीण प्रबुद्धहो ॥३॥ पाववोतूंवेगींउपेंद्रेगेमाते ॥ पुंडलीकसांगातें पंढरीसी ॥ ४ ॥ दीपकुळाविळादिनउगवला ॥ दीपकेंफळलापांडुरंग ॥ ५ ॥ नामाह्मणेनामउपेंद्रऐसेंशम ॥ पावेन विश्रामनामघेतां ॥ ६ ॥ ॥ ॥ २२ ॥

॥श्रीहरि ॥ येईंतूंहरिरूपेविठ्ठलस्वरूपे ॥ कळिकाळकांपे नामघेतां॥१॥नामेंहरीहरीआहेवोझडकरी ॥ शिणलोंमीभारीजननीये॥२॥ हरिनामधनसर्वजनार्दन ॥ हरिहेंआठवण जिव्हेसदा ॥ ३ ॥ हरीहरीम्हणतांहरीरूपसंता ॥ नामहें अनंताक्षरविलसे ॥ ४ ॥ येईंतूंहरीगंगेसांवळेसुरंगे ॥ हरि हरिसंगेंरतलोंसे ॥ ५ ॥ नामाम्हणेहरीपांडुरंगमाझा ॥ विठ्ठलहोभोजाराज्यधरूं ॥ ६ ॥ ॥ ॥ २३ ॥

॥कृष्ण॥येईंवोतूंकृष्णेहरीमाझियेतृष्णे॥ दिननिशींप्रश्णे वाटपाहे ॥१॥ आहेकृष्णगंगेसांवळेसारंगे ॥ नामस्मरणवेगें पुरेआम्हां ॥ २ ॥ रामकृष्णटाहोनामेंलवलाहो ॥ फिटला

संदेहोसंसाराचा ॥ ३ ॥ उद्धवअक्रूरयादवसादर ॥ कृष्णा तेअपारतयालागीं ॥ ४ ॥ अर्जुनद्रौपदीस्मरणगोविंदीं ॥ पावावेंनिजपदींनामाम्हणे ॥ ५ ॥ ॥ ॥ २४ ॥

चो० नां० अ० समाप्त.

---

अथ नामदेवकृत

# नामदेवाची आळ.

सद्गुरुसखयानाथापंढरीराया ॥ ठेवींडोईपायांकृपेसाठीं ॥ १ ॥ नाहींगांठींपुंजीतंवकृपेजोगी ॥ झालोंहतभागीभक्तिवीण ॥ २ ॥ हतभाग्याकैंचीसमर्थाचीभेटी ॥ घालींघट्ट मिठीसंतांपायीं ॥ ३ ॥ भक्तशिरोमणीज्ञानदेवनामा ॥ चरित्रमहिमागाऊंत्यांचा ॥ ४ ॥ इच्छीपरिमनज्ञानशक्तिक्षीण ॥ धरितोंचरणनाथजींचे ॥ ५ ॥ नामाह्मणेदेवापावमज आतां ॥ पुरवींमनोरथासर्वमाझ्या ॥ ६ ॥ ॥ १ ॥

अलंकापुरीसपांडुरंगगेले ॥ समाधिस्थकेलेंज्ञानदेवा ॥ १ ॥ उरकोनिसोहळासंगेंसंतमेळा ॥ विठोबाराहिलाअळंदीस ॥ २ ॥ पाहेचक्रपाणीनाम्याडोळ्यापाणी ॥ कंठतो दाटूनिउगाआहे ॥ ३ ॥ पुसेरुक्मिणीकांतकांरेतूंनिवांत ॥ नाम्याशोकाक्रांतकोण्यादुःखें ॥ ४ ॥ ॥ ॥ २ ॥

नामाह्मणेदेवाज्ञानदेवसृष्टीं ॥ पडेलकादृष्टींपुन्हांआतां ॥ १ ॥ ज्ञानाचावियोगजडलाहृद्रोग ॥ भेटीचाप्रयोगकरादेवा ॥ २ ॥ ज्ञानदेवमाझादाखवायावेळीं ॥ जीवत-

ळमळीत्याच्याविण ॥ ३ ॥ संतअंतरलासखाझालादूर ॥
आतांपंढरपूरकैसेंकंठूं ॥ ४ ॥ तुमचेंदर्शनज्ञानकृपादान ॥
पंढरीसयेणेंह्याचसाठीं ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ३ ॥

तरिचयेईनपंढरीस ॥ दृष्टींदेखेनज्ञानेश ॥ १ ॥ ज्ञानदेवाभेटीव्हावी ॥ ऐशीसोयदेवालावी ॥ २ ॥ ऐशियाच्याकृपादानें ॥ तुह्मांसंगतींनाचणें ॥ ३ ॥ पंढरीचेंजेंका सुख ॥ जाणेतोएकभाविक ॥ ४ ॥ ॥ ॥ ४ ॥

ज्ञानदेवपहावाडोळा ॥ ऐसेंवाटतेंविठ्ठला ॥ १ ॥ जगजेठीजगत्पाळ ॥ माझीपुरवावीआळ ॥ २ ॥ तुह्मांकाय अवघड ॥ लिळेंझेलागिरिगड ॥ ३ ॥ कल्पतरुतळींवास ॥ त्याघडेकाउपवास ॥ ४ ॥ माझ्याकृपाळुवादेवा ॥ हाकेसरसाघेशीधांवा ॥ ५ ॥ ॥ ॥ ५ ॥

ज्ञानदेवमाझेंसौख्यसरोवर ॥ त्यांतजलचरस्वस्थहोतों ॥ १ ॥ दुर्दैवतापानेंआटलेंतेंनीर ॥ वर्षारघुवीरकृपामेघ ॥ २ ॥ ज्ञानदेवावीणव्याकूळहेप्राण ॥ तूंजगज्जीवन देवाहोसी ॥ ३ ॥ विठाबाईतूंगजाणसीनाजाण ॥ रक्षी मजकोणदुजेंयेथें ॥ ४ ॥ ॥ ॥ ६ ॥

नामाहेंवदतांडोळ्याआलेंपाणी ॥ पडिलाधरणींदेवापुढें ॥ १ ॥ नामदेवास्थितिपाहूनश्रीपति ॥ विस्मिततेचित्तीं स्तब्धझाले ॥ २ ॥ कैशारीतींनाम्यासंबोखूंमीआतां ॥ कठिणअवस्थादेवह्मणे ॥ ३ ॥ प्रेमउचंबळेऐकतांहीआक ॥ बुजावीगोपाळनाम्यालागीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ७ ॥

देवह्मणेनाम्यापाहे ॥ ज्ञानदेवमीचआहें ॥ १ ॥ तो आणिमीनाहींदुजा ॥ ज्ञानदेवआत्मामाझा ॥ २ ॥ माझ्या

ठायींठेवीहेत ॥ सोडखंतखंडीद्वैत ॥ ३ ॥ नाम्याउमज मानसीं ॥ ऐसेंह्मणेहृषीकेशी ॥ ४ ॥ ॥ ॥८॥

ज्ञानदेवापुढेंकथा ॥ करीवारीलह्याव्यथा ॥ १ ॥ आत्मरूपींज्ञानेश्वर ॥ तोचिज्ञानाचासागर ॥ २ ॥ ज्ञानदेवीं धरीभाव ॥ स्वयेंहोयतूंचिदेव ॥ ३ ॥ रामकृष्णरेगोविंद ॥ जपह्मणेतोमुकुंद ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ९ ॥

प्रेमळतूंभक्तामाझ्यानामदेवा ॥ जीवीचाविसावाभक्ततूंचि ॥ १ ॥ तुमचेनिमाझेंदेवपणसत्य ॥ चंद्रेंपाझरतसोमकांत ॥ २ ॥ तुमचेभक्तीनेंआणिलेंरूपासी ॥ अवाच्य अविनाशीअरूपतें ॥ ३ ॥ पंढरीचाराणासांगतोह्याखुणा ॥ भक्तांच्याकारणायेणेंमज ॥ ४ ॥ ॥ १० ॥

नगजोतेंसोनेंलेण्याजोगेंहोतें ॥ मुदीकंकणतेंनामेंत्यांचीं ॥ १ ॥ मुशीमाजीजेव्हांगेलेंतेंविरोन ॥ झालेंसेसुवर्ण अभिन्नतें ॥ २ ॥ तैसाज्ञानदेवभक्ततोमीदेव ॥ लौकिकलाघवदासांसाठीं ॥ ३ ॥ ज्ञानसमाधीहेनाशीरूपनांवा ॥ अंतींचामिळावामजमाजीं ॥ ४ ॥ ॥ ॥ ११ ॥

तेजस्पर्शेंज्योतीकर्पुरींनिघाली ॥ दोन्हीतीनिमालीएकदांचि ॥ १ ॥ आघातानेंनादघंटेंतूनउठे ॥ शेवटींतोमिटेघंटेमाजीं ॥ २ ॥ ब्रह्मींमायास्फुरेचैतन्यप्रकाशें ॥ शेवटींतेंवसेब्रह्मरूपीं ॥ ३ ॥ पांडुरंगह्मणेएकनाम्याज्ञान ॥ वाटोसमाधानतुझ्याजीवा ॥ ४ ॥ ॥ ॥ १२ ॥

नामदेवम्हणेदेवा ॥ ब्रह्मज्ञानपोटींठेवा ॥ १ ॥ तुह्मीं मायेसंगेंगूढ ॥ ज्ञानजाणिवचेआड ॥ २ ॥ आम्हानाहीं याचीचाड ॥ वाटेसंतभेटीगोड ॥ ३ ॥ संतभेटीप्रेमफा-

वे ॥ प्रेमेंदेवासींभेटावें ॥ ४ ॥ प्रेमआहेपोटभरी ॥ देव त्यासींपोटींधरी ॥ ५ ॥ नामदेवाठायींप्रेम ॥ मागींआ-डविलेंब्रह्म ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥१३॥

देईभक्तिरसप्रेमा ॥ देवाघालीआह्माजन्मा ॥ १ ॥ प्रेम-येईहातांजरी ॥ जेथेंनांदूतींपंढरी ॥२॥ ज्ञानदेवींभेटव्हावी ॥ ज्ञानगोष्टकांसांगावी ॥३॥ नामानबुझवाजनीं ॥ कोणनाचेल कीर्तनीं ॥ ४ ॥ पुरवानामयाच्याआर्ता ॥ देवासांगेज-गन्माता ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १४ ॥

देवकळवळलेचित्तीं ॥ त्यासीमायेचीसंमती ॥ १ ॥ मायबापांचात्यालळा ॥ नामाघेईनाकांआळा ॥ २ ॥ बाप जगताचास्वामी ॥ आईप्रत्यक्षलक्षुमी ॥ ३ ॥ नामाथो-राचेंलेंकरूं ॥ छंदत्याचाअनिवारु ॥ ४ ॥ छंदनाम्याचा पुरविण्या ॥ देववेंचीप्रेमनाण्या ॥ ५ ॥ हटींउदमीभावी-क ॥ विठुराजात्याग्राहीक ॥ ६ ॥ ॥ ॥ १५ ॥

गरुडासीमगह्मणेपांडुरंग ॥ साकल्यहेंसांगपुंडलिका ॥ ॥ १ ॥ नामदेवकष्टीज्ञावदेवासाठीं ॥ घेऊनयातोभेटीना-मयाच्या ॥ २ ॥ संतप्रेमभेटीदेवगुजगोष्टी ॥ जाणत्या-च्यापोटींसर्ववसे ॥ ३ ॥ करीपांडुरंगयेईत्याच्यामना ॥ निमित्ताकारणेंभक्तशोधी ॥ ४ ॥ ॥ ॥ १६ ॥

एकतांनिरोपपुंडलिकभक्त ॥ झालासद्गदीतधन्यह्मणे ॥ ॥१॥ धन्यतीआळंदीधन्यविष्णुदास ॥ धन्यहादिवसदेवभेटे ॥ २ ॥ ज्ञानदेवाआलेंवैकुंठींचेंरूप ॥ पोंचतांनिरोपपुंड-लिका ॥ ३ पुंडलिकेंतेव्हांगरुडपूजिला ॥ ज्ञानाबैसवि-

लाविमानांत ॥ ४ ॥ पुढेंतोगरुडमागेंयेविमान ॥ रुक्मिणीदुरोनदावीदेवा ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ १७ ॥

आकाशींपुष्पकशुभ्रदंडदिसे ॥ बैसोनियेतसेज्ञानदेव ॥ ॥ १ ॥ शुद्धभावेंइच्छीज्ञानदेवभेटी ॥ येईउठाउठीभेटूंत्यासीं ॥ २ ॥ पहातीनवलभक्ततेप्रेमळ ॥ निश्चयानिढळ आहेत्यांचा ॥ ३ ॥ देवह्मणेनाम्याघेईभेटीसुखा ॥ ज्ञानदेवसखाउभायेथें ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ १८ ॥

ज्ञानदेवपाहतांडोळां ॥ नामदेवाहर्षझाला ॥ १ ॥ घट्टधरियेलेपाय ॥ तूंतोमाझासद्गुरुराय ॥ २ ॥ नकोकरूंरे अव्हेर ॥ मजधरूंनकोदूर ॥ ३ ॥ सदाआठवतमना ॥ तुझ्याभक्तीच्याकल्पना ॥ ४ ॥ ॥ ॥ १९ ॥

नाथानकोरेअंतरूं ॥ तुझ्याकासेचेंवांसरूं ॥ १ ॥ कळा दुभतीतूंगाय ॥ तुझावियोगअसह्य ॥ २ ॥ देहभोगितां प्राक्तन ॥ मनाठेवीतवाधीन ॥ ३ ॥ ज्ञानदेवहीसमाधी ॥ येथेंजडोमनोबुद्धि ॥ ४ ॥ नामाभेटेज्ञानदेवा ॥ जनाप्रसादमिळावा ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥२०॥

इति नामदेवाची आळ समाप्त.

~~इती इमानान्चीना~~
~~नामदेवकीर्तनकरीता वटीना~~ तेथे झाली ~~...~~
ईर्डीचनाका जीवनलीन्येद्रुमगाना तेथे झाली समासुरवानान्चीन २
~~...~~ टाकोनीत्वरगानीइंद्ररावन ३
तुकाम्हणेदेवनाले कीर्तनाचीना ०

अथ नामदेवकृत

# शिवरात्रीचे अभंग.

कैलासींचाशिवभोळाचक्रवर्ति ॥ पार्वतीचापतियोगिराज ॥ १ ॥ तयाचीयापाईंमाझेंदंडवत ॥ घडोआणिचित्त जडोनामीं ॥२॥ जटाजूटगंगाअर्धचंद्रभाळीं ॥ तिजानेत्रज्वाळींजातवेद॥३॥कंठींकाळकूटडाकाशूळहातीं ॥ सर्वांगींविभूतिसाजतसे ॥ ४ ॥ गळारुंडमाळाखापरहस्तकीं ॥ रामनाममुखींसर्वकाळ ॥ ५ ॥ गजचर्मधारीश्मशानींराहिला॥ संगेंभूतमेळाविराजित ॥ ६ ॥ नामाह्मणेनामेंनासोनीया पाप ॥ करीसुखरूपभक्तालागीं ॥ ७ ॥ ॥ ॥ १ ॥

डवरलागिरिकैलासींधवळा ॥ सिंहासनज्यालाधवळेंचि ॥ १ ॥ पाहतांपाहतांनिवतीलोचन ॥ भव्यज्याचेंध्यानयेकरूप ॥ २ ॥ धवळासर्वांगींदेवतोआपण ॥ लेईलेंभूषणतेंहितैसें ॥ ३ ॥ पर्वताचीबाळापार्वतीधवळी ॥ अर्धांगीं शोभलीऐक्यरूपें ॥ ४ ॥ सर्वांगींलाविलीविभूतिधवळी ॥ माळाविराजलीस्फटिकाची ॥ ५ ॥ पांढरियेजटेमध्येंगंगा श्वेत ॥ गळ्यांतशोभतश्वेतसर्प ॥६॥ शंखकपोलकानींकुंडलें धवळीं ॥ देखतांभूतळींदुजानाहीं ॥ ७ ॥ नामाह्मणेऐसें लागूनियाध्यान ॥ भाविकाचेंमनतोषवितो ॥८॥ ॥२॥

येकेदिनींरत्नसिंहासनावरी ॥ कैलासींत्रिपुरारीशोभतसे ॥ १ ॥ सांगोंजातांचारीवाचाविसावती ॥ तेथेंमाझी मतिकायसांगा ॥ २ ॥ वामभागींसाजेसुंदरीभवानी ॥

सिद्धऋषीमुनिकरितीसेवा ॥ ३ ॥ नारदतुंबरगर्जतीगायन ॥ करतेजोडूनउभेदेव ॥ ४ ॥ गणेशसन्मुखढाळीतचामरें ॥ रिद्धिसिद्धीदाररारखिताती ॥ ५ ॥ नामाचागजरमृदंगाचीघाई ॥ पहातनव्हाईब्रह्मादीक ॥ ६ ॥ नामाहाडपें करीदेतसेविडिया ॥ लागुनीयापायावारंवार ॥७॥ ॥ ३ ॥

तेव्हांप्रश्नकरीपार्वतीआदरें ॥ शिवाप्रतीकरजोडोनिया ॥ १ ॥ सांगावाजीस्वामीऐसाइतिहास ॥ गातांजोडे वासतुझेपायीं ॥ २ ॥ जाळोनियापापासुखाचीउपरती ॥ विश्वसुखीहोतीजेणेंयोगें ॥ ३ ॥ नामाह्मणेसुटेकाळासीदरारा ॥ विश्वासीयानरामुक्तिजोडे ॥ ४ ॥ ॥ ४ ॥

ऐकोनियावाणी ॥ संतोषलाशूलपाणी ॥ १ ॥ देविबरवेंपुसिलें ॥ तुझेबोलेंचित्तधालें ॥ २ ॥ बोलनव्हेतिसाचार ॥ जडजीवांचाउद्धार ॥ ३ ॥ बोलतुझेगोडावले ॥ जगासुदिनफावलें ॥ ४ ॥ शिवरात्रीचेंमहिमान ॥ नामाह्मणेऐकाजन ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५ ॥

ऐकासाधुजनकथाशिवरात्री ॥ पावनपवित्रीतिहीलोकीं ॥ १ ॥ भावधरूनियाआचरतीजरी ॥ वासशिवपुरींघडेल्यांसी ॥ २ ॥ उपवासआणिशिवाचेंपूजन ॥ रात्रींजागरणविधियुक्त ॥ ३ ॥ एकपसापाणीएकाबिल्वदळ ॥ पूजनकेवळ सोपेंबहु ॥ ४ ॥ नामाह्मणेकरानामाचागजर ॥ मुखींहरहरशब्दमात्रें ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ६ ॥

शिवऐसाशब्दकल्याणदायक ॥ जाणतीभाविकसाधुजन ॥ १ ॥ तारकहेंनामभोळ्याभाविकांसी ॥ नेणत्याजाणयांसीलाभयेक ॥२॥ उपमन्युबाळकदूधमागूंगेला ॥ क्षी-

राखिधंदिधलाउचितासी ॥ ३ ॥ दुष्टदुराचारीपातिततारिले ॥ नाहींआव्हेरिलेंदीनानाथें ॥४॥ नामाह्मणेशिवविष्णुएकरूप ॥ तारावयाअमुपअवतार ॥ ५ ॥ ॥ ७ ॥

भेदवादीजनावाटतसेभिन्न ॥ नव्हेतेंलक्षणभजनाचें ॥ ॥ १ ॥ विश्वींविश्वंभरकोंदलासेएक ॥ भेदाचेंकौतुककैसें सांगा ॥ २ ॥ ब्रह्मींनाहींठावयेकपणाचाही ॥ तेथेंदुजें कांहींसामावणें ॥ ३ ॥ आदीमध्यअंतींखेळोनियांखेळ ॥ उरलेंतेंनिखळअविनाश ॥ ४ ॥ हेमींजैसेकेलेतैसेहोती नग ॥ तरीतेअव्यंगसोनेपणें ॥ ५ ॥ केलीजैसीभक्तिशैवकांवैष्णव ॥ पाहतांतोदेवदुजानाहीं ॥ ६ ॥ शिव विष्णुदोन्हीयेकचिअवतार ॥ वेदांनींनिर्धारऐसाकेला ॥ ॥ ७ ॥ नामाह्मणेयेथेंदुजानकोभाव ॥ विष्णुतोचिशिवशिवाविष्णु ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ८ ॥

कांतिपुरींराजानामेसोमदत्ती ॥ तयाचीसंपत्तिनाहींपार ॥ १ ॥ पूर्वपुण्यफळलाधलेंतयासी ॥ देतांउपमेसीउणा शक्र ॥ २ ॥ पांचशततयाकामिनीसुंदरा ॥ करितांनाहींपुराझालाकाम ॥ ३ ॥ रिद्धीसिद्धीघरींकामारीहिंडती ॥ धैर्यशौर्यकीर्तिज्याचीजगीं ॥ ४ ॥ नामाह्मणेतेथेंउणेंकांहीं नाहीं ॥ ऐसेंअसुनाहानसुटेभोगी ॥ ५ ॥ ॥ ९ ॥

भोगाचीनव्हाळीनपुरेकोणेकाळीं ॥ वासनावोंगळीतेचि करी ॥ १ ॥ वासनेचीथोरीसांगवेनाकांहीं ॥ नसुटेजेकांहींकोण्हेकाळीं ॥ २ ॥ तारुण्याचेभरेंआवडीस्त्रियांची ॥ वृद्धपणेंतेंचिपुढेंहोय ॥ ३ ॥ ह्मणतसेपोरेंवांचतीलकैशीं ॥ हाचिअहर्निशींध्यासकरी ॥ ४ ॥ मेलियाहीपुढेंतेंचिउभें

राहे ॥ जन्मोजन्मींपाहेलागलेंसे ॥ ५ ॥ मृगाचीयेध्या-सेंभरतामृगपण ॥ जन्मल्यावांचूनसोडीनातें ॥ ६ ॥ नामाह्मणेजयाजैसीकांवासना ॥ जन्मकर्मजाणातैसें होय ॥ ७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ १० ॥

पांचशतांमाजींदोघीपतिव्रता ॥ ज्यापतिॠणीसर्वथा सकळही ॥ १ ॥ करुनीयांऐसीजातीनरकासी ॥ नाडि-लेंपतीसीत्यांचेपाईं ॥ २ ॥ करितीयेवेळेझांकितीलोच-न ॥ शेवटींवंधनयमाहातीं ॥ ३ ॥ नामाह्मणेवरेंनव्हेहेंको-णासी ॥ घडेलतयासीजाचवहु ॥ ४ ॥ ॥ ॥ ११ ॥

राष्ट्रकरीपापराजानेंभोगावें ॥ राजीयाचेंसर्वपुरोहिता ॥ ॥ १ ॥ बोलेधर्मशास्त्रजाणतीसर्वही ॥ परितेंकोणाहीनक-ळेवर्म ॥ २ ॥ शिष्यकरीपापभोगावेंगुरूनें ॥ स्त्रीनेंकेलेंघे-णेंपुरुषासी ॥ ३ ॥ नामाह्मणेजनमायेंतगुंतले ॥ शेखीं खाणेंझोलेसंसारासी ॥ ४ ॥ ॥ ॥ १२ ॥

ऐसेवहुतकाळलोटलियावरी ॥ पुण्याचीसामोग्रीस-रलीते ॥ १ ॥ मरूनीयांजन्महरणाचापावला ॥ पतिव्रता झाल्याकुरंगिणी ॥ २ ॥ प्रारब्धाचाभोगसुटेनाकोणासी ॥ केलींजैशींतैशींघ्यावींफळें ॥ ३ ॥ नामाह्मणेदैवीकृपाघडे जरी ॥ सुटावेंतंववरीभोगखरा ॥ ४ ॥ ॥ ॥ १३ ॥

होउनीहरणराहिलातोवनीं ॥ दोघीत्याहारिणीस्त्रियाझा-ल्या ॥ १ ॥ जातीच्यास्वभावेंकारितीविव्हार ॥ चित्तझालें स्थिरयेकमेकां ॥ २ ॥ धाकुटीलादोनपाडसेंगोजिरीं ॥ दुजीगरोदरीपूर्णमास ॥ ३ ॥ नामाह्मणेपुढेंकायझालीग-ति ॥ कथेचीसंगतिऐकावरी ॥ ४ ॥ ॥ ॥ १४ ॥

देवलोकीं इंद्रसभेसी सादर ॥ भूताशन चाकर होता तेथें ॥ ॥ १ ॥ सेवेसी चुकतां होईं तूं किरात ॥ ऐसें इंद्रें त्यास शापीयेलें ॥ २ ॥ सेजसज्ज करितां अंतर पडिलें ॥ ह्मणोनि घडले भोग त्यासी ॥ ३ ॥ नामा ह्मणे सेवा करणें हें कठिण ॥ तेणें व्हावें जाण सावधान ॥ ४ ॥ ॥ ॥ १५ ॥

ऐकतांचि शब्द होउनी किरात ॥ राहिला निवांत एक ग्रामीं ॥ १ ॥ पालणपोषणा विषयाचे वोढीं ॥ करितसे जोडी पातकाची ॥ २ ॥ चंडभिल्ल नाम घेतिलें ठेवोनी ॥ दुष्टभाव मनीं वाढविला ॥ ३ ॥ पाशवागुरा हातीं शूळदंड ॥ सामोग्री उदंड मेळविली ॥ ४ ॥ हिंडे नाना वनीं पर्वतशिखरीं ॥ मारितसे फार जीवजंतु ॥ ५ ॥ जातीचा स्वभाव लागला तयासी ॥ कष्टी अहर्निशीं नामा ह्मणे ॥ ६ ॥ ॥१६ ॥

ऐसें असतां तोसरूं आला काळ ॥ प्रारब्धाचें बळ कैसें पहा ॥ १ ॥ हिंडतां हिंडतां फार कष्टी झाला ॥ दृष्टीस तयाला न पडे कांहीं ॥ २ ॥ कडेदरी मोठ्या पर्वताचे वरी ॥ वेंघोनियां करीं नाना यत्नें ॥ ३ ॥ झाली सांजवेळ न मिळे आमिष ॥ होऊनि उदास राहिलासे ॥ ४ ॥ नामा ह्मणे मग काय तेणें केलें ॥ ऐकावें निश्चळ साधुजनीं ॥ ५ ॥ ॥ ॥ १७ ॥

मार्गहीरा हिला जाऊं कोणीकडे ॥ आमिष न जोडे काय कीजे ॥ १ ॥ चिंताज्वरें फार तापलें अंतर ॥ क्षुधेचा आडदर पोटामध्यें ॥ २ ॥ रिक्त जाऊं तरी कांहीं नाहीं घरीं ॥ वाट पाहे नारी दारापुत्र ॥ ३ ॥ पाहूं जातां कांहीं नाठवे विचार ॥ तेणें स्थिरास्थिर पाय टाकी ॥ ४ ॥ नामा ह्मणे तेव्हां देखे सरोवर ॥ कांहींसा विचार करूं लागे ॥ ५ ॥ ॥ ॥ १८ ॥

भोंवतालें जाळें घालुनी नेटपाटें ॥ हस्तकीं तिखट बाणधरी ॥ १ ॥ येतील उदकपानासी सावजें ॥ पाहे त्यांची वास धरूनीया ॥ २ ॥ तेथें बिल्व होता महावृक्ष थोर ॥ वेंघोनीया वर बैसला से ॥ ३ ॥ डोळ्या आड आली ह्मणोनि यातोडी ॥ अंतरीं आवडी आमिषाची ॥ ४ ॥ बकाचिये परी ध्यानस्थ राहिला ॥ जीवींचा जिव्हाळा वेगळाची ॥ ५ ॥ नामा ह्मणे कैसी दैवाची निव्हाळी ॥ न करितां झाली देवपूजा ॥ ६ ॥ १९ ॥

बहुता काळाचें तेथें एक लिंग ॥ होतें भूमीभाग होउनीया ॥ १ ॥ भोळा महादेव तेणें संतोषला ॥ ह्मणे करी मला कोण पूजा ॥ २ ॥ लक्ष वरी बिल्वदळें माथा वाहे ॥ आनंद न समाये महादेवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे पाहे निमित्याची वाट ॥ पुराणीं बोभाट ऐसा आहे ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥२०॥

पुराणीं पोंवाडे जयाचे अपार ॥ ऐकतां जना फार सुख वाटे ॥ १ ॥ भोळा महादेव पाहे भोळा भाव ॥ एकसरें जीव उद्धरावया ॥ २ ॥ रावण मागों गेला पार्वती कारणें ॥ दे तेवेळे नेणे कैसें द्यावें ॥ ३ ॥ जातीची चांडाळी गोकर्णासी गेली ॥ दरुशनें नेली कैलासासी ॥ ॥ ४ ॥ नामा ह्मणे कैसें दैव या भिल्लाचें ॥ आलें पूजनाचें फळ हातां ॥ ५ ॥ ॥ ॥ २१ ॥

माथां पडतां पाला ॥ सांब तेणें संतोषला ॥ १ ॥ हातो प्राचीनाचा ठेवा ॥ बहु दुर्लभ मानवा ॥ २ ॥ काय भक्तीचा जिव्हाळा ॥ काय त्याचें अंगीं कळा ॥ ३ ॥ बहु केलीं दुष्टकर्मे ॥ शेखीं जाला तोचि धर्म ॥ ४ ॥ नामा ह्मणे भोळा देव ॥ सांगो त्याचा हाची भाव ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ २२ ॥

इतुकिया साठीं ॥ बहु तुष्टला जगजेठी ॥ १ ॥ कायसा-

गावाविचार ॥ दैवपारध्याचें थोर ॥ २ ॥ झालीतीनप्रहरनिशी ॥ पूजापावलीदेवासी ॥ ३ ॥ धाडिलेंयमाला ॥ सुखीकरावयात्याला ॥ ४ ॥ आलातोधांवत ॥ मागह्मणे अपेक्षित ॥ ५ ॥ याचीविषयीकबुद्धि ॥ पुढेंझालीतयासंधी ॥ ६ ॥ जेंजेंयाचकेंमागावें ॥ तेंतेंदातियानेंद्यावें ॥ ७ ॥ कायमागितलेंतेणें ॥ तेंचिनामाऐकाह्मणे ॥ ८ ॥ ॥ २३ ॥

येऊनियायमठाकलापुढारी ॥ पाहेदुराचारीदुरूनियां ॥ ॥ १ ॥ घाबरलामनींऐसाकोणनेणे ॥ विचारितांमनेंभांबावला ॥ २ ॥ पुसोंलागेत्यालाकोणतूंआलासी ॥ आणीकह्मणसीमागकांहीं ॥ ३ ॥ देवकिंवायक्षराक्षसकिन्नर॥ करितांनिर्धारनपडेठाईं ॥ ४ ॥ नामाह्मणेमूर्खपारधीतो खरा ॥ दैवत्याचेघरांआलेंजाणा ॥ ५ ॥ ॥ २४ ॥

जाणोनियायमसंतोषलामनीं ॥ मंजुळवचनींकायबोले ॥ १ ॥ केलीदेवेंकृपापाठविलेंमज ॥ वरदानतुजद्यावयासी ॥ २ ॥ सर्वहीजीवांचानियंतामीयम ॥ इच्छिसीतें कामपूर्णकरूं ॥ ३ ॥ शिवरात्रीआजीउपवासकेला ॥ शंकरतोषलाबिल्वदळें ॥ ४ ॥ नामाम्हणेऐसेंऐकतांवचन ॥ पारध्याचेंमनसंतोषलें ॥ ५ ॥ ॥ ॥ २५ ॥

जोडोनियांहातवंदिलाकृतांत ॥ ह्मणेमाझाहेतइतुकाचि ॥ १ ॥ स्वर्गसुखाहुनिहेंचिवाटेगोड ॥ संसाराचीहाडमोडवेना ॥ २ ॥ मृगपक्षियाचेंकळावेंबोलणें ॥ सर्वकाजयेणें साधतसे ॥ ३ ॥ इतुकीचआहेआमुचीहीवासना ॥ पुरवोनिस्वस्थानाजाइजोजी ॥ ४ ॥ नामाम्हणेत्याचीजीकांहीं वासना ॥ तेचिपुढेंजाणाउभीठाके ॥ ५ ॥ ॥ २६ ॥

देऊनियांवरदंडपाणीगेला ॥ ध्यासपारध्यालामृगाचा-
चि ॥ १ ॥ लावूनियांचित्तऐकेचळबळ ॥ दृष्टीचेकंवळल-
क्षीतेथें ॥ २ ॥ उगवलादीनझालासेप्रकाश ॥ मृगपक्षीयास
दृष्टीझाली ॥ ३ ॥ तंवतोमृगपाहोंआलाउदकासी ॥ उ-
ड्डाणवेगेंसीसाधीतसे ॥ ४ ॥ तृषाक्रांतमोठाचालिला
निसंग ॥ प्रारब्धाचाभोगवाढवला ॥ ५ ॥ उदकाचेहावें
दृष्टीघालीदुरी ॥ पाशतोसमोरीपाहीचिना ॥ ६ ॥ येवो-
नियांपडेजाळीयाभीतरीं ॥ लोळेपृथ्वीवरीयेकसरां ॥ ७ ॥
नामाह्मणभिल्लेंपाहतांलोचनीं ॥ वोढोनीयागुणींबाणलावी ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ २७ ॥

घांवघालूंजातांनवलदेखिलें ॥ पहातसकळेंदृष्टीभावें ॥
॥ १ ॥ परितंहोणारकदापिचुकेना ॥ तैसीचवासनाधांव
घाली ॥ २ ॥ धाकुटीहरिणीपाडसेंधाकुटीं ॥ सांडोनीउ-
ठाउठींआलींतेथें ॥ ३ ॥ पाहूंजातांपाशींगुंतलातोमृग ॥
तेव्हांकायमगकेलेंतिनें ॥ ४ ॥ मुखाप्रतिमुखलावूनीचुंबि-
लें ॥ ह्रदयफुटलेंदेखतांचि ॥ ५ ॥ सुखदुःखबोलबोलतीते
काळीं ॥ ह्मणतीकपाळींभोगहोता ॥ ६ ॥ सोडवितांकोणी
नदिसेयेकाळीं ॥ ह्मणोनीतळमळीउभयतां ॥ ७ ॥ नामा
ह्मणेखळाकळेत्याचीवाणी ॥ ऐकोनीयामनींस्थिरजाहला ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ २८ ॥

धर्मशास्त्रनीतिबोलतीतेबोले ॥ तेणेंचोजवलेंचित्तत्याचें
॥ १ ॥ आश्चर्याचेडोहींबुडालापारधी ॥ ह्मणेकैसीबुद्धिपह्मा
याची ॥ २ ॥ रानींचेंरानटेंतयाएव्हडेंज्ञान ॥ प्रेमाचेंजीव-
नवोसंडती ॥ ३ ॥ चाकाटलीवृत्तिचित्तझालेंस्थिर ॥ दोघां-

येंउत्तरऐकतुसे ॥ ४ ॥ नामाह्मणेहरणीहरणांचासंवादु ॥ ऐकतांभवबंधुतुटताहे ॥ ५ ॥ ॥ ॥ २९ ॥

बंधनींगुंतलादेखोनीयापति ॥ उडालीसवृत्तिहरिणीची ॥ १ ॥ देहाचीतेआससांडोनीळवलाहीं ॥ पडेरडेकांहींबोलवेना ॥ २ ॥ ह्मणेतुह्मींआतांनजावेंयेकलें ॥ संगेंआह्मांनेलेंपाहिजेजी ॥ ३ ॥ बहुतांजन्मांचीतुह्माआह्मांगांठी ॥ आतांकैसातुटीपाडीतसा ॥ ४ ॥ भोगजेभोगिलेस्वप्नाऐसेजाले ॥ परिनाहींपुरलीवासनाते ॥ ५ ॥ नामाह्मणेविषयवासनावोंगळ ॥ तेकोण्याकाळेंसुटेचिना ॥ ६ ॥ ३० ॥

देखतांचिकांतादुःखझालेंफार ॥ डोंगरचिवरकोसळला ॥ १ ॥ बोलतांतियेसीननिघतीबोल ॥ कुरंगह्मणेबोल अवधारी ॥ २ ॥ नकोआतांपडूंमायेचीयेभरीं ॥ जाईंवो सुंदरीस्वस्थळासी ॥ ३ ॥ माझीगतिमजतुझीगतितुज ॥ कायसेंतेंकाजप्राणदेती ॥ ४ ॥ घरींतुझींबाळेंगोजिरींगोमटीं ॥ जाउनीयापोटींधरीत्यांसी ॥ ५ ॥ नलावीउशीरजाईंवोमाघारी ॥ जोंतोदुराचारीनदेखतां ॥ ६ ॥ बाळांसी पाळणेंतोचिस्त्रियांचाधर्म ॥ सांगतसेवर्मऐकक्रांते ॥ ७ ॥ माझीयाप्रारब्धींहोतेंतैसेंजालें ॥ तूंकांयेथेंवळेंप्राणदेसी ॥८ नामाह्मणेऐसेंसांगेतिच्याहिता ॥ परितेनऐकतांकष्टीहोय ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३१ ॥

नेत्रींअश्रुधारापडतीअपार ॥ तेणेंपृथ्वीवरपूरवाहे ॥ १ ॥ ह्मणेतुह्मावीणआतांकैसाप्राणधरूं ॥ वांचुनीयाकरूंकाय आतां ॥ २ ॥ माझीयाभारानेंदाटेलमेदिनी ॥ तुह्माआव्हेरुनीगेल्याजरी ॥ ३ ॥ सुखाचेसांगातीहोतोंदोघेजण ॥

दुःखम्हणवूनसांडूंकेवीं ॥ ४ ॥ सांडिलीयातुम्हांदेवासीमा- नेल ॥ वेदशास्त्रेंबोलकरतील ॥ ५ ॥ तुजाविणक्षणकर्मवे- नाकाळ ॥ मीनाजैसेंजळतैसेंआह्मां ॥ ६ ॥ तुजाविणाजिणें व्यर्थयासंसारीं ॥ नामाह्मणेखरीगोष्टीबोले ॥ ७ ॥ ३२ ॥

चंडभिल्लतेणेंऐकिलेंबोलणें ॥ सावधानमनेंकरूनिया ॥ १ ॥ तेव्हांहोतीत्याचीवासनाजेखोटी ॥ जिरवोनीपोटीं चाकाटला ॥ २ ॥ भीतीलयालागींवृक्षाआडगेला ॥ ऐकों जेलागलाशब्दत्यांचे ॥३॥ नामाह्मणेऐसाराहिलापारधी ॥ ऐकावेंतेसंधींकायजालें ॥ ४ ॥ ॥ ॥ ३३ ॥

दुसरीजेहोतीगर्भीणकुरंगी ॥ तीहीलागवेगींआलीतेथें ॥ १ ॥ आहाऐसेंकायकेलेंवोसाजणी ॥ नयेसीअझुनीको- पटासी ॥ २ ॥ लहानशींपाडसेंआक्रंदतीभुके ॥ कैसीयेथें सुखेंराहिलीस ॥ ३ ॥ जाईलवलाहींत्यांसीस्तनदेई ॥ सां- गूंआतांकाईबोलवेना ॥ ४ ॥ नामाह्मणेधन्यतयांचेंसौज- न्य ॥ नाहींभावभिन्नकोण्हामाजीं ॥ ५ ॥ ॥ ३४ ॥

येरीह्मणेकायकरूंवोसुंदरी ॥ आतांआहेघरींकायमाझें ॥ १ ॥ प्राणनाथेंयेणेंकेलेंस्वर्गलोका ॥ जाईनमीदेखातया सवें ॥ २ ॥ वडीलपणेंतुह्मींलोभअसोंद्यावा ॥ सांभाळक- रावाबाळकांचा ॥ ३ ॥ वागुरेमाजींमाझागुंतलासेकांत ॥ कायसेंजीवित्वाविचारीपा ॥ ४ ॥ नलावीउशीरजाईंयेच- क्षणीं ॥ असमीगाभिणीपूर्णदिवस ॥ ५ ॥ जरीदेसीप्राण पतनगर्भासी ॥ होयतेदोषासीपात्रहोसी ॥ ६ ॥ पोसो- नियाबाळवाढवीवंशाला ॥ द्यावेंचित्तबोलामाझ्याआतां ॥ ७ ॥ पळावयातुजनाहींअंगींबळ ॥ नदेखतांखळजाय

वेगीं ॥ ८ ॥ नामाह्मणेऐसेंउत्तरऐकिलें ॥ तींहीघाबरिली तयेवेळीं ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३५ ॥

ऐकतांजीवजालाकासाविस ॥ ह्मणेजालेंकैसेंअकस्मात ॥ १ ॥ आहाकपाळींचाभोगवोढवला ॥ कांततोनिघाला सोडोनिया ॥ २ ॥ कैचींबाळेंकोणकोणाचेसांगाती ॥ पाहतांहीभ्रांतिवाउगीच ॥ ३ ॥ ठाईंचीहीकायाजायाचीजाईल ॥ वांचलियाफोलपतिविण ॥ ४ ॥ पतिविणसुखकाय यासंसारीं ॥ दुःखकल्पवरीभोगावेंकीं ॥ ५ ॥ नामाह्मणे ऐसेंचिंतोनियामनीं ॥ आलीतत्क्षणींहरणापाशीं ॥६॥३६॥

कपाळींकपाळलावीचुंबीरडे ॥ आक्रंदोनीपडेभूमीवरी ॥ १ ॥ आवडीचेंचिन्हसांगावेंजीवींचें ॥ जाणावेंजयाचें त्याचेंतेणें ॥ २ ॥ मानेवरीमानटाकुनीराहिली ॥ वाचाही खुंटलीबोलवेना ॥ ३ ॥ आह्मीतुजविणनराहूंक्षणभरी ॥ उदासनकरीचित्तआतां ॥ ४ ॥ नामाम्हणेमृगजन्मत्यांचा खरा ॥ लक्षितांविचाराज्ञानीबहू ॥ ५ ॥ ॥ ३७ ॥

पट्टराणीमीवडीलमानाची ॥ जेगतिमृगाचीतेचिमाझी ॥ १ ॥ जाईनसांगातेंनसोडीसंगती ॥ निश्चयहाचित्तींदृढ केला ॥ २ ॥ तुझींबाळेंघरींकष्टतीक्षुधेनें । जाईवेगींस्तनपाजीत्यांसी ॥ ३ ॥ बाळांकडेजाईकैंठींउरलाकाळ ॥ नकरी उताविळमनआतां ॥ ४ ॥ नामाम्हणेऐसेंसंवादलेफार ॥ तिघांचेंअंतरयेकविधा ॥ ५ ॥ ॥ ॥ ३८ ॥

ऐशादोघीजणीयेकविधभावें ॥ धावयात्याजीवउभ्याठेल्या ॥ १ ॥ धन्यधन्यत्यांचासंसारसफळ ॥ सत्वाचेंचवळ अंगामध्यें ॥ २ ॥ पाजूनियायेईबाळकांसीस्तन ॥ आह्मी

दोघेजणयेथेंअसों ॥ ३ ॥ नटाकावेंमजसांगुनीनिघाली ॥ बिऱ्हाडासीआलीलागवेगें ॥ ४ ॥ घेउनीयाअंकींपाडसेंतीं दोन्ही ॥ लाउनीयास्तनींशोककरी ॥ ५ ॥येकमेकांमुखें राहावेंअनन्य ॥ तुटलेंसौजन्यतुह्मांआम्हां ॥ ६ ॥ पतिपडिलापाशींसांडीतसेप्राण ॥आम्हालागींजाणेंत्याचेसवें॥७॥ हृदयींधरूनीदिधलेंचुंबन ॥ तेम्हणतीकोणपोसीआम्हां ॥८॥ येऊंतुझ्यासवेंदेऊंआधींप्राण ॥ पुढीलकारणतुह्मीपहा ॥ ९ ॥ नामाम्हणेऐसातयांचाविवेक ॥ देखोनीकवतूकवाटतसे ॥ १० ॥ ॥ ॥ ॥ ॥ ३९ ॥

निघोनियादेखाआलेत्यातटाका ॥ जालीएकमेकांभेटी तेथें ॥ १ ॥ परस्परेंदुःखदेखतांवाटलें ॥ धैर्याचेंतेंकेलेंबळ तिंहीं ॥ २ ॥ देहभावकांहींनाठवेतयांसी ॥ गुंतोनीमोह्यासीजीवदेती ॥ ३ ॥ नामाम्हणेसोडवावयातयांसी ॥ हेंतो आणिकासीआटोपेना ॥ ४ ॥ ॥ ॥ ४० ॥

पारधीतोझडघालावयापातला ॥ घालावयाघालाएक सरें ॥ १ ॥ भयाभीतजालींपांचहीतेकाळीं ॥ वासनागुंतलीएकमेकां ॥ २ ॥ वडीलकुरंगीयेवोनीत्यापाशीं ॥ लागुनी पायांसीकायबोले ॥ ३ ॥ नकोमारूंपतितृषेनेंपीडिला ॥ मारीतूंमजलात्याजआधीं ॥ ४ ॥ आहेवपणेंमजधाडीस्वर्गलोकां ॥ इतुकेनीसुखापात्रहोसी ॥ ५ ॥ इतुकियामाजीं दुसरीहीआली ॥ तीह्मणेउगलीथांबआतां ॥ ६ ॥ तृषेनें पीडिलोंपाजीआधींपाणी ॥ मगजैसेंमनींतैसेंकरी ॥ ७ ॥ नामाम्हणेभिल्लविसरलाघात ॥ राहिलानिवांतत्यांचे बोलें ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४१ ॥

वडीलकुरंगीकायबोलेल्यासी ॥ सांगतेंधर्मासीपूर्वीलि-
या ॥ १ ॥ बांधोनीमारितांघडेमहादोष ॥ पाजीउदकास
सोडोनिया ॥ २ ॥ पिऊनियाजळयेऊंतुजपाशीं ॥ मगसा-
वकाशींकरीकाज ॥ ३ ॥ आमुचाविश्वासतुजजरीनाहीं ॥
मागसील्यापाहीभाषादेऊं ॥ ४ ॥ परउपकारीपडतसेदेह ॥
लाभआतांकायवांचूनिया ॥ ५ ॥ भुकेलियाअन्नतान्हेलि-
याजीवन ॥ पुण्यासीकारणइतुलेंची ॥ ६ ॥ पांचजणींतुज
वोपियेला देह ॥ यालागींसंदेहनधरावा ॥ ७ ॥ नामाम्हणे
ऐसाप्रार्थिलाकिरात ॥ द्रवलामनांतकायबोले ॥ ८ ॥४२॥
होऊनियातुह्मीवनींचींवनचरें ॥ बोलतसासारधर्माधर्म
॥ १ ॥ येणेंकांहींकांहींद्रवोआलामना ॥ तुमचीभावनाकों-
णजाणे ॥ २ ॥ सोडिल्यापाण्यासीठकवोनीआह्मासी ॥
गेलिया तुह्मांसीकायकीजे ॥ ३ ॥ नामाह्मणेऐसेंबोलोनी
किरात ॥ करावयाघातशस्त्रकाढी ॥ ४ ॥ ॥ ४३ ॥
देखतीतींदोन्हीपाडसेंत्याकाळीं॥ भिल्लापुढेंआलींलागवे-
गीं ॥ १ ॥ जोडोनीयाहातऐकाविनंति ॥ धरीकृपाचि-
त्तींआमुचीते ॥ २ ॥ अतीथालागुनीचिल्हयावोपीदेहे ॥
तेणेंमितोलाहेपरमधामा ॥ ३ ॥ मातापितरांसीनकरावा
घात ॥ मारावेंआमुतेंआधींआतां ॥ ४ ॥ कोंवळेंशरीर
गोडबहुमांस ॥ लागोसार्थकासतुझेकाजीं ॥ ५ ॥
नामाह्मणेमोठेंसत्वत्यापांचांचें ॥ होतेकैलासीचेअधिका-
री ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ४४ ॥
तंवहरणीसांगेकांहींकर्मविपाकासी ॥ ऐशाऐशादोषीं
ऐसें होती ॥ १ ॥ ठकवोनीआम्हीतुजजाऊंजरी ॥ अंधत-

माभीतरींवासपावूं ॥ २ ॥ गुरुस्वामीद्रोहीविश्वासघातकी ॥ तयासीतोनरकींवासपाहे ॥ ३ ॥ परद्रोहीपरनिंदेसीरतला ॥ तोहोयकावळाजन्मोजन्मीं ॥ ४ ॥ पंक्तिभेदतिचींमरतीलपोरें ॥ किंवापतिमरेबाळपणीं ॥ ५ ॥ सदासर्वकाळदुष्टकर्मीरत ॥ सूकरादिहोतनीचयोनी ॥ ६ ॥ आतितअभाग्यपूजानाहींज्याला ॥ अचूकसर्पबिळामाजींहोती ॥ ७ ॥ नामाम्हणेकेलेंतैसेंतेंभोगावें ॥ सावधानव्हावें जाणत्यानें ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ४५ ॥

पापिष्टाचेंजिणेंकायतेंजियालें ॥ गळास्तनजालेशेळियेचे ॥ १ ॥ इहलोकींखोटातोपरलोकींकरंटा ॥ व्यर्थआला पोटांमाउलीच्या ॥ २ ॥ तप्ततांम्रभूमींलोळवितीनरा ॥ लोटितीअघोरानर्कांमाजीं ॥ ३ ॥ लोहचंचुकागटोंचितीयेवोनी ॥ मारितातीघणींमाथांघावो ॥ ४ ॥ बांधोनियागळाटांगितीउफराटें ॥ हाणतातीसोटेवरचेवरी ॥ ५ ॥ असीपत्रावरीओढितीधरूनी ॥ लोटितीनेउनीकुंभपाकीं ॥ ६ ॥ जळतियाखांबाभेटवितीबळें ॥ खैराच्याइंगळेंनाहावितीं ॥ ७ ॥ प्रळयक्रूरसर्पझोंबवितीवर्मासी ॥ वोढोनीजिव्हेसीं खंडेंकरिती ॥ ८ ॥ नामाम्हणेऐसीपापिष्टाचीगति ॥ जन्मलक्षघेतीहेंचिफळ ॥ ९ ॥ ॥ ॥ ४६ ॥

नकरूंआम्हीतैसेंघेईआतांभाक ॥ अंतरींनिःशंकजाले सर्व ॥ १ ॥ तुम्हांआम्हांसाक्षीअसेसदाशिव ॥ येथेंदुजा भावधरूंनको ॥ २ ॥ पिऊनियापाणीनयेऊंतुजपाशीं ॥ तरीघडोतआम्हांसीसर्वपापें ॥ ३ ॥ जातीचाब्राह्मणनकरी ब्रह्मकर्म ॥ तोजैसाअधमतैसेआम्ही ॥ ४ ॥ स्वामीद्रोही

आणिविश्वासघातकी ॥ तोपडेज्यानरकींतेथेंपडों ॥५॥ नामाम्हणेऐसीवाहूनियाआण॥धरिलेचरणपारध्याचे॥६॥४७॥

पारध्यासीतेव्हांदाटलागहींवर ॥ लोटलेअपारप्रेमाश्रू त्या ॥ १ ॥ जीवदानदिल्हेंजावेंतुम्हींआतां ॥ नकरावीचिंताकांहींयेथें ॥ २ ॥ इंद्राचामीदूतचुकलोंसेवेसी ॥ यालागींजन्मासीआलोंजाणा ॥ ३ ॥ तुमचीयाबोलेंनिवालेंअंतर ॥ घातइतुकियावरनकरींकांहीं ॥ ४ ॥ नामाम्हणेशुभकाळत्याचाआला ॥ म्हणउनीजालापश्चात्ताप ॥५॥ ४८ ॥

सोडोनियागळामुक्तकेलेंत्यांसी ॥ पिउनीउदकासीआलेपुढती ॥ १ ॥ भुकेलासीफारनलावीउशीर ॥ घेउनीयाशरहाणीवेगीं ॥ २ ॥ घरतुझेंदूरवाहवेनाभार ॥ आम्हीतेथवरयेतअसों ॥ ३ ॥ सत्यत्वदेखोनीम्हणतोपारधी ॥ तुम्हांसीनवधींजावेंआतां ॥ ४ ॥ पाठोवाठींत्याच्याघरालागींआल्या ॥ चरणींघातल्यामिठ्यात्यांनीं ॥ ५ ॥ नामाह्मणेसत्वआगळेंतयांचें ॥ वर्णावयावाचेंनयेशेषा ॥ ६ ॥ ४९

हरिश्चंद्रराजासत्वशीळमोठा ॥ स्त्रीपुत्रचोहटयामाजींविकी ॥ १ ॥ तैसेंचपैंयेथेंमृगाअंगींसत्व ॥ वोपियलेंजीवित्वपारध्यासी ॥ २ ॥ शिबीराजाअंगकापीनेटपाटें ॥ सत्वासीपालटहोऊंनेदी ॥ ३ ॥ ताम्रध्वजाशिरींकर्वतघातिला ॥ नाहींपालटलामनोधर्म ॥ ४ ॥ नामाम्हणेमागेंबहुतींकेली कीर्ति ॥ तयांऐसीरीतियेथेंदिसे ॥ ५ ॥ ॥ ५० ॥

आधींचकृपाळुभोळामहादेव ॥ जाणितलाभावकुरंगाचा ॥ १ ॥ कृपाकेलीदेवेंमांडिलासन्मान ॥ धाडिलेंविमानदूतांहातीं ॥ २ ॥ लखलखीतटेकेपताकाडोलती ॥ तयामाजीं

होतीगीतनृत्यें ॥ ३ ॥ नानासुमनांचीशय्याआरुवार ॥ करितीउपचारअष्टसिद्धी ॥ ४ ॥ आलेअकस्माततयाचीये पाशीं ॥ पाहतांसर्वांसीनवलजालें ॥ ५ ॥ दिव्यदेह जालेपांचांचेतेकाळीं ॥ विमानींबैसविलींमानेंवेगीं ॥ ६ ॥ पारधीदेखोनीतटस्थराहिला ॥ दूतींतयाकेलाउपदेश ७ शिवरात्रीआजीजाग्रणउपवास ॥ केलातेणेंदोषसर्वगेला ॥ ॥ ८ ॥ करुनीपारणेंहोईशिवभक्त ॥ आशापाशींचित्तगों-वूंनको ॥ ९ ॥ अखंडकीर्तनशिवनामाचेंकरी ॥ तेणेंमोक्ष-पुरीपावशील ॥ १० ॥ पुढिल्याशिवरात्रीनेऊंकैळासासी ॥ सांगुनीवेगेंशीनेलेंत्यांसी ॥ ११ ॥ नामाह्मणेमोक्षजाला-त्यापांचांसी ॥ वस्तिचंद्रापाशींकेलीत्यांनीं ॥ १२ ॥ ५१ ॥

तेणेंउपदेशपारध्यासीज्ञान ॥ करितकीर्तननामघोष १ संचिताचानाशक्रियमाणबुडविलें ॥ सहजत्याजोडलेंमोक्ष-सुख ॥ २ ॥ दुसऱ्याशिवरात्रींपूजिलेंशंकरा ॥ करुनीयांब-राभावशुद्ध ॥ ३ ॥ विमानींवाहुनीस्वस्थानींस्थापिला ॥ ये-थोनीसंपलाकथाभाग ॥४॥ नामाम्हणेशिवविष्णुएकरूप ॥ जाणोनियाजपकरात्याचा ॥ ५ ॥ ॥ ॥ ५२ ॥

शिवरात्रकथाधन्यजेऐकती ॥ इच्छिलेंपावतीसर्वकांहीं ॥ १ ॥ पातकांचानाशपुण्यवाढेफार ॥ रक्षीविश्वंभरकृपा करी ॥ २ ॥ भोग्याभोग्यज्ञानवाढेलसंतान ॥ काळकरीच-रणसेवात्याची ॥३॥ नामाम्हणेशिवअक्षरेंदोन्ही ॥ जपावीं-सज्जनींवारंवार ॥ ४ ॥ ॥ ५३ ॥

लिंगपुराणींहाबोलिलाइतिहास ॥ तोचिम्यांतुम्हांसनि-वेदिला ॥ १ ॥ आणीकपुराणेंआणीकप्रकार ॥ तारावया

नरनारीजनां ॥ २ ॥ मुख्यहेचिकथाशिवरात्रीचीजाणा ॥ कैळासींचाराणातोषपावे ॥ ३ ॥ नामाम्हणेमनकरूनिनिश्चळ ॥ करागदारोळनामघोष ॥ ४ ॥ ॥ ५४ ॥

हे गाथा बाळाबीन नवो बाबीन्दु यास्या

## शिवरात्रीचे अभंग समाप्त

[illegible]
[illegible]
[illegible]
[illegible]
[illegible]
[illegible]
[illegible]
[illegible]



वाकवटीळ॰॰ नामा म्हणे पाकीवइळ ॥१॥ देव सोनाकपींआ
रोब्याधो नीपकोळे॰॰ जगजेटी॰॰ कइ सी
कोरडीरोटी॰॰ पकरोनी याबाटी॰॰ जेबसोनाचीयाप
टी॰॰ देव म्हणे [redacted] नाम्याकरू सेवक रवीळे॰॰
पेकको जाळे

